# अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| १ | म्हैस | ९ |
| २ | एक नवे सौंदर्यवाचक विधान | ३५ |
| ३ | शांभवी : एक देणे | ४९ |
| ४ | मी नाही विसरलो | ६२ |
| ५ | घरमालकास मानपत्र | ७२ |
| ६ | बंधू आणि भगिनींनो | ८६ |
| ७ | 'माजघरातला रिफ्लेक्स' | ९५ |
| ८ | सरदी | १०६ |
| ९ | घरगुती भांडणे | ११३ |
| १० | एका दिवंगत ग्रंथाचा मागोवा | १२० |
| ११ | महाभारतकालीन वर्तमानपत्रे | १२९ |
| १२ | माझी कु. संपादकीय कारकीर्द | १४५ |
| १३ | वाल्मिकींचे लोक-रामायण | १७४ |

## विनोद : थोडेसे प्रास्ताविक गांभीर्य

विनोदाचे दोन प्रकार आहेत. एका प्रकारामुळे आपल्याला हसू येते व दुसऱ्या प्रकारामुळे हसू येत नाही. प्रस्तुत संग्रहात दोन्ही प्रकारचे विनोद भरपूर सापडतील. आता ज्या प्रकारामुळे हसू येते तो अर्थातच चांगला प्रकार व ज्यामुळे हसू येत नाही तो वाईट प्रकार हे उघडच आहे. हे उघड असूनसुद्धा लेखक असला विनोद का करतो हा मूलभूत प्रश्न आहे. ह्याला उदाहरण क्रिकेटचे. बोलर बोलिंग टाकीत असतो, परंतु प्रत्येक बॉलला गडी आऊट होतोच असे नाही. तसे होते तर दुसऱ्या ओव्हरचे चार बॉल्स पडल्यावर एक बाजू आटपली असती. तद्वतच प्रत्येक बॉलला रनदेखील निघत नाही. तसे झाले असते तर स्कोअररची बोटे वळली असती. विनोद व हशा यांचे प्रमाण असे आहे, म्हणूनच विनोदी लेखक काही पाचपंचवीस पाने भरू शकतो. एरवी त्याचे प्राण कंठाशी आले असते.

विनोद हा कारुण्यावर आधारला असल्यास उत्तम असे अनेक विद्वानांचे मत आहे. विद्वानांचे विनोदाशी प्रमाण हा वादग्रस्त मुद्दा असला तरी त्यांचे हे मत बरोबर आहे. कारण विनोद जमला तर हसून हसून डोळ्याला पाणी येते आणि फसला तर विनोद करणाऱ्याचा चेहरा उतरतो. फसलेल्या

विनोदाने प्रस्तुत लेखकाचा चेहरा कसा दिसतो, याचे छायाचित्र जोडावे असा सल्ला देण्यात आला होता, परंतु तो योग जमवता आला नाही. या पुस्तकातील 'वाइड बॉल्स' सारखी गेलेली वाक्ये वाचताना कल्पनेने एक रडवा चेहरा डोळ्यांपुढे आणून वाचकांनी समाधान मानून घ्यावे.

आता या ग्रंथाच्या नावाविषयी थोडेसे. ह्या ग्रंथाचे नाव 'गोळाबेरीज' असे का ठेवले? मला वाटते, ह्याचे उत्तर न देणे बरे. कारण यदाकदाचित हे पुस्तक एखाद्या विद्यापीठाने 'लावले' तर एक आयते उत्तर विद्यार्थ्यांना मिळेल. त्यापेक्षा परीक्षकांना एक आयता प्रश्न देणे अधिक योग्य होईल.

ह्या पुस्तकातील लेख निरनिराळ्या मासिकांत यापूर्वी आलेले आहेत. त्यांची पाने जमवून (बहुधा अशाश्वत) संग्रह केला आहे. यातील एका लेखाचा दुसऱ्याशी संबंध नाही. निरनिराळ्या जातीगोतींची, मतांची मंडळी एका चाळीत राहावी तसे हे लेख आता एकत्र राहायला आले आहेत. त्यांचे एकमेकांशी जमले तर ठीक. नाही जमले तर शिशिरात झाडांची पाने पटापट गळून जातात व नामशेष होतात, तशी ही पानेदेखील नामशेष होतील. ह्या पुस्तकाचे भवितव्य आता प्रिय वाचक आणि त्यांच्या घरांतले बालबच्चे यांच्या हाती आहे. त्यांनी त्याचा यथायोग्य आदर करावा.

प्रस्तावनेचा मूळ उद्देश 'विनोद' ह्या गोष्टीचे सखोल चिंतन करण्याचा होता. आजूबाजूला अनेक इंग्रजी ग्रंथ जमवले होते. त्यांतून घेतलेले मौलिक विचार मांडायचा बेत तूर्त पुढल्या पुस्तकावर ढकलतो.

पु. ल. देशपांडे

# १

## म्हैस

"म्हैस! म्हैस!! म्हैस!!!"

पुढल्या शिटांच्या दिशेने निरनिराळ्या आवाजांत आरोळ्या ऐकू आल्या. अ ते ज्ञ ह्यांपैकी कुठल्याही अक्षरांनी लिहून दाखवता न येणारा असला ब्रेकचा आवाज झाला आणि रत्नागिरी ते मुंबई एस० टी०मध्ये विविध कारणांस्तव नाके आणि जीव मुठीत धरून पन्नासच्या गणसंख्येच्या आसपास असलेले पुरुष, स्त्रिया व मुले आणि ट्रंका, होल्डॉल, गोण, पेटारे, फणस, आंबे, केरसुण्या, सुपे, रोवळ्या आणि असंख्य पिशव्या ह्या सान्यांनी आपापल्या जागा सोडल्या. कुणी कुणाच्या गळ्यात, कुणी पायाशी, कुणी मांडीवर अशा अलौकिक अवस्थेत काही सेकंद गेले. झटका ओसरल्यावर एस० टी०च्या पुढल्या चाकाखाली म्हैस आल्याचा सार्वजनिक साक्षात्कार झाला. ड्रायव्हरने पुढले दार उघडून उडी मारली होती. उतारू दणादण मागल्या दाराने बाहेर पडत होते. त्यांतली काही उत्साही मंडळी पुढे धावली होती.

सुमारे पाचसहा मिनिटांनी चारपाच बायकांचा तारस्वरातला कोलाहल ऐकू आला. रस्त्यापासून पन्नासएक कदमांच्या अंतरावरील झोपड्यांतून ह्या

कोलाहल सुरू झाला आणि हां हां म्हणता मोटारीपुढे आडव्या झालेल्या म्हशीच्याभोवती गोळा होऊन डझनभर बायका आणि पंचवीसएक पोरे मुक्तकंठाने आक्रोश करू लागली. म्हशीभोवती इतकी गर्दी जमली होती की एस० टी०ची पुढली चाके आणि म्हैस यांचे काय नाते जडले आहे हे प्रत्यक्ष दिसूच शकत नव्हते. तेवढ्या गडबडीत मी हळूच म्हशीचा चेहरा पाहून घेतला. आपणासंबंधी चाललेली रडारड समजून घेण्याचा ती प्रयत्न करीत असावी. पडल्यापडल्या मधूनच ती मानेला बारीकसा हिसडा देत होती. रडणाऱ्याच्या कंठातून एखादी चांगली जागा निघून गेल्यामुळे जाणकार गाण्यात दाद देतात तशा ढंगाचा तो झटका मला वाटला. गर्दीच्या सामुदायिक स्कंधरेखेवरून आणखीन एक डोकावून पाहण्याचा प्रयत्न केल्यावर तिच्या पाठीवरून वाहणारा रक्ताचा एक ओघळ मला दिसला. रक्ताने मला भोवळ येते. लहानशा डासाच्या रक्तानेदेखील मला गरगरते; इथे तर संपूर्ण म्हैस होती. माझ्यासारखे इतरही काही उतारू होते. उत्साहाने पुढे सरसावून मागे आलेल्यांत मीच काही एकटा नव्हतो. कारण मी तिथून माघार घेण्यापूर्वीच सुमारे शंभर यार्डांवर (हा तपशील नंतरच्या पोलीसपंचनाम्यावरून कळला.) वायव्येस (किंवा आग्नेयेस असेल) असलेल्या झोपडीच्या पुढील खळ्यात कांबळी पसरून उतारूंचा तळ पडला होता, त्यांत मला माझ्यासारखी इतरही विरक्त मंडळी आढळली.

पाचसात मिनिटांतच आक्रोश करणाऱ्या 'कोरस'मधला एक-एक आवाज कमी होत गेला. एस० टी०खाली आलेली म्हैस बहुधा आपलीच असावी अशी आगाऊ कल्पना करून त्या माम्यांनी आधीच रडून घेतले होते. पुढे जसजशी संपूर्ण म्हैस दिसू लागली आणि ही आपली नव्हे हे कळले तसतशी एक-एक मामी उठली आणि आपल्या कामाला जाऊ लागली. कोकणातला कुणबी हा 'मामा' ह्या नावाने ओळखला जातो. खानदेशातले जसे सगळे भाऊ तसे हे आईचे भाऊ. त्यामुळे त्यांच्या बायका ह्या माम्या झाल्या. एकएक मामी आपापले अंग आणि आवाज काढून घेऊ लागली तसतशी ड्रायव्हर, कंडक्टर आणि इतर उतारू मंडळी पुढे सरकू लागली.

खळ्यातल्या कांबळ्यावर बसल्याबसल्यादेखील आता म्हशीची शेपूट आणि एक खूर हलताना मी पाहिला.

"....अजून जीव आहे...." गर्दीच्या दिशेने एक बातमी आली. मग "पाणी...पाणी...." असे आवाज आले. एकाएकी मंडळी चारी दिशांना फाकली. मुंबईच्या अमेरिकन कंपनीत काम करणाऱ्या एका पाशिंजरने आपला थर्मास उघडून नेला. अर्थात त्याचा थर्मास असण्याचा अमेरिकन कंपनीत असण्याशी संबंध नव्हता. परंतु तो अमेरिकन कंपनीत आहे ही गोष्ट त्याने जवळजवळ प्रत्येकाला सांगितली होती. थर्मास घेऊन तो म्हशीच्या दिशेने जाऊ लागताना वाटेत एकाने "अहो, एवढ्याशा पाण्याने काय होणार?" म्हणून तेवढेसे पाणी स्वतःच पिऊन टाकले आणि थर्मास 'फस्क्लास' असल्याबद्दल तारीफ केली.

ड्रायव्हर आणि कंडक्टर 'कुत्ता जाने आणि चमडा जाने' अशा थाटात, विड्या शिलगावून रस्त्याच्या डाव्या कडेला, अपघाताच्या जागेपासून सुमारे त्रेचाळीस फुटांवर असलेल्या (पाहा : पंचनामा) एका कल्व्हर्टच्या कट्ट्यावर बसले होते. आता म्हशीवर पाण्याचा इतका मारा सुरू झाला होता की त्यातल्या काही घागरी प्रवासी मंडळींनी वाटेतच आपली तहान भागवण्यासाठी रोखल्या नसत्या तर म्हशीच्या मृत्यूचे कारण, 'मोटारीखाली सापडून' ह्याऐवजी 'बुडून' असे नोंदले गेले असते. मघाशी रडण्याचा कार्यक्रम उरकून गेलेल्या माम्या आता पाण्याच्या घागरी घेऊन येत होत्या.

मे महिन्यातले अखेरचे दिवस. रत्नागिरीहून पहाटे पाच वाजता निघणाऱ्या एस० टी०तली ही कथा. बरोबर पाच वाजता निघणारी एस० टी० बरोबर निघाली—म्हणजे मोटारीच्या यंत्राचा आवाज पाच वाजता सुरू झाला. 'मेली ठेचेवर ठेच' म्हणत म्हणत सड्यावर आली तेव्हा सात वाजले होते. सामान्यतः हे अंतर सात मिनिटांत काटले जाते. पहिला अर्धा तास उतारूमधील वैयक्तिक आणि मग एस० टी० विरुद्ध पाशिंजर अशा सामुदायिक भांडणात कसा गेला ते कळले नाही. माझ्या शेजारच्या पाशिंजराचा मला विलक्षण हेवा वाटत होता. माझा डावा खांदा ही एस० टी०ने त्याला आंदण दिलेली उशी आहे अशी त्याने बसल्यापासून काही मिनिटांच्या आतच स्वतःची समजूत करून घेतली होती. पाचाची मोटार साडेसहाला जोरदार दणका देऊन चालती झाली तेव्हा एकदम त्याला जाग आली आणि "काय शिंची कटकट आहे.... अग ए—तू पलिकडे जाऊन पड

बघू...." असे काहीसे पुटपुटून तो जागा झालेला झोपी गेला. विश्वासाने एखाद्याने आपल्या खांद्यावर मान टाकली तर ती उतरू नये, परंतु खोल श्वासाने जर अशी मान टाकली तर काय करावे? डावा खांदा असा ह्या शेजाऱ्याने अडवलेला तर उजव्यावर एक हात येऊन पडला होता. तो उजव्या शेजाऱ्याचा आहे असे समजून मी दोनचार वेळा त्याच्याकडे त्रासिक चेहऱ्याने पाहिले. परंतु त्याचे दोन्ही हात मांडीवरची लोणच्याची बरणी सांभाळण्यात गुंतलेले दिसले. त्यामुळे हा तिसरा हात कुठून फुटला हे पाहण्यासाठी मी मान वळवण्याचे काही वायफळ प्रयत्न करून तो नाद सोडला. माझ्या पायाशी एक संपूर्ण कुटुंब आसऱ्याला आले होते. त्यांतल्या कर्त्या पुरुषाने आपले दोन्ही पंजे माझ्या मांडीवर छापापाणी खेळताना मुली ठेवतात तसे ठेवले होते. कारभारीण स्वतःच्या मांडीवर पोराला थोपटून रडे वाढवीत होती आणि माझ्या दोन्ही पायांमधून एक उंच हिराची केरसुणी माझ्या नाकपुड्या झाडत होती. ही केरसुणी उभी ठेवण्याचे कारण 'नाहीतर हीर मोडतात' असे सांगण्यात आले. ह्या अवस्थेत काही बोलण्याचा प्रयत्न करताना त्या कुटुंबातील गृहदेवतेला मोटार 'लागत' असल्याचे कळले. त्यामुळे त्या आपत्तीचे चिंतन करीत बसलो होतो. अधूनमधून खाच-खळग्यांची जाणीव पटायला नको तिथे पटत होतीच. तात्पर्य, एस० टी० मोटार ही एक प्रचंड आणि गतिमान करंजी असून तीत मुलामाणसांचे आणि सामानाचे पुरण भरले आहे, अशी एक 'नव' कल्पना मला चाटून गेली.

"बोटी बंद झाल्यामुळे हा त्रास आहे" हे वाक्य निरनिराळ्या सुरात प्रत्येकाने बोलून घेतले. ह्या साऱ्या रणधुमाळीत कंडक्टरचा पैशाचा हिशेब न चुकता तरच आश्चर्य होते. त्याने गाडीतल्या मंडळींची गिनती करायचे सातआठ फुकट प्रयत्न केले. त्यानंतर खाकी कपडे घातलेली आणखी काही मंडळी जमली. हिशेबाची पुन्हा उजळणी झाली. त्यात एका गृहस्थाने स्वतःचे अर्धेच तिकीट काढल्याचे ध्यानात आले. मग थोडी बाचाबाची झाली. ही बाचाबाची अक्षरशः बा चा बा ची होती. कारण अर्धे तिकीट काढणारा उतारू आणि संबंधित अधिकारी यांनी एकमेकांच्या 'बा'चा विभक्तीचे सर्व प्रत्यय लावून उद्धार केला. तेवढ्यात कुणीतरी घंटा वाजवली आणि पुन्हा एकदा यंत्र सुरू होऊन कसले तरी निषेधात्मक आवाज काढून

बंद पडले. एव्हाना गाडी कुठे पोचायला हवी होती यासंबंधी चर्चा सुरू झाल्या. मतामतांत फरक होता. कोणी महाडपर्यंत, कोणी घाट, कोणी संगमेश्वर तर कोणी थेट मुंबऱ्याच्या खाडीपर्यंत गेली असती असे अंदाज लावले. परंतु गाडी रत्नागिरीची हद्द सोडायला राजी नव्हती.

मघाची खाकी मंडळी आता मोटारच्या मागच्या बाजूकडून पुढल्या बाजूला गेली. मधूनच मोटारीच्या अंगात येऊन ती घुमू लागे. काही वेळ तिने कथ्थकचे तत्कारही केले आणि समेवर येऊन ती बंद पडली. "सर्विस मोटींच्या टायमाला हा तर्रास म्हंवता—" ह्या विषयावर परिसंवाद सुरू झाला. राष्ट्रीयीकरणाचा मुद्दा निघाला, खाजगी उद्योगधंद्यांवरील आक्रमण, नफेबाजी, दारूबंदी, कोयनाधरण इत्यादी ठराविक वळणांनी परिसंवादाचा निष्कर्ष "सगळा नुसता हरामखोरांचा कारभार आहे!" असा निघून हा हितकारी संवाद तुटला. मोटार मधूनच घुमत होती आणि धापा टाकत होती. माझ्या शेजाऱ्याचा माझ्या खांद्यावर विसावून चाललेल्या स्कंधपुराणाचा दुसरा अध्याय सुरू झाला होता. कारण त्याच्या श्वासांना आता सूर सापडला होता. तशी बहुतेकांच्या डोळ्यांवर झोप होती. एक तर पहाटे पाचाची बस गाठायची म्हणून मंडळींनी ब्राह्ममुहूर्तावरच घरे सोडली होती. त्यामुळे बहुतेकांच्या तक्रारीचा सूर एस० टी० उशिरा निघाली यापेक्षाही पाच मिनिटे घरी झोपलो तरी असतो हा होता.

मघाच्या राष्ट्रीयीकरणाच्या परिसंवादाच्या स्वयंनियुक्त अध्यक्षांनी आपल्या खादीच्या पिशवीतून पुस्तक काढून वाचनाचा घाट घातला होता. त्यांना कंडक्टरची स्वतंत्र सीट मिळाली होती. त्यामुळे ते सर्व घटनांचा स्वतंत्र भूमिकेवरून विचार करीत होते. बस सुरू होताना स्टँडवरच्या सर्व खाकी मंडळींनी त्यांना अत्यंत आदराने नमस्कार केला होता. त्यामुळे त्यांच्या खादीत स्वतःचे शरीरच नव्हे तर इतर अनेक गोष्टी झाकण्याचे सामर्थ्य असावे हे धूर्त पार्शिजरांच्या लक्षात आले. सड्यावरच्या टोलनाक्यापर्यंत गाडी येऊन थांबली. इथे काही मोसंबी विकायला आली होती. पुढल्या रांगेतल्या एका गृहस्थांनी दोन मोसंबी घेतली आणि अर्धे मुसुंबे सोलून त्यांना दिले त्या वेळचे त्यांचे नम्र आणि विशाल हास्य कुठल्याही टूथपेस्टच्या कंपनीला उपयोगी पडले असते.

सुमारे दोन तासांच्या खोळंब्यानंतर एस० टी०ने वेग घेतला. तशा भाऊगर्दीतही मंडळींना एक स्थैर्य आले. बहुतेकांनी उरलेल्या झोपेची थक-बाकी गोळा करायला सुरवात केली. हातखंब्याचा फाटा डावलून मोटार मुंबईच्या दिशेला लागली तेव्हा जनतेतर्फे मी जागा होतो आणि एस० टी०च्या वतीने ड्रायव्हर. बाकीचे ते सारे धावते विश्व झोपी गेले होते. प्रत्येकाच्या झोपण्याच्या स्वतंत्र तऱ्हा होत्या. बसच्या धक्क्याने बहुतेक मंडळी होय होय नाही नाही म्हणत झोपत होती. कुणी झोप चाखत होते, कुणी गिळत होते. कुणी निर्धाराने झोपत होते. कुणी मधूनच उघड्या डोळ्यांनी उडालेल्या झोपेला परत बोलावीत होते. कुणी डुलक्या घेत होते, तर कुणी शेजाऱ्याच्या डुलक्या झोपेतल्या झोपेत परतवीत होते. काही वेळाने एक बसचे म्हणून विशिष्ट अंतर्गत वातावरण असते ते तयार झाले. ऋषिपंचमीला जशी अनेक भाज्या उकळून एक भाजी तयार होते तशा स्वरूपाची एक 'भाजी' त्या गतिमान हौदात वाढत्या उन्हाबरोबर शिजून तयार होऊ लागली. खुनाला वाचा फुटते तसा फणसाला, सुक्या मासळीला आणि स्त्री-प्रवाशांच्या वेण्यांतल्या फुलांना वास फुटून त्यांचा एक सामुदायिक वास तयार झाला. शिवाय कोकणातला प्रवास भलताच वळणदार. त्यामुळे गाडीला एका अर्थाने लागणारी वळणे प्रवाशांना निराळ्या रीतीने लागू लागली. आणि मग लिंबाच्या फोडी, जिनतानाच्या गोळ्या, आल्याच्या वड्या वगैरे प्रकारांची देवघेव सुरू झाली.

आता खादीधारी बंधूंची झोप झाली होती. पुन्हा त्यांनी पुस्तकात डोके घातले. माझ्यासमोर एक बुशकोट आणि एक बंद गळ्याचा डगला बसला होता. डगल्याशेजारी एक सुंदर खाशी नसली तरी सुबक ठेंगणी बसली होती. (बहुधा मुंबईला दाखवायला नेण्यात येत असावी.) त्यांच्यापलिकडे राजिवड्यावरचा उस्मानशेठ आणि त्याची फ्यामिली. मे महिन्यात आंबे खायला त्यांची सोकरी आणि जमाई आले होते आणि परत जाताना त्यांना सोबत म्हणून उस्मानशेठ मुंबईपर्यंत निघाले होते.

"मंग आमचे जमाय जुनांन आफ्रिकेला जातीन—सोकरीची भेटगांठ होनं मंग पांचसा वर्सं मुस्किल—" हे त्यांचे मुंबईला जायचे कारण होते. मधू मलुष्टे सुटी संपवून कॉलेजात शिकायला निघाला होता. बाकी बहुतेक

'मानस ' गिरनीतसून रजा घेऊन आलेली ती परत 'हुंबय' ला निघाली होती. मी मात्र दरवर्षीप्रमाणे 'का आलो ?' ह्याचा विचार करीत परत चाललो होतो. कोकणात जाताना 'का चाललो ?' हा विचार आणि परतताना 'का आलो ?' हा विचार, ह्यापलिकडे कोकणप्रवासात दुसरा विचार मला सुचत नाही.

मंडळींच्या झोपा हळूहळू उडत होत्या. माझा डावा खांदा मोकळा होत होता. दोन्ही खांद्यांवर मिळून एकच डोके देण्यात ब्रह्मदेवाने आपली चारी डोकी चालवल्याच्या आनंदात मी होतो आणि तेवढ्यात ही म्हैस आली.

मघाशी इतस्ततः पांगलेली दहाबारा मंडळी आता म्हशीच्या दिशेने धावली. म्हशीचा मालक आणि मालकीण अपघाताच्या जागेवर (पंचनाम्यातला शब्द) आली होती. "माजी गोऽऽ चांदीऽऽ" ह्या ध्रुवपदाने पुन्हा एक आक्रोश सुरू झाला. अधूनमधून "धा शेर गो दूद देईत होती." अशी कडमी ऐकू येऊ लागली. मेल्या म्हशीला मणभर दूध असल्यामुळे अर्धमेल्या म्हशीला वीस शेरांपर्यंत न्यायला हरकत नव्हती. परंतु म्हैस कोकणातली असल्यामुळे हा दहा शेराचा हिशेबदेखील आतापर्यंत तिने दिलेल्या दुधाचा असावा असा एक विचार माझ्या मनाला चाटून गेला. मालकमालकिणीच्या भोवती आता मंडळी जमली. पाशिंजर मंडळीतला बुशकोट हा डॉक्टर निघाला. त्याने म्हशीच्या जखमांवर औषधे सुचविली.

"हां—हात लावूं देनार नाय! फोलिस येऊन बघून जांवूं देत."

पोलीस!—ह्या परिणामाची कल्पना कोणाच्याच डोक्यात आली नव्हती.

"बरावर—आक्षिजन हाय नाय? पंचनामा झाला नाय तवर गाडी हलायची नाय—" एक जाकीट आणि काळी टोपी बोलली.

पंचनामा, पोलीस वगैरे शब्द ऐकल्यावर एकदोन अनुभवी मंडळींनी टपावरून आपले बिस्तरे उतरून रस्त्याच्या नैर्ऋत्येला असलेल्या (पंचनाम्यावरून मिळवलेली माहिती!) एका झोपडीच्या ओसरीवर आणून पसरले.

"चार तासांची निश्चिंती झाली बगुनाना—" पथारीवर शांतपणे देह उलगडीत ते अनुभवी गृहस्थ उद्गारले.

"चार तास? खुळा की काय तूं बेंबटया—रे, मागं हातखंब्यास कोंबडी मारलीन यष्टीन त तीन तास खाळ्ळीत सगळ्यांचे! हितं त अखंड म्हस

आहे—हो आडवा संध्याकाळपत्तर!" बगुनानांनी आडवे होता होता आपले मत दिले.

ऊन रणरणू लागले. मंडळी सावल्यांचा आश्रय शोधीत होती. अनोळखी मंडळी आणि अनोळखी गाव. एकमेका साह्य करून कुणी पाण्याच्या शोधार्थ निघाले. विड्याकाड्या अदलूबदलू लागल्या. चंच्यांच्या नाड्या सुटल्या. तेवढ्यात एकाने जांभळेही पाडायला सुरवात केली.

"अशी जखम वाहात राहिली तर म्हैस पंधरावीस मिनिटांत मरेल!" बुशकोटवाले डॉक्टर पुढाऱ्यांना पटवून देत होते.

"मेली तर परवा नाय हो! पन यष्टीवाल्यास हिसका दावीन तर नांवाचा धर्मा मांडवकर."

म्हशीच्या मालकाचे नाव धर्मा मांडवकर एवढी नवीन माहिती मिळाली. तेवढ्यात उस्मानशेठना काय हुक्की आली कोण जाणे, त्यांनी कुठले तरी एक कारटे पकडून त्याला जांभळीच्या झाडावर चढवले आणि टोपलीभर जांभळे काढून घेतली. आणि मग चतुर मंडळींनी उस्मानशेठना हरभऱ्याच्या झाडावर चढवून आपापल्या जिभा जांभळ्या करून घेतल्या. त्या निमित्ताने जांभूळ आणि त्याचे औषधी गुण ह्या विषयावर जांभळीच्या सावलीत आणखी एक अत्यंत उद्बोधक परिसंवाद सुरू झाला. अध्यक्षस्थानी पुढारी होते हे सांगणे नलगे! मधुमेह, पंडुरोग वगैरे परिचित शब्द कानी पडताच डॉक्टर तिथे धावले.

"मधुमेहाला वर्षभर जांभळं खातीत—" एक मत व्यक्त झालं.

"पण वर्षभर जांभळं मिळणार कुठे?" एक पृच्छा.

"पण जांभळाचा जंबुकासव की काही असाच एक रस मिळतो." निरसन!

"पण इन्शुरन्सचे इंजेक्शन हा एकमेव उपाय." उपसूचना.

"इन्शुलिन!" दुरुस्ती.

"हीं इंजेक्षनं सत्यानाश करतांहेत, वास्तविक आंयुर्वेदांत...." एक सानुनासिक वेदाभिमान वदला. शेवटी वनस्पतींचा वैद्यकीय उपयोग ह्या विषयावर अनेक मते व्यक्त झाली.

"अहो, कोकणांतलीं जंगलं म्हणजे डिस्पेन्सऱ्या समजा! दम्यापासून राजयक्ष्म्यापर्यंत सगळ्यांवर मुळ्या आहेत."

"पन म्हायती पायजे."

"अहो, कसल्या मुळ्या घेऊन बसलां आहांत?" डॉक्टरांनी तोंड उघडले. इतका वेळ ते जांभळे खाण्यात गुंतले होते. सुमारे सहासात मिनिटे अगम्य भाषेत ते बोलले आणि ते स्वतः होमिओपथी डॉक्टर आहेत एवढे मंडळींना कळले.

"म्हशींना चालत्ये काय हो तुमची होमेपदी?"

होमेपदी हा पंचपदी किंवा अष्टपदीतलाच एखादा प्रकार असावा अशी पृच्छकाची समजूत दिसली.

"अहो, म्हशीला कशी होमेपती चालेल?"

"कां नाहीं चालणार? माणसाला चालत्ये तर म्हशीन् काय घोडं मारलंय? —पथ्य पाळलंनीत म्हंजे झालं! काय हो डॉक्टर?"

डॉक्टरनी नुसते जांभूळ गिळून बी थुंकण्यापलिकडे काही केले नाही.

"तुमच्या होमेपदीचीं पथ्यं मात्र कडक हो!—काफीचं आणि तुमचं एवढं हो कां वाकडं?"

"कॉफीत व्यानिन नांवाचं विष असतं." बोलणारे गृहस्थ मास्तर असावे. कारण चुकीची माहिती त्यांनी अत्यंत आत्मविश्वासाने सांगितली. माझ्या खांद्यावर मान टाकणारे हेच ते!

"काफीत व्यानिन असतं म्हणून कुणी सांगितलं तुम्हांला? व्यानिन चहात असतं. काफीत काफिन की काय असतं—का हो डॉक्टर?" डॉक्टरांनी उत्तरादाखल आणखी एक जांभळाची बी थुंकली.

"वाटेल ते बोलू नका." मास्तर गरम होऊन म्हणाले, "कॉफिन म्हणजे ख्रिस्ती लोकांची शवपेटिका!" त्यांनी 'शवपेटिका' हा शब्द अशा थाटात उच्चारला की त्या उच्चाराने कॉफीत नक्की काय असते हा वाद एकदम मिटला. आणि मंडळी जांभळाचे गुणधर्म पुन्हा चाखून पाहू लागली.

एवढ्यात रस्त्यालगतच्या झोपड्यांच्या दिशेकडून चारपाच खाटा घेऊन गावकरी मंडळी येताना आढळली. अचानकपणे हा अपघातात सापडलेल्या उतारूंची ग्रामस्थ मंडळी इतक्या आपुलकीने दखल घेऊन त्यांची बसायचीच नव्हे तर झोपायचीदेखील सोय करतील हे कुणाला स्वप्नातही खरे वाटले नसते.

"माणुसकीचे अंश जर आज कुठे टिकून राहिले असतील तर ते खेड्यात!" ज्यूनियर बी० ए०च्या वर्गात गेलेल्या मधू मलुष्टयाला कंठ फुटला. त्याने भोवती चारपाच लोकांचे कोंडाळे जमवले होते. त्यात सुबक ठेंगणी आणि तिचे वडील होते. सुबक ठेंगणी मधूकडे स्वतःच्या पापण्यांची पिटपिट-पिटपिट अशी अकारण उघडझाप करीत पाहात होती. त्यामुळे मधूलाही अवसान आले असावे.

"तंबाकूवाल्या मलुष्टयाचा काय रे हा!" बगूनानांनी कुशी बदलून शेजारच्या पथारीवर सांडलेल्या बेंबट्या दामल्याला प्रश्न केला. परंतु बेंबट्या दामला झोपेत केव्हाच हरवला होता. त्यामुळे तिसऱ्याच कोणीतरी "होयसा वाटतो! कालिजात शिकतोय मुंबयला" असा खुलासा केला.

"कालिजांत काय हल्लीं पट्टेवाल्सुद्धां जातात!" असा एक अकारण हिणकस शेरा मारून मधल्या आळीचे नाव राखीत बगुनाना झोपेची आराधना करू लागला.

"आज माणूस माणसाला पारखा झालाय." खाटा जसजशा जवळ येत चालल्या तसतसा मधू पेटत चालला होता. "दुरावा जर कुठं नसेल तर तो खेड्यात. इथं अजून चाड आहे—आपुलकी आहे—" आणखी काहीतरी आहे म्हणून त्रिकाराचे वजन त्याला साधायचे होते. परंतु आयत्या वेळी चाड आपुलकीच्या गोत्रातला तिसरा शब्द त्याला आठवेना. त्यामुळे उगीच ठसका लागल्यासारखे करून तो जवळ येणाऱ्या खाटांच्या दिशेने पाहू लागला. खाटवाली मंडळी माणसांच्या दिशेने न जाता म्हशीच्या दिशेने जाऊ लागली तेव्हा समस्तांस अचंबा जाहला. खेड्यातली माणुसकी म्हशीला खाटेवर झोपवण्यापर्यंत जाऊन पोचली असेल याची कोणालाही कल्पना नव्हती. त्यामुळे आता ही मंडळी म्हशीला उचलणार कशी आणि खाटेवर झोपवणार कशी!—ह्या कुतूहलाने सर्व उतारूंचा घोळका पुन्हा एकदा मोटारीसमोर जमला. पण तशातला काही 'चिमत्कार' पाहायला मिळाला नाही. म्हशीच्याभोवती खाटा उभ्या करण्यात आल्या, त्यांवर कांबळ्या टाकून एक आडोसा तयार करण्यात आला आणि गोषातील सुंदर स्त्रियांच्या थाटात म्हैस खाटा-कांबळ्यांच्या आडोशात गेली.

हा सारा प्रकार ती उघड्या डोळ्यांनी पाहात होती. आपली ही सरबराई पाहून मधूनच ती लाजल्यासारखीही झाली. एकूण हा सारा खटाटोप म्हशीला ऊन लागू नये आणि जखमांवर माश्या बसू नयेत म्हणून झाल्याचे कळले. अशा रीतीने म्हैस एकदाची घोंगडी-नशीन झाल्यामुळे यापुढे काय होणार याच्या विवंचनेत उतारू पुन्हा एकदा आपल्या भवितव्याविषयी चर्चा करू लागले.

"काय डायवरसाहेब, गाडी हलनार कदवां?"

"म्हैस हलवल्याशिवाय मी काय करू?"

"मी म्हशीला हात लांव देनार नाय!" मालक गरजला.

"म्हणजे, आम्ही काय इथेच पडून राह्यचं?"

"आनि माजी म्हस मेली तर भरून कोन देनार माजी लुसकानी? सांगा! फोलीस येयूल, पंचनामा होयूल तंवा काय तां होयूल—काय गाववाल्यानूं? मी म्हन्तां तां खरां का खोटां?"

"पण आता खेड्यात पोलीस यायचा कुठून?"

"हितना दोन कोसांवर आउटपोष्ट हाय!"

"पोष्टांत पोलीस काय करतोय?" मास्तरांनी शंका काढली.

"अहो, पोष्ट वायलां ना आऊटपोष्ट वायलां. तुमच्यासाऱ्या जंटलमेण लोकांनला हें बी म्हायती नाय?" गावकऱ्यांचा मुखेल बोलला. मास्तर वरमले.

"पण पोलिसला कळणार कसं इथं आक्सिडेंट झालाय ते?"

"अर्जुना गेलाय नाय त्याला बोलवायला?"

"अर्जुनाला कशाला धाडलास? कंडम मानूस तो! तो फोलीसच्या संगती कवड्या खेळत बसणार!"

"त मंग कोनवच जायला तय्यार नाय त काय म्हैशीला हतं टाकून मी जांव? आणि डांबिसपनान म्हैशीला बाजू करून यष्टी गेली हकडसून त?" मालकांनी सवाल टाकला.

"हां—तां पर खरांच! यष्टीवाल्याचा भरोंसा नाय!"

"अहो, असं काय म्हणता?"

"साहेब—मापी करा हो—पर तुमचां बोलयाचा काम नाय. अहो, ह्या म्हैशीवर पोट हाय मांडवकराचां."

"आठशी रुपयाचा कर्ज काढून म्हस आनली मी. अजून सा म्हयने नाय झाले. आता मानेचा हाड मोडलां तिचां—"

"मानेचं हाड नाहीं मोडलं—मघाशी मान उचलतांना मीं पाहिलं—"

"अहो, तशी उचलली असेल मान म्हंजे काय हाड मोडला नसेल? गळयावरून आख्खी यष्टी गेली तिच्या—"

"गळयावरून एस० टी० गेली असती तर गळयाचे दोन तुकडे झाले असते मिष्टर! काय वाटेल ते काय बोलता?"

आता वाढते ऊन आणि त्याहून वाढती भूक बोलू लागली होती.

"मी स्वतः बसलो होतो समोर—नुसता बॉनेटचा धक्का लागला आणि आडवी झाली म्हैस."

-"मग रस्त्यांत आडवी पडून न्हायची म्हशीला काय हौस आली काय? तुमी पन कमाल करतां हां साहेब! माझ्या हातांन बगलां मी—पाठीच्या हाडाचा चकनाचूर झालाय!"

"हे म्हणतात मानेचं हाड—तुम्ही म्हणतांय पाठीचं हाड."

आता उतारूंनी आपली संयुक्त आघाडी उघडली आणि गावकऱ्यांनीही आपली फळी उभी केली.

"मग मोटारचा धक्का लागला त काय निस्ती मानच मोडेल?" गावकरी पक्ष.

"अहो, पण इतकी हाडं मोडली तर म्हैस ओरडणार नाय?" उतारू पक्ष.

"जिभेचं हाड मोडलं असेल!" तशात एक विनोद आणि उतारू पक्षात हशा.

"हसायाचा काम नाय. तुमची म्हस असती म समजलं असतं—"

"पंधरा शेर दूद देत होती—"

"कोकणातल्या म्हशींनी पंधरा शेर दूध दिल्याचं ऐकलंय कुणी?"

"काठेवाडी म्हस हाय!"

"काठेवाडी म्हशी याच्यापेक्षा कितीतरी थिप्पाड असतात. काठेवाडी म्हशीला एस० टी०चा धक्का लागला तर एस० टी० मोडेल. उगाच काय काहीतरी घेऊन बसलाय?"

"फार तर आम्ही चारचार आणे वर्गणी काढतो इथल्या इथे—काय दवापाण्याला खर्च येईल तो करा आणि जाऊ द्या गाडी—" तडजोडीचे एक कलम मांडण्यात आले.

"अहो, पण खर्च लागतोय कशाला? चिपळूणला गुरांचा सरकारी दवाखाना आहे. फुकट औषध मिळेल."

"चिपळूण किती दूर आहे हो इथून?"

"बावीस मैल!"

"मग बैलगाडीत घालून न्या म्हशीला—"

"नाहीतर एस० टी०च्या टपावर टाका म्हैस आता—"

"पण कां म्हणून?" उतारू पक्षातून मधू मलुष्टे फुटला. "गरीब झाले म्हणून तुम्ही फसवू शकत नाही त्यांना! त्यांचं नुकसान झालं आहे. एस० टी०नं नुकसान भरून दिलं पाहिजे...."

"पण तोपर्यंत आपण काय रस्त्यात पडून राहायचं?"

"तो प्रश्न म्हशीच्या मालकाचा नाही, तुमचा आहे." सुबक ठेंगणीकडे एक तडफदार दृष्टिक्षेप टाकीत मधू उद्गारला.

"आधी या म्हशी अशा रस्त्यात सोडतातच का?" मास्तरांनी पुन्हा तोंड घातले.

"रस्ता पब्लिकचा हाय. म्हस येयल नायतर रेडा येयल. तुमी अडवणार कोन?"

"खोळंबा होतोय हे मी मान्य करीन. पण इथे वैयक्तिक सोयगैरसोय पाहून चालणार नाही." मधू त्या ढंगात आणखी काही वेळ बोलला असता पण कोणीतरी दूर पाहात म्हणाला,

"हवालदार इलोसो वाटता—"

दोन्ही पक्ष त्या दिशेने बघू लागले. सुमारे फर्लांगभर अंतरावरून दोनतीन माणसे येत होती. तेवढ्यात चिपळूणच्या दिशेने जाणारी दुसरी एक एस० टी० आली. त्यातल्या प्रवाशांनी डोकी काढून, काय प्रकार आहे, त्याची साद्यंत माहिती मिळवली. आणि "चला म्हणजे तुमची चारपाच तासांची निश्चिती झाली!", "आता संध्याकाळी कसले पोचताय मुंबईला! उद्यापर्यंत पोचलात तरी मिळवली—" इत्यादी शुभ बोलून गाडी पुढे

गेली. दोन्ही ड्रायव्हरांचे तेवढ्यात काहीतरी गुफ्तगू झाले. आणि म्हैस-प्रकरणाचा निकाल लागेपर्यंत दुसरी गाडी चिपळुणाहून पाठवण्याचा निरोप गेला. ह्या सर्व कार्यक्रम होईपर्यंत ती दोनतीन माणसे अपघाताच्या ठिकाणी येऊन ठेपली. त्यांच्यापैकी पोलीस कुठचा याचा चटकन अंदाज लागेना. त्यातल्या त्यात टर्रेबाज दिसणाराच पोलीस असावा ह्या समजुतीने पुढारी पुढे सरसावीत त्याच्याकडे पाहून हस्तिदंती करीत म्हणाले,

"हं—लवकर पंचनामा करून एकदा सोडवा आम्हांला."

"ते आमाला काय सांगतांव?—ह्यानला सांगा." दुसऱ्या इसमाकडे बोट दाखवीत तो म्हणाला, "खालीपिली आमची मात्तर रक्काडपट्टी झाली. चौकीत हवलदाराचा पत्याच नाय. मग इनिसपेटरसायबांचे आडली-साहेब आलूते त्येनूलाच घेऊन आलांव्!"

"म्हंजे? चौकीत पोलीस नाय? मग इतका टायम तू काय करीत व्हतास रे अर्जुना...."

"हज्जामती!" अर्जुनाने तिरसटपणाने उत्तर देऊन धर्मा मांडवकराला चीप केले. "हवलदार गेला चिपळूनला इनिसपेटरसायबासंग—बरां त बरां, आडलीसायब होते...."

मग गावकरी मंडळींनी ऑर्डर्लीसाहेबांना रामराम घातला. बाराचा सुमार झाला होता. ऑर्डर्लीसाहेबांचा चेहरा झोपेतून उठलेल्या माणसासारखा भलताच जड होता. त्यांच्या चेहऱ्यावरून एक तर रात्री त्यांची झोप झाली नसावी किंवा रात्री जरा जास्त 'झाली' असावी अशी पुसट शंका बहुतेकांना आली. तोंडातल्या पानाची एक भक्कम पिंक कुणाच्या अंगावर पडेल याची तमा न बाळगता गर्दीतच थुंकून डोक्यांइतक्याच जड आवाजात त्यांनी पहिला पोलिशी सवाल केला,

"डायवर् कोन हाय?"

"मी—" ड्रायव्हर पुढे आला.

"लायसन बघू—" ड्रायव्हरने 'लायसन' त्याच्या हाती दिले. उमेदवार ज्योतिष्याने जन्मकुंडली पाहावी त्या थाटात आडलीसाहेबाने 'लायसन' पाहायला सुरवात केली. इतर जिज्ञासू मंडळीही आडलीच्या खांद्यावरून डोकावून लायसन पाहू लागली.

इतक्यात विरुद्ध दिशेने जाणारा एक ट्रक आला. मग ट्रक-ड्रायव्हरने चौकशी करून स्वतःचे समाधान करून घेतले. आणि—

"आदमी मर जाता तो कोई पूछता नहीं. भैंस मर गई तो क्या इतना —आपसमें मिटा लो यार...." असा सल्ला देऊन खंडीभर धुरळा चारून रस्ता सुधारला.

"नाव काय?" ऑर्डलींने प्रश्न केला.

"ते काय लायसन्सवर लिहिलं आहे की—शिवराम गोविंद—" मधूने नाव वाचले.

"साहेब, तुम्ही लोक जरा बाजूला व्हा बगू....मी ड्रायव्हरशी बोलतो—"

"पण लायसन्सवरचं नाव वाचून पुन्हा त्याला नाव विचारण्यात पॉइंट काय?" मधू हुज्जत घालू लागला.

"आमाला आमच्या लायनीप्रमाने जाऊ दे. मदी मदी बोलायचां काम नाय!" भाषेत अस्सल पोलिशी गुर्मी होती.

मधू हिरमुसला. सुबक ठेंगणी आसपास नव्हती एवढीच समाधानाला जागा.

"इंग्लिश वाचता येत नाही तर तसं सांगा." उसने अवसान आणून त्याने ऑर्डर्लीला छेडले.

"काय वाचता येतं नि काय नाय ही आमची प्रायवेट गोष्ट आहे. मला बेकार शानपना पसन नाय—मी सांगतो—हां!" इंग्रजीचा ब्रात ऑर्डर्लीसाहेबांना नाही म्हटले तरी जरासा लागलाच. कारण ह्या वाक्यानंर पुन्हा एकदा ते जे थुंकले त्या थुंकण्यात रुबाब होता. "ए शिवराम गोविंद, नाव सांग."

"तेच आहे!" ड्रायव्हरच्या बोलण्यात आदबी आणि बेफिकिरी यांचे मुष्कील मिश्रण होते.

"तेच म्हणजे काय?"

"शिवराम गोविंद!"

"म सिद्धा बोल. अडी कशाला करतोस—आड्रेस बोल."

"पारल्याची चाळ, खिमजी-भूमजी इष्ट्रीट, बॉम्बे नंबर टेन."

"पण हवालदारसाहेब, तुम्ही रीतसर पंचनामा का नाही करीत? तीन तास खोळंबा झाला आमचा."

"हे पाहा साहेब—मला माझ्या लायनीपरमान चाललं पायजे."

"पण फजरशी आमची हिते उनान निस्ती तरफरतरफर चालली हाय ना—" उस्मानशेठ पुढे सरसावले. "बच्चे लोकान्ला पिवायला दूदबी नाय हे गावात."

"अशे यष्टीवाले म्हशी मारू देत—मग दूद गावनार कुट्न?"

"अरे पन ऐस्या कितक्या म्हेशी मारल्या?" उस्मानशेठ कोसळले.

"हवालदारसाहेब, तुमी सवाल-जबाब काय ते पुसा आनी कागजावर लिवून काय ति मोकलीक करा ना पासिंजर लोगांची. काय मंडली, मी म्हनतो ती गोष्ट सची का नाय? एव्हाशी महार येऊन पन गेला आसता—"

"अरं वा! महाराला मेल्याशिवाय म्हस देऊ काय?" धर्मा उखडला.

"अवो तो म्हार नाय, महार गाव—"

"महाड—महाड म्हणायचंय त्यांना—"

"हा—मंग मी काय म्हनालो? महारच—पोचली नसती गारी? सकालपासून बेकार रखरपट्टी?"

"रखडपट्टी काय मी केली?" ऑर्डर्लीची झोप आता उडाली होती.

"तुम्ही केली म्हनायला दारू खावन नाय बसलांव आमी यष्टयेंत—" एक उतारू म्हणाला. पोलिसाबद्दलचे भय आता चेपले होते. इसापनीतीतल्या बेडकांना ओंडक्याचे भय वाटेनासे झाल्यावर ती त्याच्या अंगावर उड्या मारू लागली तशी उतारू मंडळी ऑर्डर्लीच्या अंगावर येऊ लागली.

"नाहीतर काय? अक्सिडेंट होऊन चार तास झाले—पोलिसचा पत्ता नाही—काय पोलीस आहेत की चेष्टा? पब्लिकचा पैसा घेऊन पगार खातात—"

"ज्यादा बोलायचं काम नाय!" ऑर्डर्लीने दम दिला.

"का नाही?" मधूने जनतापक्ष स्वीकारला. "अपघाताच्या ठिकाणी पोलीस का नसावा? तुम्हांला बोलावणं पाठवावं लागतं? इथे अपघात *झाला म्हणजे काय मुंज झाली काय कोणाची?"*

"पण मी काय बरम्देव आहे? मला काय सप्न पडलं काय तुम्ही म्हैस मारनार म्हनून—"

"आम्ही कुठे म्हैस मारली?"

"तुमच्या यष्टीनी मारली."

"आमची यष्टी?" मास्तरांनी रिंगणात पुन्हा प्रवेश केला. "अहो, मोटार चालू असताना वाटेत म्हैस आडवी आली तर म्हैस मरेल नाहीतर काय दूध देईल?"

"खरं म्हणजे ड्रायव्हरची काही चूक नाही. चूक म्हशीची आहे."

"म्हशीला काय अक्कल!" धर्मा मांडवकर.

"म्हशीला नाहीतर तुम्हांला पाहिजे. म्हैस अशी गोठ्याबाहेर सोडता कशाला?"

"मंग चरायला कुठ सोडू? मुंबैवाले शाळेत म्हणून काय पायजेल ती टायली कराल काय?"

"म्हशीचा मालक कोण आहे?" आडलीसायबांनी पुकारा केला. "तुजं नाव?"

"धर्मा मांडवकर."

"बापाचं नाव?"

"येश्या !—मयत." धर्मा कोर्टाबिर्टात जाऊन आलेल्यांपैकी असावा. त्यामुळे मयत वगैरे शब्दांशी त्याचा परिचय दिसला.

"हवालदार—पंचनामा सुरू करा." बगुनाना खोचण सावरीत गर्दीत घुसले. "उगीच वेळ नको जायला."

"साहेब—मला माझ्या लायनीन् जाऊ दे. ही म्हैस तुमी आहे?"

"माझी?" बगुनानांचे खोचण पुन्हा सैल झाले. "मुंबईत म्हैस घेऊन करू काय?"

"तुम्ही मदीमदी मला हाल्ट करू नका—ए मांडवगने—"

"साहेब, मांडवकर आहे त्याचं नाव—" उतारूंनी चूक दुरुस्त केली.

"तुमी पार्सिजर लोक लांब जा बगू."

"जातो—पण आमची सुटका करा ना लवकर—"

"त्याला टायम लागेल." ऑर्डर्ली शांतपणे म्हणाला.

"टाईम कशाला!—कागदबिगद तर आणलाय—चटचट स्टेटमेंट लिहून घ्या. ड्रायव्हरचं—"

"आमाला पावर नाय ती—"
"म्हणजे तुम्ही पोलीस नाही?"
"पोलीस नाय तर काय चोर आहे?"
"मग पंचनामा कां नाय करत?"
"पावर नाय!"
"मग कोणाला आहे पावर?"
"सबइनिसपेटर साहेबान्ला—"
"मग त्यांना का नाय आनला संगती? तुमी काय म्हशीची तव्येत बगायला आले?" आता जनता हळूहळू चिडायला लागली.
"म्हणजे सबइन्स्पेक्टर आल्याशिवाय पंचनामा नाही?"
"नाही!"
"ते केव्हा येणार?"
"ते चिपळूनला गेले हायत!"
"पण म्हणजे ते चिपळूणहून येईपर्यंत आपण हलू शकत नाही? ड्रायव्हर, तुम्ही घ्या गाडी रिवर्स—आणि काढा उजव्या बाजूनी. काय होईल ते जाईल." पुढारी बोलले.
"हो!—उद्या प्रसंग आला तर आम्ही आहोत. चला मंडळी."
मंडळी गाडीत घुसायला लागली. ड्रायव्हर मख्खासारखा उभा होता. शांतपणे खिशातून दोन विड्या काढून त्याने एक स्वतः शिलगावली आणि दुसरी कंडक्टरला दिली.
"ऐका ड्रायव्हरसाहेब आमचं!" एक सूचना झाली.
"अहो, ऐका काय? माझं लायसन ह्यांच्या हातात. गाडी हलवू कशी?"
"किती वाजता झाला आक्षिडण?" ऑर्डर्लीने पुन्हा चौकशी सुरू केली.
"का हो? पावर नाही पंचनामा करायची तर फालतू प्रश्न कशाला विचारता?—सबइन्स्पेक्टर येईपर्यंत एक झोप काढून या चौकीतून—"
"कुठल्या मुहूर्तावर निघालो होतो देव जाणे...."
मंडळीदेखील आता प्राप्त परिस्थितीला शांतपणे, 'ठेविलें अनंतें'च्या चालीवर तोंड द्यायला तयार झाली होती. कुणी विड्याकाड्यांच्या देवघेवीत

गप्पांचे अड्डे मांडले. मधू मलुष्ट्याने तेवढ्यात 'सुबक ठेंगणी'च्या वडलांशी ओळख काढून आपले कॉलेज, ऑनर्सचा भयंकर डिफिकल्ट कोर्स, प्रोफेसरांना नॉलेज कसं नसतं, इत्यादी चर्चा सुरू केल्या होत्या. बगुनानांनी तीनचार निरनिराळ्या गटांतून बदल्या करून घेत दुपारचे जेवण पदरात पाडून घेतले होते. उस्मानशेठच्या ॲल्युमिनियमच्या डब्यातले आम्लेट खाताना सर्व धर्म सारखे कसे आहेत हेही सांगून ते मोकळे झाले, आणि मास्तरांच्या बासनातले दहीपोहे मटकवायला पुढे सरकले. 'आठपंधरा दिवसांचा मुक्काम ठरला.' अशा थाटात मंडळी विसावली होती. ऑर्डर्ली-साहेबांच्या तोंडातदेखील कुणाची तरी सिगारेट आणि शर्टाच्या खिशात आणखी एक माचीस जमा झाली होती. तास दीडतास असाच सुस्तीत गेला आणि लांबून मोटारचा हॉर्न ऐकू आला. चिपळूणच्या दिशेने एक एस० टी०ची 'पिकप' येत होती. "साहेब आले वाटतं." ड्रायव्हर उद्गारला. मंडळी पुन्हा रस्त्यावर आली. तोपर्यंत अपघाताच्या जागी ती गाडी येऊन थडकली. त्यातून एकदोन एस० टी० साहेब, एक इन्स्पेक्टर, एक हवालदार आणि एक पशुडॉक्टर वगैरे बाहेर पडले.

ऑर्डर्लीसाहेबाने चलाखीने तुमानीत लोंबती पैरण टाकली आणि साहेबाला सलाम ठोकला. ड्रायव्हर आणि एस० टी० साहेबांची बातचीत सुरू झाली. इन्स्पेक्टर आलेले पाहताच उतारू मंडळीतली उस्मानशेट, पुढारी, मास्तर, मधू मलुष्टे, बगुनाना, बेंबट्या दामले वगैरे प्रतिष्ठित मंडळी पुढे सरकली.

"वुई हॅव बीन हेल्ड अप हिअर फॉर मोर दॅन हाफपास्ट सिक्स अवर्स युसी—"

सुरवातीला मधू मलुष्ट्याने फौजदाराच्या तोंडावर इंग्रजी मारले. फौजदाराने माशी झटकावी तसे मधूला झटकून आपल्या अस्सल पोलिशी आवाजात बोलायला सुरवात केली, "ड्रायवर कोण आहे?"

"मी!"

"लायसन्स—"

ऑर्डर्लीसाहेबाने लायसन्स दिले.

"हं!" लायसन्स हातात घेऊन इन्स्पेक्टर, एस० टी० साहेब, ड्रायव्हर

आणि मांडवकर पुढे आणि मागून इतर अशी एक मिरवणूक म्हशीपर्यंत निघाली.

"टेप काढा!" फौजदारांनी हुकूम सोडला. हवालदारांनी टेप काढली. "हं, म्हैस कुठे आडवी आली?"

"सायब मी सांगतांव—"

"तू चूप बैस! हं—ड्रायव्हर शिवराम गोविंद ना? हं सांग—"

"मी वीसच्या इस्पिडनी चालली होतो....त्या टोकाच्या आंब्याकडे गाडी आली तवा म्हैस बाजूला होती—यकदम आडवी आली—"

न सांगता हवालदार टेप घेऊन आंब्याच्या झाडाकडे धावले. दुसरे टोक धरून ऑर्डर्लीसाहेब म्हशीपर्यंतचे अंतर मोजू लागले. टेपवरचे आकडे दोघांनाही दिसत नव्हते. त्यामुळे तेच तेच अंतर एकदा शंभर यार्ड तर एकदा पंचवीस फूट असे व्हायचे. शेवटी पन्नास कदम, पाच कदम अशी भाषा सुरू झाली. त्यानंतर दोघेही चारी बाजूंची अंतरे मोजीत होते.

"हं, ब्रेक कुठे लावला? ब्रेक तपासा." शेवटला हुकूम एस० टी० साहेबांना होता. "म्हशीच्या जखमा बघा, डॉक्टरसाहेब." एस० टी० साहेब मोटारच्या जखमा बघू लागले आणि डॉक्टर म्हशीच्या!

"काय हाडबीड मोडलंय?"

"ते इथं सांगणं कठीण आहे! एक्स-रे घ्यावा लागेल."

"अस्सं—म्हणजे म्हशीचादेखील एक्स-रे निघतो का?"

पुढारी सकौतुक म्हणाले, "पूर्वी हे नव्हतं. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर ह्याबाबत आपल्या देशात फारच झपाट्यानं प्रगती झाली—" आणि मग चार गाफील मंडळींना पकडून 'स्वातंत्र्योत्तर प्रगती आणि भावी योजना' ह्या विषयावर पुढारी बोलत राहिले.

"हां—इथे ब्रेक लावला." रस्त्याकडे निरखून पाहात फौजदार म्हणाले, "शिंदे, अंतर मोजा—"

"साहेब, पण हा ब्रेक आमच्या गाडीचा नाही—ट्रक उभा राहिला होता इथे."

"दोन इंच!" शिंदे म्हणाले.

"काय, दोन इंच?"

"आपलं—दोन फूट!"

"नीट मोजा, शिंदे—"

"पण साहेब, हा ब्रेक माझ्या गाडीचा नाय. मी दाखवतो ब्रेक कुठे लावला."

फौजदारसाहेब आणि मागून इतरेजनांची मिरवणूक आता ब्रेकची खूण बघायला निघाली. ती जागा बरीच लांब होती.

"रक्त बरंच सांडलंय." वाटेत एका ठिकाणी थांबून फौजदार रस्त्यात पडलेल्या एका कागदाकडे निरखून पाहात म्हणाले.

"तुमचा ऑर्डर्ली पान खाऊन पचापच थुंकलाय! रक्त कुठलं? म्यानरलेस माणूस आहे. माझ्या धोतरावर देखील शिंतोडे उडाले आहेत." मास्तरांनी पुराव्यादाखल धोतर दाखवून फौजदारांची खात्री केली. ऑर्डर्ली आणखी कसली तरी मापे घ्यायला पळाला.

"हं! म्हशीचा मालक कुठे गेला?"

"हा काय—"

"हं—तू—नाव काय?"

"धर्मा मांडवकर, म्हानार गोळमिरे, तालुका चिपळून, पोष्ट संगमेश्वर, जिल्हा रत्नागिरी—उमर चाळीस, धंदा श्येती—"

"बस बस—हा अपघात कुणी पाहिला?"

"मी सांगतो—" एक म्हातारा गावकरी पुढे आला. "म्हंजी जालं काय, मी झिलग्या मासलेकराकडे तंबाकू खाल्ली, ना असाच कायदयाकडे चाललीला—"

"लवकर सांग!" फौजदार.

"थांच सांगतां नाय?"

"थांबा दादानूं, तुमी थांबा! मीं प्रतेक्ष पाह्यला आक्सिडन!" गावकरी गोटात इतका वेळ दबा धरून बसलेला सुपडू सुतार सरसावला. "म्हंजे मी पान खाल्लां जगल्या तुऱ्याकडे—"

"त्याचा काय संबंध इथे?" फौजदार गरजले.

"आयका त खरं!—जगल्या, पान खाल्लां क नाय?"

"खाल्लां तर!" जगल्या म्हणाला.

"खाल्लं ना निगालों! कुटे?"

"कुठे? ते मला काय ठाउक?"

"हां सांगताव! निगालों. कुटे? हरचंद पालवाच्या कबाटाची दुरोस्ती कराया—काय हरचंद?"

"चुक!" 'हो' या अर्थी हरचंद पालवाने 'चुक' असा आवाज केला.

"हां! त हरचंद पालवाकडे कशाला ग्येलां? त कबाटाची दुरोस्ती कराया—"

"त्याचा म्हशीशी काय संबंध? म्हशीचा ॲक्सिडेंट तू पाहिलास की नाही?"

"ऐका त साहेब! हरचंद पालवाच्या कबाटाची बिजागरी गंजून खल्लास—काय हरचंद? वार्ता बराबर?"

"चुक!" हरचंद पालव.

"तुम्ही कुठे राहता?" फौजदाराने विचारले.

"कोन? आमी?" हरचंद दचकून म्हणाला.

"हमेशा परेलवर. लाल चिमनी मिलमदी जावर हाय आमी!"

"मग तुझं कपाट कुठे दुरुस्त केलं? इथे की परेलवर?"

"हिते रजेवर हाय आमी!"

"तुम्ही?" फौजदार राग गिळीत म्हणाले.

"हां! आमी उद्या परत जायाचे ह्याच यष्टीनी."

"म्हणजे ही गाडी उद्यापर्यंत इथेच की काय? अहो, उद्या शाळा सुरू. पहिल्या दिवशी हजर नाही राहिलो तर सुटीचा पगार बुडाला!" मास्तर रडकुंडीला आले.

"थांबा हो! मग तू हरचंदच्या घरी बिजागऱ्या ठोकीत होतास—"

"ठोकीत न्हवतां—हां, खोटां कां बोलूं? काय हरचंद?"

"चुक!" अर्थात हरचंद!

"बिजागरी काडीत होतां इस्कुरडायवर घेऊन. एक इस्कुर बसला, दुसरा बसला, तिसरा बसवीत होतां, त बायामानसांन बोंबाबोंब घातली. मी आनि हरचंद धावत सुटला—त काय?"

"काय?"

"काय तां मी काय सांगूं?"

"मग इतका वेळ वटवट कशाला केली? काय पाहिलं ते सांग ना—"

"तूच सांग हरचंद!" सुतारदादांनी हरचंदला पुढे ढकलले.

"आमी काय सांगूं—तूंच सांग." हरचंद स्वतःचा बचाव करीत म्हणाला.

"मी सांगतांव!"

"चूप! ए—तुम्ही सांगा हरचंद! कायकाय पाहिलं?" फौजदार पेटू लागले.

"हांच! ती कायशी खालती होती त कायशी वरती!"

"कायशी कोण?"

"ही धर्मा मांडवकराची म्हस खालती ना यष्टी वरती!"

"प्रत्यक्ष धक्का लागतांना पाहिली?"

"नाय! आमी खोटां कां बोलूं?" हरचंद.

"मग तुम्ही जा! टळा!" फौजदार हरचंदच्या बहुवचनी उल्लेखावर चिडून म्हणाले, "अरे, मग धक्का लागतांना पाहिली कोणी? फ्रंटशीटच्या निथे कोण होतं?"

"मी होतो." पुढारी सरसावले.

"आपलं नाव?"

"मी बाबासाहेब मोरे—"

"बाबासाहेब मोरे? सॉरी—अरेच्या? आपण आहात होय?" फौजदार एकदम नांगी टाकून बोलू लागले. "पाहिलंत, मी किती सीरियसली इनक्वायरी करतोय—एकजण धड उत्तर देईल तर शपथ!....काय, मुंबईला निघालात?"

"हो, सचिवालयात मीटिंग आहे. बोर्डाची—"

"अस्सं!"

"आपण काय चिपळूणला हल्लीच बदलून आला वाटतं?"

"हो. वेंगुर्ल्याहून आलो. माफ करा आपल्याला तसदी देतो. हवालदार, कागद घ्या."

हवालदाराने कागद काढले. मग बाबासाहेब मोऱ्यांनी म्हशीची चूक कशी होती ते स्टेटमेंट दिले. फौजदारांनी पंचनामा लिहायला सुरवात केली.

एस० टी० साहेबांनी फौजदारांपुढे सिगरेट केली. एक डोळा पुढाऱ्यावर ठेवून त्यांनी ती नाकारली.

"आपल्याला विडीकाडी नाही चालत!"

"चांगलं आहे! पोलिसांत अशी माणसं कमी." पुढाऱ्यांनी त्यांना सर्टिफिकेट दिले. आता ह्या एकूण प्रसंगात त्यांना भलतेच महत्त्व प्राप्त झाले होते. ड्रायव्हर अत्यंत कृतज्ञ बुद्धीने त्यांच्याकडे पाहात होता. धर्मा मांडवकर दूर उभा होता.

"केवढ्याला घेतली रे म्हैस?" फौजदारांनी सवाल केला.

"दोनशे रुपये!"

"मघाशी आठशे म्हणाला. काय लुच्चेगिरी! आणि बारा शेर दुधाचीही थाप असेल."

"अहो थापच." एक माउली पुढे आली. "बारा शेर दूध देणारी म्हैस म्हणाला. म्हटलं पावशेर दूध दे, मुलांना दूध नाही टिपूसभर, तर म्हणाला दूध नाही!"

फौजदार भराभर काहीतरी लिहीत होते. "हं, काय डॉक्टर, जखमा पाहिल्यात ना?"

"हो!"

"काय चाकवीक गेलंय का अंगावरून?"

"काही कळायला मार्ग नाही! नसावं! खरचटलंय."

"मग त्याला तेलबील लावलं की नाही?" फौजदारांनी विचारले.

"का लावीन? लुस्कानी कोन भरून देयल?"

"पाहिलंत बाबासाहेब, जनता जागृत होते आहे!" फौजदारांनी विनोद केला व बाबासाहेबही खूप हसले. "हं, आणखी कोणी पाहिला ॲक्सिडेंट? —तुम्ही?"

"मी?" उस्मानशेठ दचकून म्हणाले. "मी काय सोताच्या डोल्यान नाय पायला. पन गाडीला बिरेक लागला—जरा जोसान—आन मी आमच्या इद्रुसमियाच्या आंगावर परलो! तेंचा चेस्मा खाली परला. हे इद्रुसमिया आमचे जावय—आफ्रिकेत असतान—न् ही सोकरी भाजी—न् ही सोकरीची सोकरी—सा म्हयन्याची हाय—त सांगायची गोष्ट—जोसात

बिरेक लागला न् गारी यक्दम थाप झाली. म्होरे आपले लीडरसाहेब—बाबासाहेब वराडले म्हैस, म्हैस—मंग खाली उतरून बगितला तवा म्हायती परला का म्हैस आली गारीखाली—" इथे मोरेसाहेबांनी उस्मानशेठचा सदरा हळूच ओढला. उस्मानशेठनी स्वर बदलला. "पम गारी काय डायवर फास मारीत नव्हता—आता म्हसच आरवी आली तर डायवरची काय मिष्टेक? आपली गाय-बैल असल ती संबाललीच पायजे—"

अशा प्रकारातून सुमारे एका तासाने पंचनामा लिहून तयार झाला. फौजदारसाहेबांनी तो वाचून दाखवला. त्यात अनेक गोष्टी का होत्या, ते सह्या करणाऱ्यांपैकी बऱ्याच लोकांना अजूनही उमगले नाही.

"....अपघाताच्या जागेपासून पन्नास कदमांवर जांभळीचे झाड आहे ....नैर्ऋत्येला आंबा....एकूण उतारूंची संख्या....धर्मा मांडवकराचा गोठा रस्त्यापासून एकसष्ट कदमांवर आहे...." म्हशीच्या जखमा मात्र मोघम स्वरूपात लिहिल्या होत्या. "रक्त आल्यासारखे दिसत होते—हाड मोडल्याचे वाटत नव्हते. म्हैस पूर्वेकडून ईशान्येकडे चालली होती. तिचे एक शिंग दुसऱ्या शिंगापेक्षा सव्वादोन इंच अधिक लांब आहे." (हवालदाराने सव्वादोन यार्ड लांब म्हटले होते.) अशा अनेक गोष्टींनी भरलेला तो कागद फौजदारांनी वाचला. पंचांच्या सह्या झाल्या. मास्तरांनी यात काही भानगड नाही याची प्रत्येकाकडून खात्री करून घेऊन शेवटी उस्मानशेठच्या जावयाला सही करायला लावली. त्यानेही उर्दू म्हणून कशात तरी सही केली. मधू मलुष्ट्याच्या आयुष्यातला हा पहिला पंचनामा असल्यामुळे त्याने फर्ड्या इंग्रजीत सही करून पुढे ज्यूनिअर बी० ए० अशी पदवी जोडली. बगुनानांनी पुनःपुन्हा खोचण घट्ट करून अशी काही मोडी गिचमीड सही केली की तशी त्यांना देखील पुन्हा करता येणार नाही. पुढारी बाबासाहेब यांनी मात्र पंचांच्या क्रमातही आपला क्रम पहिला ठेवण्याची दक्षता घेतली.

"चला!" सहा तासांच्या तपश्चर्येनंतर सर्वांनी सुटकेचा निःश्वास सोडला. यानंतरचा महत्त्वाचा प्रश्न होता तो गाडीपुढे पडलेल्या म्हशीला उचलण्याचा. परंतु रिव्हर्स घेऊन गाडी बाजूने काढता येण्यासारखी असल्यामुळे रस्त्यात पडलेली 'म्हैस जाणे आणि गावकरी जाणे' म्हणून

पाहिजर एष्टीत शिरू लागले. गावकरी मंडळी खाटा काढायला निघाली आणि पुन्हा—

"म्हैस! म्हैस!...." आरोळ्या आल्या. धावत उतरून मी पाहिले— त्यावेळी आडोशाच्या चारी खाटा उधळल्या होत्या—आणि सर्व मंडळी पंचनाम्यात गुंतलेली पाहून ह्या प्रसंगाची नायिका आपल्या स्वतःच्या चारी पायांनी तेथून केव्हाच चालती झाली होती. आणि धर्मा मांडवकराच्या *मुख्य रस्त्यापासून एकसष्ट कदमांवर असलेल्या गोठ्यात आंबोण गिळीत* आणि निर्लज्जपणाने शेपटी उडवीत उभी होती!

◊ ◊

# २

## एक नवे सौंदर्यवाचक विधान

अंतू गणपुले इतका 'सौंदर्यवाचक' झाला असेल अशी मला कल्पनाही नव्हती! वास्तविक तो आणि मी शाळेपासूनचे सोबती. अंतूचे गणित चुकले तर माझा हिशेब चुकावा! अंतूने शिवाजीचा गुडघी रोग समर्थांच्या पायी लावावा तर मी शिवप्रभूंची वाघनखे शाहिस्तेखानाच्या पोटात खुपसावी! त्याने रिओडीजानेरोचा स्पेनमध्ये थारेपालट केला तेव्हा मी डब्लिन जर्मनीत आणून बसवले! मास्तर बदलले, वर्ग बदलले; पण मी आणि अंतू फारसे बदललो नाही. 'स्त्री' म्हणजे मधल्या सुट्टीत सागरगोटे खेळणारी आणि अधूनमधून 'ए, माला दे ना चिंच' म्हणून आमच्यासमोर तोंडे वेंगाडणारी वस्तू येथपासून तो छबू लोखंडेला 'मिस लोखंडे' म्हणण्यापर्यंतचा आमचा मानसिक विकासही सोबतीसोबतीनेच झाला होता. तोच अंतू आठ दिवसांपूर्वी मला 'भिंत पिवळी आहे' हे सौंदर्यवाचक विधान आहे म्हणून सांगू लागला आणि माझ्या तोंडून एकदम "ना न न ना ना अंतू आता पहिला उरला नाही...." अशा करुणोदास ओळी बाहेर पडल्या. (हो! मी थोडासा त्यातला आहे.)

"अंतू, भिंत पिवळी आहे, यात सौंदर्य कसलं आलं? शेवंती पिवळी आहे म्हण!"

"तुला कसं कळलं?" अंतू दचकून म्हणाला.

"म्हणजे शेवंती पिवळी आहे हे काय ॲटॉमिक सीक्रेट आहे?"

"ते जाऊ दे, भिंत पिवळी आहे."

"अंतू, भिंतीत काय सौंदर्य? तुला आठवतं? आपण फर्स्ट इयरला रिपीटर होतो तेव्हा विल्सनला आपल्या वर्गात प्रीता गायकवाड होती.... नेहमी पिवळा मॅग्नोलिया वेणीत घालायची....लेमन कलरची साडी नेसायची ....पीतांबरी म्हणत होतो आपण तिला! काय सुंदर होती!" मी एक जमेल तितका दीर्घ निःश्वास टाकून म्हटले.

"सुंदर म्हणजे काय?" अंतूचा चेहरा रिटायर व्हायला आलेल्या हायकोर्ट जज्जाइतका गंभीर झाला होता.

"अंतू, सुंदर म्हणजे काय हे मला तू विचारावंस? हे म्हणजे साक्षात गौतम बुद्धानं एखाद्या नवबौद्धाला सुत्तनिकाय किंवा तसल्याच कशाचा तरी अर्थ विचारण्यासारखं आहे. सुंदर म्हणजे काय ते समजून घेण्यात ना आपण बी० ए० व्हायला दुप्पटतिप्पट वेळ घेतला? नावंच घेऊ का?"

अंतूचे लक्ष नव्हते. कसल्यातरी गहन विचारात तो बुडाला होता. पूर्वी चंपा कार्लेकर चौपाटीवर दिसली नाही, अगर सिल्लू काटपेटिया फ्रेंचच्या तासाला आली नाही, किंवा उर्मिला कोडेकनाल बॅडमिंटन कोर्टावर दिसली नाही, किंवा जेठी अडवानीची कॅडिलॅक ठराविक वेळेला पोर्चमध्ये आली नाही, तर तो असाच गंभीर व्हायचा. चौपाटीवर जाण्यात हवा अगर भेळ यांपैकी काहीही तो खात नसे. केवळ सहासात जणींच्या घोळक्यात 'चंपा कार्लेकर' हे सौंदर्यवाचक विधान!! फ्रेंच ब्रिजखेरीज त्याचा इतर कुठल्याही फ्रेंच गोष्टीशी संबंध न येताही हा अर्धमागधीचा विद्यार्थी केवळ 'सिल्लू काट-पेटिया' ह्या कारणास्तव तास तास फ्रेंच ऐकत असे. उर्मिला कोडेकनाल बॅडमिंटनच्या टूर्नामेंट्समध्ये जिंकली की हरली याचे अंतूला केव्हाही भान नव्हते, पण तिची एकही मॅच त्याने सोडली नाही. जेठी अडवानीपेक्षा मी तिच्या कॅडिलॅकवर खूष होतो, त्यावेळी हाच अंतू 'तुला सौंदर्य म्हणजे काय ते कळत नाही' म्हणून माझ्यावर उखडला होता. तोच अंतू मला सांगत होता की 'भिंत पिवळी आहे' हे सौंदर्यवाचक विधान आहे!

"अंतू, हे बघ, तू बनवाबनवी करू नकोस उगीच! 'भिंत पिवळी

आहे' हे सौंदर्यवाचक विधान? उद्या 'मोरी तुंबली आहे' किंवा 'कठडा मोडला आहे' हे सौंदर्यवाचक म्हणशील!"

"मग तुझी सौंदर्यवाचक विधानाची कल्पना काय?" अंतूच्या गंभीरतेने निम्मी पाद्रीजात ओशाळली असती.

"कसलं सौंदर्यवाचक विधान घेऊन बसलास? सुंदरपैकी चहा घेणार का?"

"हे बघ!" उलटतपासणीत इष्ट उत्तराने वकिलाचा चेहरा फुलतो तसा अंतूचा चेहरा फुलला. "चहा सुंदर आहे असे तू म्हणालास."

"मी असं म्हणालो नाही!" मी पिंजऱ्यातल्या अनुभवी साक्षीदाराच्या सावधतेने म्हटले. "मी म्हटले होते की सुंदरपैकी चहा तू घेणार का?"

"चहा घेईन!" अंतूने पराजित पुढाऱ्याने डिपॉझिट जप्त झाल्यावर विजयी उमेदवाराच्या अभिनंदनाचे भाषण सुरू करावे त्या थाटात उत्तर दिले. "पण सुंदरपैकी चहा घेणार का, यात 'चहा सुंदर आहे' हे एक सौंदर्यवाचक विधान दडलेले आहे!"

"दडू दे!" मी स्टोव्ह पेटवीत म्हटले. (हो! अजून स्टोव्ह मलाच पेटवावा लागतो आणि चहाही मलाच करावा लागतो. दुपारी ऑफिसात आणि रात्री घरी डबा येतो!)

"दडू दे म्हणून भागणार नाही. सौंदर्य ही एक जटिल समस्या आहे!"

"थांब! सुंठ घालून चहा करायचा असला तर आधी सुंठ टाकायची की साखर?"

"कसंही चालेल!" माझ्या प्रश्नात दडलेल्या टोमण्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करून अंतू म्हणाला, "उदाहरणादाखल हे पाहा--भिंत पिवळी आहे!"

"अंतू, भिंत पिवळी आहे हे मला तू किती वेळा सांगणार?"

"सौंदर्यवाचक विधान म्हणजे काय हे तुझ्या ध्यानात येईपर्यंत!"

"सौंदर्यवाचक विधान माझ्या ध्यानात आलं नाही म्हणून सांगितलं कोणी तुला? 'हाय हाय!', 'आहे ब्बुवा', 'याऽऽ!', 'तं छोकरी नहि सुंदरी', 'प्रेम कोणीही करेनाऽऽ', 'मस्त आहे हां', 'छे, डोळे म्हणजे छळ आहे', 'जातीच्या सुंदरींना---' ही सगळी सौंदर्यवाचक विधानं घोकता घोकता, अंत्या ऑनर्स गेले नाहीत का आपले?"

"अरे, पण याला शास्त्रीय बैठक नाही. उदाहरणार्थ, हे पाहा, भिंत पिवळी आहे—"

"अंतू, पुन्हा भिंत पिवळी आहे म्हणालास तर ह्या पांढऱ्या भिंतीवर डोकं आपटीन मी तुझं!"

"मला कीव येते तुझी! सुंदर म्हणजे काय सांग बघू!"

"सुंदर म्हणजे गुलाब मंत्री, सुंदर म्हणजे प्रमिला पेंडसे, सुंदर म्हणजे नैना होनावरकर, सुंदर म्हणजे दुर्गा तेलंग...." एकेका नावाला एकएक चमचा साखर पाण्यात घालत मी ओरडलो.

"चूक!"

"काय चूक? गुलाब मंत्री सुंदर नव्हती? तिच्यासाठी आपण लॉजिक-ऐवजी मॅथ्स घेऊन वर्ष बुडवलं नाही? प्रमिला पेंडसे सुंदर नव्हती? तिच्यासाठी आपण फावडी आणि घमेली घेऊन वसईला श्रमदान करायला गेलो नव्हतो? नैना होनावरकर सुंदर नव्हती? सांग, ती सुंदर नसती तर गॅदरिंगच्या नाटकांत आपण दोन्ही विंगांत प्रॉम्टर म्हणून राहिलो असतो? ती तालमीला येत नव्हती त्या दिवशी इतरांना काय प्रॉमटिंग लागत नव्हतं? पण आपण जात होतो मग तालमीला? उगीच चूक म्हणण्यात काय अर्थ आहे?"

"सौंदर्यासंबंधी हा आत्मनिष्ठ दृष्टिकोण झाला तुझा! हे वस्तुनिष्ठ विधान नव्हे. पण भिंत पिवळी आहे हे विधान...."

"अंतू, भिंत जर सुंदर असती तर तिच्यावर दुधाचा हिशेब लिहिला नसता आपण! स्पष्टच बोलतो—ह्या भिंतीवर तू कालच रात्री हा ढेकूण चिरडलास. समज, जेरुशा इझिकेलच्या मागच्या बाकावर वर्षभर बसत होतो आपण—तिच्या पाठीवर ढेकूण दिसला असता तर या सौंदर्यवाचक भिंतीवर तू ढेकूण चिरडलास तसा तू चिरडला असतास का? नाउ टेल मी —आता का गप्प?"

जेरुशा इझिकेलच्या आठवणीने अंतू अस्वस्थ झाला हे मला कळू शकत होते. 'जेरुशा हे सौंदर्याचे चालतेबोलते प्रतीक आहे' असे त्यावेळी अंतूचे विधान होते. त्यावेळी पिवळ्या भिंतीवर त्याचे मन जडले नव्हते. तिच्यामुळे आपल्या कॉलेजला (ते वर्ष आम्ही झेवियर कॉलेजात काढले!) लायब्ररी

आहे हे अंतूला कळले होते. खंदकात पडून शत्रूवर नजर ठेवावी तसा हाच—हाच अंतू एनसायक्लोपीडिया ब्रिटानिका, समग्र केळकर खंड वगैरे समोर मांडून वाचनात गढलेल्या जेरुशाला उद्देशून सौंदर्यवाचक विधाने करीत होता. त्यावेळी इंद्राच्या अप्सरांनी जेरुशाची वेणी घालावी आणि होलिवुडच्या तमाम नटींनी तिचे सँडल्स साफ करावे, ही अंतूची सौंदर्यवाचक विधाने होती. आपले नावदेखील अनंत असण्यापेक्षा अँटनी असते तर किती बरे झाले असते, अशासारखी असंख्य विधाने करणारा अंतू गणपुल्या 'मिंत पिवळी आहे' हे सौंदर्यवाचक विधान आहे, असे का सांगतो ह्याचा मला अंदाज येईना.

जेरुशा इक्षिकेलच्या आठवणीने त्याला आलेल्या मुंग्या गेल्या असाव्या. कारण अंतू खिन्नपणाने हसून माझ्यापाशी आला आणि म्हणाला, "तुला मी समजावून सांगू का सौंदर्यवाचक विधानांचा विषय?"

"अंतू, सांगणार असलास तर सांग बापडा पण हा विषय आता काही समजायचा राहिलाय का?"

"इतके दिवस मलाही तुझ्यासारखंच वाटत होतं. परंतु आपल्याला हा विषय नाही समजला." अंतू हे वाक्य उच्चारताना मला थॉमस वूल्फेची आठवण झाली. मरताना त्यानेही असेच काही उद्गार काढले होते म्हणतात.

"असा एकदम विनयशील केव्हापासून झालास अंतू? सौंदर्य हा विषय तुला कळला नाही? मी तरी हे विनय म्हणूनदेखील मान्य करणार नाही. गुलाब मंत्रीचे ओठ ह्या विषयावर वेलणकराच्या हॉटेलात दोन तास तू मला काहीकाही सांगितलं होतंस ना! पावणेचार रुपये बिल होईपर्यंत आपण गुलाब मंत्रीच्या ओठांबद्दल बोलत होतो. सिल्लू कारटेपेटियाची मान किती नितळ आहे, ह्याबद्दल तू संगमरवरापासून स्टेनलेस स्टीलपर्यंत सगळ्या जिनसा उपमेसाठी वापरल्या होत्यास अंतू!—अगदी तू आणि मी इथं आहोत, तेव्हा खरं बोलायला हरकत नाही. प्रमिला पेंडसेच्या लग्नाला आमंत्रणाशिवाय आपण गेलो आणि नारळ घेऊन बाहेर पडताना प्रमिला पेंडसेचं हे शेवटलं दर्शन म्हणून तो नारळ आपण आपल्या टेबलावर ठेवला होता. माझा नारळ आपण फोडून साखर घालून मारुतीच्या प्रसादासारखा खाल्ला आणि दुसऱ्या नारळात तू प्रमिलेची प्रतिमा पाहात बसलास आणि ज्योती मेहता

तिच्या बाकावर बसली तेव्हा जिथे फुले वेचली तिथे गोवऱ्या का वेचायच्या, म्हणून तू बाष्पगद्गदित की काही तरी झाला होतास ना? इंटरची परीक्षा आठवते तुला? तुझ्या पुढल्या बाकावर शुभदा गडकरीचा नंबर होता. तिने सहज शेपटा उडवला तो तुझ्या पेपरवर पडला. त्याच्याकडे तीन तास पाहात तू तो पेपर कोरा दिलास—विसरलास का?"

"मानसिक क्रियांचा प्रांत सोडून तू शारीरिक क्रियांचा विचार करतो आहेस. तुझ्या बोलण्यात अंतर्गत विसंगती आहे. सौंदर्याचा सांकेतिक किंवा अर्थरूपात्मक विचार कर. ऑस्बोर्न वाचला नाहीस तू!"

"चहा घे!" अंतूच्या ह्या बोलण्यावर ह्याहून मी अधिक काहीही बोलू शकत नव्हतो.

"सौंदर्याची रवानगी इंद्रियातीत प्रांतात करावी लागते" अंतू कपातल्या चहाची रवानगी पोटात करीत म्हणाला. "हा विषय कठीण आहे. पण तो समजून घेतला पाहिजे."

"चहा कसा झाला आहे?"

"सुंदर!" अंतू म्हणाला.

"आता सुंदर हा शब्द कसा वापरलास?" मी त्याला पकडले.

"ऐक! सुंदर ही एकाच इंद्रियाशी निगडित असणारी संवेदना असेल तर श्रुती अगर दृक यापैकी—"

"श्रुती अगर काय?"

"दृक!"

"दृक?"

"दृक!" अंतू शेवटल्या अवस्थेतल्या रोग्याकडे डॉक्टर पाहतात तसा माझ्याकडे पाहात म्हणाला.

"दृक म्हणजे काय?"

"दृक—म्हणजे—जे तू पाहतोस ते."

"म्हणजे तू—हा चहा....किंवा आपण गिरगावच्या नाक्यावर उभे राहून पाहात होतो....ते? ते सगळे...."

"दृक! उदाहरणार्थ, ही भिंत!" अंतू पुन्हा भिंतीकडे वळला.

"अस्सं!" मी रागाबरोबर चहा गिळला!

"आता श्रुतिप्रत्यय आणि दृक्प्रत्यय यांच्याशी निगडित असलेली संवेदना यांपैकी कोणत्या तरी एका इंद्रियगटातल्या कलाप्रकाराचा त्याग करणं आवश्यक आहे."

"काही कळलं नाही."

"तुला पहिल्यापासून समजावून सांगावं लागेल. आता हेच पाहा, भिंत पिवळी आहे!"

"अंतू, इफ यू डोंट माइंड—भिंत पिवळी आहे याखेरीज इतर काहीही पिवळं आहे म्हणून विषय समजावून सांग. श्रीखंड पिवळं आहे म्हण...."

"नाही. तिथे श्रुती, दृक यांच्या जोडीला रस-प्रत्यय येतो. शास्त्रीय चर्चेत शब्द फार काळजीपूर्वक वापरावे लागतात. नीट लक्ष दे—भिंत पिवळी आहे."

"ठीक आहे."

"आता हे विधान ऐकल्यावर तुला काय वाटलं?"

"हे विधान तू करायला नको होतंस, असं वाटलं!"

"ठीक आहे. तुला हे उदाहरण पटत नसलं तर दुसरं घेऊ. एक कागद घे." मग मी अंतूला कागद दिला. "पेन दे तुझं!" मी पेन दिले. आणि मग अंतूने कागदावर एक वाक्य लिहिले—"रामा काळा आहे."

"काय लिहिलं मी? रामा काळा आहे—काय?"

"हो, पण रामा काळा आहे, यात सौंदर्यवाचक काय आहे अंतू? त्यापेक्षा सीता गोरी आहे, असं तरी लिही."

"तुझ्या लक्षात येणार नाही ते. जाऊ दे. 'क्ष सुंदर आहे'. चालेल?"

"चालेल!"

"आता 'क्ष सुंदर आहे' या विधानाला आपण 'पे' असं म्हणू."

"का पण? 'क्ष' म्हणालास ना? आता हा 'पे' कुठला काढलास? आणि 'पे' वगैरे शब्द महिन्याच्या शेवटल्या आठवड्यात नको लिहूस."

"बरं, 'क्ष सुंदर आहे' या विधानाला आपण 'ए' असं म्हणू!"

"पण 'क्ष' म्हणतोय ना आपण? पुन्हा 'क्ष' पुढे 'ए' कशाला?"

"अरे, 'क्ष सुंदर आहे' हे विधान झालं. या विधानाचं नाव 'ए'."

"चालू दे."

"आता ह्या 'ए' ची आपण नीट तपासणी करू."

"'ए' ची तपासणी करायला 'ए' काय शाळा आहे की गटार आहे?"

"हे बघ, विषय सोपा करण्याच्या दृष्टीनं मी सांगतोय तुला! अगदी साध्या शब्दात सांगतो. तू ऑस्बोर्न वाचला नाहीस. ह्यूम तरी?"

"मला फक्त ह्यूम पाइप ठाऊक आहे."

"बरं, कांट?"

"कोण?"

"कांट? निदान ॲरिस्टॉटल? प्लेटो? हेगेल? रिचर्ड्स?"

"अंतू, तुला ठाऊक आहे की, रहस्यकथेशिवाय आणि गेली अडीच वर्षं शनिमाहात्म्याशिवाय मी काही वाचीत नाही. पुढल्या महिन्यात माझा शनी मार्गी होतोय. गुरू उच्चीचा येतोय, त्या वेळी हे सगळे आणून टाक माझ्यापुढं. चिवड्यासारखा फडशा पाडीन या चोरांचा—हां!"

"निदान ऑस्बोर्न तरी वाचायला हवा होतास तू! हरकत नाही. पण हे नीट पाहा. 'क्ष सुंदर आहे' ह्या विधानाला आपण 'ए' म्हटलं. आता समज, 'क' नं हे विधान केलं. म्हणजे काय झालं?"

"काय व्हायचं आहे?"

"म्हणजे 'क'चा 'ए' हा वस्तुनिष्ठात्मक आविष्कार झाला!"

"बापरे! इतकी मानगड होते का 'क्ष सुंदर आहे' हे 'ए' विधान 'क'नं केलं तर?"

"यस, माय डियर फ्रेंड—तुझ्या बरंच ध्यानांत आलं. लिहून घेऊ या. 'ए' नंतर 'क'; आता बघ, हे विधान त्यानं का केलं?"

"मला काय ठाऊक?"

"सौंदर्यविषयक अनुभूतीचा संवेदनाशीलतेच्या पोटी आलेला प्रत्ययात्मक साक्षात्कार. ह्या साक्षात्काराला आपण काय म्हणू या?"

अंतूने मला विचारले आणि मी जांभई दिली, पण अंतू नामोहरम झाला नाही. त्याने उत्साहाने त्याला 'अ' असे नाव दिले.

"ह्या अनुभूतीला आपण 'अ' म्हणू."

"म्हण!"

"म्हणजे 'क' ला 'ए' मधून 'अ' चा आत्मसाक्षात्कारी प्रत्यय आला!"

"अस्सं! गंमत आहे!" हॅटमधून ससा निघाल्यावर वाटते तसे मला वाटल्यामुळे मी उद्गारलो.

"आता सुंदर काय आहे सांग?"

"किशोरी गव्हाणकर?" मी अभावितपणे बोलून गेलो. किशोरी आमच्या ऑफिसात 'इनवर्ड-आउटवर्ड' करते. दातांच्या सौंदर्यस्पर्धेत कुठल्याशा टूथ पावडर कंपनीने तिला चांदीचे माकड आणि सहा बाटल्या बक्षीस दिल्या. त्यातली एक तिने हेडक्लार्कला दिली; पण कवळ्या टूथ पावडरने धुता येत नसल्यामुळे हेडक्लार्कने ती मला दिली आणि मी किशोरीला थँक्स दिले. आणि किशोरी सगळे सुंदर दात दाखवीत कालच संध्याकाळी माझ्याकडे पाहून हसली. एवढ्या आंतरिक इंद्रियनिष्ठ संवेदनांच्या पार्श्वभूमीतून ते नाव माझ्या तोंडून घरंगळले.

"किशोरी गव्हाणकर कोण? जाऊ दे, ते मग पाहू. सुंदर काय आहे? क्ष! 'क्ष सुंदर आहे', हे मूळ विधान. आता 'ए' ह्या विधानाचा कर्ता 'क' आणि 'अ' हा प्रत्यय आणि 'क्ष' हे कर्म. समजलं?" कागदावर 'क्ष' हे अक्षर लिहीत अंतू म्हणाला. "आता नीट लक्ष दे. संवेदनावर्गीय उदाहरणं आणि अर्थाधिष्ठित उदाहरणं यांत एक फरक असू शकेल. म्हणजे 'क' हा 'क्ष सुंदर आहे' या विधानाचा कर्ता 'क्ष'ला ज्यावेळी सुंदर दिसतोस म्हणाला—"

"सुंदर दिसतेस म्हणाला असं म्हणालास तर शास्त्रीय चर्चेत चूक नाही ना होणार?"

"नाही, दिसतेस म्हण. हां, तेव्हा 'क' जेव्हा तिला तसं म्हणाला तेव्हा 'क'च्या आंतरिक अवस्थेची पातळी एका विशिष्ट थराची असेल. तो थर बदलूही शकेल. त्याला आपण—"

"'ढ' म्हणू—"

"नाही. तोच 'क' पण पातळी वेगळी. त्याला 'र' म्हणू."

"म्हणा!"

"म्हणजे आता हे बघ—" कागदावरील अक्षरांवर बोट ठेवीत अंतू म्हणाला, "हे त्या विधानाचं समीकरण तयार व्हायला लागलं. आता दुसरा भाग—विधान करणारा कोण?"

"तू!"

"मी कसा? 'क' नाही का हे म्हणाला? म्हणजे पुन्हा 'क' मांडू. आता 'क्ष सुंदर आहे' या विधानात 'क्ष आहे' हे एक विधान आहे."

"अर्थात 'क्ष' असल्याशिवाय सुंदर किंवा कुरूप कशी असेल? 'क्ष' आहेच!"

"करेक्ट! मग 'क्ष आहे' आणि 'क्ष सुंदर आहे' या विधानात 'क'ला ती सुंदर वाटली हे अहंकेंद्रीय विधान आहे. त्याला ती एकदम सुंदर वाटली. तिला पाहिल्याबरोबर 'क'ला एकदम..."

"कळ आली!" मी माझ्या विनोदाला एकटाच हसलो. अंतू हसला नाही.

"त्याला एक रसेलच्या म्हणण्याप्रमाणे स्थलकालनिरपेक्ष वस्तुवाचीय दक्‌भ्रम झाला, अगर कांटच्या म्हणण्याप्रमाणे हेतुनिरपेक्ष हेतू किंवा सौंदर्य-निरपेक्ष सौंदर्याचा, अथवा प्रो. सुरवाते म्हणतात त्याप्रमाणे निरपेक्ष निरपेक्ष कौरूप्यहीनतेचा प्रत्ययाकारी प्रत्ययशून्याभास झाला. झाला आपण...."

"गाढवपणा म्हणू या!" आता माझा तोल सुटला. माझा चहा पिऊन अंतू वर माझाच अंत पाहात होता.

"रागावू नकोस. हे प्रत्येकाला कळलं पाहिजे. या अनुभूतीला आपण 'ळ' म्हणू. म्हणजे पाहा—" कागदावर पुढे 'ळ' हे अक्षर लिहीत अंतू म्हणाला. "'क्ष सुंदर आहे' हे सौंदर्यवाचक विधान, त्याला आता 'ए'-पासून 'ळ'पर्यंत या अशा पायऱ्या आल्या. त्याला आपण हॉरिझॉंटल प्रोग्रेशन म्हणू हेगेलसारखं! आता मला सांग, हे त्या 'क' ला का वाटलं?"

"काय?"

"'क्ष' सुंदर आहे म्हणून—"

"का म्हणजे? 'क्ष' चे डोळे बदामी असतील, ओठ गुलाब मेत्रीसारखे असतील, केस शुभदा गडकरीसारखे असतील, मान सिल्कु काटपेटिया-सारखी असेल आणि जेठी अडवानीसारखी ती 'क्ष' आपल्या कॅडिलॅकमधून शट्लकॉकसारखी सपकन उतरली असेल...."

"फाइन! म्हणजे अनेकविध अनुभूतींचा एक कॉस्मिक आविष्कार असेल!"

"कॉस्मेटिक आविष्कार म्हणजे!"

"कॉस्मिक!" अंतू ओरडला.

"अस्सं! जाऊ द्या."

"ह्या कॉस्मिक आविष्काराला आपण 'ल' म्हणू."

"झालं!" मी हताशपणे विचारले.

"नाही. आता हा जो कॉस्मिक 'ल' हा आविष्कार आहे, त्याचं कारण काय?"

"ह्या सगळ्या पोरींनी आपल्या आयुष्याची आठ वर्षं खड्ड्यात टाकली हे एकच!"

"जरा क्रूड शब्दांत सांगितलंस, परंतु भावार्थ बरोबर. म्हणजे जशी वस्तू तशी स्टिम्युलेशन, जशी स्टिम्युलेशन तशी संवेदना, जशी संवेदना तशी अटेन्शन—"

"अटेन्शन म्हणजे उर्मिळा कोडेकनाल बॅडमिंटन कोर्टात आली की आपण ओरडत होतो ते!"

"जवळजवळ तेच. आणि अटेन्शननंतर ॲटिट्यूड! आता वस्तूला आपण 'त' म्हणू, स्टिम्युलेशनला 'र' म्हणू, संवेदनेला काय म्हणशील?"

"म्हण काय वाटेल ते—"

"'श' म्हणू—"

"ठीक आहे."

"स्टिम्युलेशन नंतर अटेन्शन! अटेन्शनला 'प' म्हणू. या सगळ्या पायऱ्या लक्षात ठेव हां, त्याशिवाय सौंदर्यवाचक विधानांची उपपत्ती लक्षात येणार नाही तुझ्या. काय समजलास?"

"पुढे बोल."

"आता अटेन्शननंतर ॲटिट्यूड—हे ॲटिट्यूड—"

समोरच्या कागदावर काही कारण नसताना एक पंचकोन काढीत अंतू म्हणाला, "हे ॲटिट्यूड समाजाच्या प्रत्येक थरांत निराळं असू शकेल. व्यक्तिगत आत्मप्रत्ययाची विभिन्नता ही सौंदर्यसमीक्षेतली महान समस्या आहे. त्याला आपण थरवाचक 'थ' म्हणू. थर लक्षात आले का तुझ्या....?"

"थर आणि पारकर नावाचे कोणीतरी शाळेतल्या भूगोलात होते."

"अरे, ती वाळवंट—"

"मघापासून वाळवंटात हिंडल्यासारखंच वाटतंय मला. सौंदर्यात्मक वाळवंट म्हण. अ, क्ष, क वगैरे उंट त्यातून फिरताहेत...."

"ह्या चित्राकृती झाल्या. तो विषय निराळा आहे. कलावंतांची इंद्रियानुभवग्रहणक्षमता कशी असते किंवा सायनेस्थिशियाचा व्यापार किती पातळ्यांवरून होतो, हे प्रश्न वागदी वेगळे आहेत. तुला इंटरेस्ट असलं तर संध्याकाळी व्याख्यानाला ये माझ्याबरोबर—"

"कुणाच्या?"

"प्रोफेसर सुरवाते!" हे म्हणताना अंतूच्या चेहऱ्यावर 'बुद्धं सरणं गच्छामि' ढंगाची गंभीरता होती. "इतका विद्वान आपल्याच काय पण परदेशातही जन्माला यायचा आहे."

"कशावरून?"

"त्यांनी स्वतःच सांगितलं. प्रत्येक विद्वान गाढव कसा आहे, हे त्यांनी कमालीच्या आत्मीयतेनं सिद्ध केलं आहे. कांट, हेगेल, ऑस्बोर्न, प्रोफेसर बूटलेगर, शांपेन द कॅंपेन—सगळ्यांना नुसतं आडवं लोळवलं त्यांनी."

आणि मीदेखील 'हा कोण संप्रति नवा पुरुषावतार' आहे तो एकदा डोळ्यांखालून घालावा म्हणून व्याख्यानाला गेलो. दिवाणखाना तुडुंब भरला होता. कांट, हेगेल, ॲरिस्टॉटल वगैरे मंडळींचा खातमा केल्यामुळे की काय कोण जाणे, प्रोफेसर सुरवात्यांच्या चेहऱ्यावर विलक्षण धुंदी—खून चढतो तशी—चढली होती. मला मात्र व्याख्यानातला एक शब्द कळत नव्हता. मी 'कोण तुजविण सांग सज गुरुराया'चा भाव चेहऱ्यावर आणून अंतूकडे पाहू लागलो. अंतूचे लक्ष प्रोफेसर सुरवात्यांकडे नव्हते; दूरच्या एका कोपऱ्याच्या बाजूला एकाग्र चित्ताने त्याची सौंदर्यसमीक्षा चालली होती.

आता मला भिंत पिवळी का आहे हे चटकन उमगले. पिवळ्या भिंतीला टेकून आमची एके काळची पीतज्योती प्रीता गायकवाड बसली होती. तीच लेमनकलरची वेशभूषा आणि शेवंतीची पिवळी वेणी!

"अंतू, प्रीता गायकवाड!" मी.

"शः! हळू...." अंतू.

"सौंदर्यशास्त्र कशाशी खातात हे आपल्या देशातल्या एकाही स्वतःला विद्वान म्हणवणाऱ्याला कळलं असेल तर शपथ...." प्रो० सुरवाते.

"अजून लग्न झालं नाही वाटतं तिचं?" मी.

"नाही. व्याख्यान ऐक." अंतु.

"शेवंतीची वेणी ती रोज घालते!" मी.

"अमूक एक पिवळं आहे म्हणून काय सौंदर्यवाचक प्रतिक्रिया आपल्या मनात थोडीच होणार आहे? पिवळं म्हणजे काय ते ठरवावं लागेल...." प्रो० सुरवाते.

"प्रीता गायकवाड...." मी कुजबुजलो. मागून दोघांनी मला 'शु: शु:' केले.

"पिवळेपणा कशानं सिद्ध झाला, हे ठरवा. पण आपल्या देशातले विद्वान महामूर्ख आहेत! ॲरिस्टॉटलनं एक गाढवपणा केला—प्लेटोला तो सुधारण्याचा प्रयत्न करून सुधारता आला नाही. कसा ते सांगण्याचं हे स्थळ नव्हे...." प्रोफेसर सुरवाते.

"प्रीता बोलली का तुझ्याशी?"

"हो. व्याख्यानं संपल्यावर भेटणार आहे....व्याख्यानाकडे लक्ष दे...." अंतु अनिमिष नजरेने भिंतीकडे पाहात बोलला.

"....तात्पर्य, बंधू आणि भगिनींनो, ह्या विषयाच्या वाटेला जाऊ नका ....मला ह्या विषय कळला म्हणून तुम्हांला कळेलच असं नाही...."

मला सुरवातेप्रोफेसरांच्या व्याख्यानातले एवढेच काय ते कळले आणि सकाळची चर्चा फाडून टाकावी म्हणून मी खिशातून कागद काढून पाहू लागलो. त्यातल्या अ, क, क्ष वगैरे संज्ञांवरून डोळे फिरवता फिरवता एक निराळेच सौंदर्यवाचक विधान तयार झाले होते:....ए....क....अ ....क्ष....र....क....ळ....ल....त....र....शा....प....थ.... मी 'युरेका' म्हणून अंतूकडे पाहिले. अंतु पिवळ्या भिंतीच्या दिशेने पाहून हसण्याचा प्रयत्न करीत होता आणि भिंतीच्या दिशेने पीतांबरी शेवंती फुलून अधिक पिवळी होत होती आणि सुरवातेप्रोफेसर कंठकौशल्याची पराकाष्ठा करीत म्हणत होते—"भिंत पिवळी आहे, ह्या एका साध्या सौंदर्यवाचक विधानापासून सुरवात करून आपण सौंदर्याच्या आस्वादाच्या कक्षा

काय?.... मर्यादा काय?.... पातळ्या कोणत्या....? आगळी प्रचीती कोणती?...."

"प्रीता गायकवाड अजून तशी दिसते!" मी गंभीरपणे त्या चिटोऱ्यावर आणखी एक सौंदर्यवाचक विधान लिहिले. आजूबाजूचे होनहार विद्वान त्यांच्या कळपातल्या ह्या नव्या रंगरुटाकडे आदराने पाहात होते....मी अंतूकडे पाहात होतो....अंतू प्रीताकडे पाहात होता....आणि प्रीता आपल्या मनगटावरल्या पिवळ्याजर्द घड्याळाकडे पाहात होती.

◊ ◊

३

## शांभवी : एक घेणे

(एक द्रवनाट्य. हल्ली सघनता हा नवनिर्मितीचा नवावश्यक घटक आहे. आशयघनता आणि आकृतिघनता. परंतु मानवाची पावले अणुध्वं-कडून हायड्रोजन बाँब किंवा ज्वलध्वंच्या दिशेने पडू लागली आहेत. अशा काळाचे स्वागत हे घनाऐवजी द्रवाने होणे आवश्यक आहे. नवीन वाङ्मय हे घनाशयातून निघून जलाशयात पडणे अपरिहार्य आहे. 'देणे' हा गत-युगाचा धर्म तर 'घेणे' हा नवयुगाचा.

प्रस्तुत नाट्यविषय 'शांभवी' हा असल्यामुळे 'घोट्य' आहे. आस्वाद, मग तो वाङ्मयकृतीचा का असेना, चोष्य असेल, लेह्य असेल आणि घोट्यही असेल.

वाङ्मय जीवनाच्या विविध स्तरांतून जाते. द्रवनाट्य जीवनपटाखालून जाते. हा स्तर अस्तररूप आहे. हीच द्रवनाट्याची अस्मिता आणि विस्मिताही.)

पात्रे

शांभवी — नायिका
लोटिका — तिची सखी
वखिका — तिची दुसरी सखी

पट्टिका — सेविका
वरर्वटिका — सेविका
घुट्टक — एक अनाम रङ्ग-मार्मिक

**काळ :** अज्ञात. बहुधा जलर्ध्वंसेवणोत्तर.

**समय व स्थळ :** एक निमग्न संध्याकाळ. रक्तवर्णाने राङ्ग (ज्याला रूढ शब्द रंगभूमी असा आहे) फुलला आहे. राङ्गावर पार्श्वभागी एका कुटीची दखलेला आहे. पुरोभागी ओसरी आहे. मज्जनमार्गी सूर्याचे काही अंतिम किरण त्या ओसरीवर रेंगाळत आहेत. त्या किरणांच्या पूरिया-धनाश्रीत अवघा राङ्ग व्याकुळला आहे. तेवढ्यात एका मावळत्या किरणाने पकडले आहे अचूक घुट्टकाला. प्रेक्षागार पाहते ते त्याला.

**घुट्टक :** *[राङ्गावर घालतो पाचच फेऱ्या. प्रत्येक फेरीत पृथ्वीप्रदक्षिणेची विजिगीषा आहे. नेपथ्यातून देववाणीला लाजित करणारे त्रिपरिमाणघन स्वर येतात : 'बंऽऽ !' त्या बंकाराने घुट्टकाची गती मंदावते आणि तनिक रुंदावतेदेखील. घुट्टकाच्या ओठांच्या पाकळ्या किंचित विलग होतात. पण प्रेक्षागारातले आसन अन आसन* (बहुधा रिकामे – असल्या नाटकांना असणारी सनातन पोकळी दर्शविणारे) *ती विलगता टिपते.]*

....हा बंकार !
विश्वनिर्मितीच्या ॐकारापोटी आलेले हे विश्वांताचे अंत्याक्षर—हा
अंत्यध्वनी—हा अंत्यज—ॐकाराचे हे शेंडेफळ....हा बंकार...
*[नेपथ्यातील बंकार वाढत जातो : बं....बं....बं...बं....]*
हा अंत ?
छे ! ही नांदी अंताची....अंतिम प्रलयाची—
*[ही सम साधून पुनश्च नेपथ्यातून 'बं' !]*
अंतिम प्रलयाची नांदी ? छे....
वार्ता ही येण्याची—
कोणाच्या ? कोणाच्या—
हरितवर्ण हरिता ही राधा
छे—राधा नच
ती तर गोकुळिची, साळिजं—तिज पाहुनि थरकेना काळिज

ही मालवती—भाङ्गी शुभाङ्गी
हो, मालवीयकन्यका—वल्कगलिता—सत्पात्री
ही शांभवी—
*[रङ्गावर क्षणमात्र एक ओलसर प्रकाशरेखा उजळून जाते.]*
ही शांभवी
राङ्गिक मी
स्वागतार्थ काय
तिला नेणे !
मालवती शांभवी
अन मी तर रूपदक्ष
द्रवलोभी
नेत्ररक्त—चरणास्थिर
पाहत एकीत दोन
गगनाला अंगुलिने
आधारित—न्यस्तपाद
त्रस्तजिव्ह
मी तर दाशरथी—रामचंद्र
एकवचन
एक वचन, एक वचन
पुनःपुन्हा वदणारा
कसे करू स्वागत मी
हरिता ये शांभवी
काय तुला देणे !
हे तरु ह्या वल्लरी
हे निर्झर ह्या लहरी
कुणि पूर्णा कुणि अपूर्ण
पूर्णाशी नच लव
कर्तव्य मला
मी तर 'चूर्ण'काम

*[नेपथ्यातून शांभवीला अभ्यंगस्नान, मर्दनादी उपचार करणाऱ्या दासींचा वेदघोष : ॐऽऽ चूर्णात् चूर्णमिदं सर्वम्....]*

**घुङ्क** : हा तर चिरपरिचित निनाद

*[स्वतःशी गुणगुणतो—हे गुणगुणणे प्रेक्षागाराच्या कुठल्याही पंक्तीला स्पर्श करून जात नाही.]*

चूर्ण सत्य—अणुभेदी—
स्थूलांतुनि सूक्ष्मांतिल सूक्ष्माला
स्पर्शिल जे—
सत्य ते—
ते घ्यावे
ते ल्यावे
सकला चूर्णमयी सृष्टी—
जे करिते आशयघन
आकृतिघन विश्वाला
चूर्णरूप—आणि—
आणिते संगे—
भावगंध—जे
लेणे ल्याल्यावरि
मळेला आगळेचि
प्राप्त होत
झननझांजरे.

*[नेपथ्यात—कुणीतरी कुणाला तरी साद घालीत आहे. त्या सादेत विश्वाची व्याकुळता साकळली आहे. 'शांभवी .... हे शांभवी....']*

**घुङ्क** : शांभवी....

*[इथून पुढल्या बोलण्यात गद्य आणि पद्य ह्यांच्या पलिकडली अशी द्रव्य पद्धती असावी....कारण परिणाम साधायचा आहे तो द्रव्याचा.]*

शांभवी...मालवती शांभवी....संध्याकाळ झाली. लोटिके....(कोणी येत नाही.) वल्लिके....(कोणी येत नाही.) पट्टिके....(कोणीतरी आल्याचा भास होतो. पट्टिकेच्या येण्यात सघनता आहे.)

**पट्टिका** : महाराज...

**घुट्टक** : पट्टिके....सिद्ध झाली का ग शांभवी?

**पट्टिका** : शांभवी ही सदा सिद्ध आहे स्वामिन!

**घुट्टक** : हो, सदा सिद्ध.... (आतून आवाज...'आणि सदा शुद्ध')....मग आली का नाही शांभवी?

**पट्टिका** : शांभवी येत नसते भगवन!

**घुट्टक** : शांभवी येत नसते? (आतून आवाज...'आणि येत असते'...)

*[थोडा वेळ कुणीच बोलत नाही. कुण्णी कुण्णी नाही. राजा स्तब्ध....प्रेक्षागारही स्तब्ध....त्या धूसर शांततेत ऐकू येते एक निस्तब्ध, निगूढ आणि निमूट सळसळ. नगरातल्या जीर्ण शिवालयाच्या समोरच्या वटपर्णांची आणि वटपाखुळांची---जी पशूही नाहीत वा पक्षिही नाहित---आणि म्हणूनच ती साद देतात द्रवनाट्याला की जे गद्य नाही आणि काव्यही नाही. पण त्या नसलेल्या सळसळीचे असणे कोलाहल उमटवून जाते घुट्टकाच्या मज्जातंतु-वीणेत---आणि घुट्टक ओरडतो.]*

**घुट्टक** : का? वज्रिके—शांभवी का येत नाही? पट्टिके, मला शंका येते, तूच तर ती शांभवी नव्हेस?

**पट्टिका** : मी शांभवी? (हसून—पण त्या हसण्यात एक विलबिमोर मावगंध हलकेच मिसळला आहे.) मी? मी? मी? मी?

**घुट्टक** : हो, तू—तू—तू—तू!

**पट्टिका** : मी पट्टिका स्वामिन! मी सेविका शांभवीची—जिच्या प्रतीक्षेत पळांचे युग होतात आणि पानांची वने होतात. मी शांभवी? मी तर वज्रिकाही नव्हे—

**घुट्टक** : मग वज्रिका कुठं आहे? वरवंटिका आहे कुठं? कुठं आहे लोटिका? आहे कुठं शांभवी—ह्या आम्रतरूची माधवी?

**पट्टिका** : वज्रिका एकरूप झाली शांभवीत—शांभवी लोटिकेत समर्पण पावली—आणि वरवंटिका—ती लंपट ओली वरवंटिका—माझी कृष्णकाय सखी—बसली आहे रुसून कोपऱ्यात—

**घुट्टक** : थांब! कुणीतरी येतंयसं वाटतं—

*[आतून 'कुणीही येत नाही. येणं येणं नाही आणि जाणं जाणं नाही—']*

**घुङ्गक** : कुणाचा हा स्वर? ह्यात अशी का दडावी ही गूढ आशयघनता?

येणं येणं का नाही?

जाणं जाणं का नाही?

*निजणं म्हणजे जागणं का आहे?*

आणि पाहणं म्हणजे डोळे मिटून घेणं का आहे?

*[आतून : 'पण ती येणार आहे']*

**घुङ्गक** : कोण येणार आहे?

**वल्लिका** : (प्रवेशून—तिच्या प्रवेशात सळसळ आहे. तीनच पदन्यासांत ती भिषा होते. नुकत्याच लपेटल्या शांभवीची हिरवळ तिच्या अंगोपांगांतून ओसंडते आहे.) मी वल्लिका—

**घुङ्गक** : छे, तूंच शांभवी!

**वल्लिका** : मी शांभवीची छाया

ती ब्रह्म, मी माया

ती प्राण, मी काया—

**घुङ्गक** : पण तू मला तर तू वाटतेस!

**वल्लिका** : छे! मी ती तू नव्हे, कारण हे ते नव्हे—जे हे नव्हे—शांभवी झिरपली आहे माझ्या धारांधारातून—जीवनतंतूंतून ती शिगोशीग भरून ओसंडली आहे—म्हणून मी तृप्त आहे—

**घुङ्गक** : पण ह्या तृप्तीचा उत्तराधिकारी मी आहे—

ही तृप्ती तुला मी लाभू देणार नाही—

**वल्लिका** : ओलावलेल्या जिव्हेला का तृप्ती लाभते—

व्हावा लागतो सारा देह ओला—

तंतूतंतूंनी विणलेला—

**घुङ्गक** : वल्लिके—स्पर्शून जा माझ्या

आरोमार्द्र कायेला

**वरवंटिका** : (घसरगुंडी करीत येते.)

ती म्हणते—

मी येत्ये—

**घुट्टक** : तू कोण? तूच शांभवी—
वल्लिके—त्ररवंटिके—पट्टिके—
तुम्हीच साऱ्या शांभवी—
**वरवंटिका** : हो, आम्ही शांभवी!
*[तिघीही हसतात. हसता हसता रज्जावरील मूळचा अंधुक प्रकाश आणखी अंधुक होतो आणि त्या तिघीही लुप्त होतात. एक बावरलेली किरण-शलाका वळणावळणांनी घुट्टकाला येऊन लिपून जाते. घुट्टक उजळतो आणि उजळत नाहीही!]*
**घुट्टक** : आज ह्या घटकेला काळ स्थिर झाला आहे का?
*[आतून : 'हे वाटणे म्हणजेच काहीही न वाटण्याच्या आधीची क्षणैक स्थिती.' शांभवी येते ती याच क्षणाच्या सरत्या निमिषात. लोटिका तिला घेऊन येते. शांभवीच्या नुसत्या दर्शनाने घुट्टक बेभान होतो.]*
**लोटिका** : कोण तू?
**घुट्टक** : कोण मी?
मी तर युगायुगींचा प्यासा
'आ'जीवनिचा मासा
मी तर पेयपांथ!
मी तृषार्त—
छांदस मी—मी द्रवार्त
बिंदुबिंदु काव्याचे
ठिपकठिपक टिपणारा
मी घुट्टक!
हरितगर्भ भाग्यवती कोण तू?
**लोटिका** : कोण मी? कोण मी?
तव पेयस पांथातिल
प्याऊ मी पाणपोय!
वेदातिल चषका मी
कुराणात प्याली मी
येशूच्या हातातिल

मीच ती गिलासिनी!
कोटिचंद्रगर्भा मी
कोटिकाव्यप्रसवा मी
मी रक्ता, आरक्ता
भुक्ता मी, मुक्ता मी
राधा मी, बाधा मी
अडखळती मीच चाल
घुटमळता मीच बोल
गेलेला मीच तोल
अनलातिल मी ज्वाला
प्रणयातिल मी बाला
शब्दातिल छंद मी
भावातिल गंध मी
अशाश्वतात शाश्वत मी
अंधारी भास्वत मी
सुरूप मी, अरूप मी
व्यथापुली कथाकली
मी आकुल, मी व्याकुल
मी मत्ता, मी लत्ता—
बसलेली मस्तकात
अंत मी, अनंत मी
शांत मी नि रुद्र मी
भव्य आणि क्षुद्र मी
एक मी, अनेक मी

*[सुमारे अडीच क्षण शांतता. घुट्टक भानावर येतो आणि संथ लयीत नृत्य करू लागतो.]*

**घुट्टक** : कळलेही मज अन
कळलेही नाही—छन!
तू माता शांभविची

पोटि तुझ्या शांभवी
कल्प कल्प वाट जिची
पाहत पाहत
उभा इथे
पकडाया उत्सुक मी
सरता एकेक क्षण—छन !—
**लोटिका :** पेयकाम घुङ्का
थांबवि हा पदन्यास
हे भयाण थप्प थप्प
थप्पक नर्तन तुझे—
आतुर ही शांभवी
नृत्यभया मम दुहिता—

**घुङ्क :** मी नाचत होतो का ? नाचत असेनही—पण नाचणे आणि न नाचणे ह्यात अंतरच कुठे आहे ? नृत्य म्हणजे तरी काय ? नृत्यनिर्मिती म्हणजे तरी काय ? कोण देईल मला ह्या प्रश्नांची उत्तरे ?

*[आतून आवाज : ह्या प्रश्नांची उत्तरे देणारी एकच शक्ती आहे.]*

**घुङ्क :** (ओरडून—पण हे ओरडणे जुन्या नाट्याभिनयपद्धतीचे नव्हे. हे ओरडणे ओठांबाहेर सांडते न सांडते इतकेच असावे. द्रव्यनाट्याच्या तरल प्रतिमासृष्टीत उठली तर एखादीच लहर उठावी ह्या ओरडण्याने...)

कोणती शक्ती ?

*[नेपथ्यातून गुहेतून उठल्यासारखे निनादांचे मोहळ उठते....' शांभवी.... शांभवी....शांभवीऽ....शांभवीऽ....']*

—काय ? ह्या साऱ्या प्रश्नांची उत्तरे देऊ शकशील शांभवी ? तू तू शांभवी ?

**शांभवी :** होय स्वामिन !
मी शांभवी—
मी देईन उत्तरे
प्रश्नाआधी—कारण
मी आहे वेदना

घाताआधीची
मी आहे भविष्य
वर्तमानापूर्वीचे
मी तर हरित स्पेश स्पेशला---
बदामिकांग
मियाँकित
आर्द्रा द्रवार्द्री नि
शर्क शर्क शर्करिता
दुग्धधुलित
थिरकचरण
तिरकनयन
हिरवाली—
गुङ्गिका वसुंधरैव
वर्तुला अनादि-अंत
नवकवितासदृश मी
आदि-मध्य-अंत-हीन
घुङ्गक : ओळखले—इवलाल्या उपमेने ओळखले
इवलाले मजला प्रिय
इवलाली कविता
इवलाले शब्द आणि
इवलाइवलाच अर्थ
उरला सारा अनर्थ
ये तर ये शांभवी—
थांब, पण मी तुला ये तरी कसे म्हणू ?
येण्याला देण्याचे आमंत्रण हवे,
तर येणे येते—
शांभवी : रे तृषार्त घुङ्गका
ह्या उद्धत मानिनीस
काय कुणी देणे !

घुङ्क तू नाममात्र
बरवे तुजलागि
रे कषायपात्र—
(गदगदून) घुङ्का, देत असते का रे कोणी कधी काही शांभवीला?
*[तिची ही आर्तता एक आगळा छेद देऊन जाते घुङ्काला आणि तो विव्हल होऊन म्हणतो—]*
**घुङ्क** : दे—देणे—देण्याला
देण्याते देण्याने
देण्याचा देण्याहून
देण्यात नि हे देण्या
छे! छे! छे!
भक्तिला विभक्तिचा
न प्रत्यय ये
शांभवी....
**शांभवी** : घुङ्का....
घेण्यातच देण्याचे
बीज असे—
देण्याविण नच घेणे
घेणे दडले देण्यांतरि
*[इथे शांभवीच्या भोवती एक अस्पृष्ट, गूढ तेजोवलय निर्माण होते.... आणि म्हणूनच तिला छंद जडतो ओवीचा....]*
**शांभवी** : ते घेतलियाचे देतणे।
की बसतलियाचे चालतणे
की सुलटियाचे उलटणे। घुङ्क घुङ्गा॥
जे पिइतल्याविण पाजितसे।
जे गिळितल्याविण गाळितसे
जे पळितल्याविण धावतसे। पायांवीण॥
जे कळितल्याविण बोलितसे।
जे जळितल्याविण पोळितसे

जे अधितल्याविण देखितसे। नसलेलेहि ॥
हे तो हा शांभवीची किमया।
की शंभुसुतेची माया
जिये छायेतूनि काया। निर्मिल्या पै ॥
**घुट्टक** : (अति आनंदून)
*हे का नवल मला?*
वाट तुझी माझी
किंचितशी वळ-वळणी
जुळजुळुनी आली....
नसल्याला असले
मी करणारा....
थेंबांतुनि शब्दांच्या!
तू आर्द्रा
चातक मी
ऊर्ध्वचंचु
**शांभवी** : हा हा रे ऊर्ध्वचंचु
घुट्टका—
घे तर घे...
कविवर्या घुट्टका
चारच चरणांतुनि तुझिया
आचरणाची
पदचिन्हे—ओळखली—केव्हाची—

*[घुट्टक किंचित अधोमुख होतो. त्या अधोमुखतेत काहीतरी गवसलेले हरवल्याचा खेद घुट्टकाच्या तृषार्त गळ्याच्या तीन वळकट्यांमागे साईसुट्यो करून दडला आहे.]*

**शांभवी** : सांग कुणी
कशास काय फसवावे
*अन मजला?*
*शांभविला?*

हरित स्पेश स्पेशलिला ?
बदामिकांग मिर्यांकित
आर्द्रा द्रवार्द्रा नि
शर्क शर्क शर्करिता
दुग्धधुलित थिरकचरण
हिरवाली शांभविला ?
हर हर !
ही छिन्ना
शांभवी
आज जाहली
खिन्ना—(लोटिका शांभवीला पोटाशी धरते.)
**घुङ्कक :** शांभवी....

*[प्रत्यंचेतून एखाद्या नवधनुर्धराच्या हातून सुटलेल्या तीरासारखा जाऊन लोटिकेवर कोसळतो. लोटिका आडवी होते. आणि शांभवी जमिनीवर अंग टाकते ती कायमची ! घुङ्कक लोटिकेला उठवून बसवतो. तिला चिलगलेले—तिच्यापाशी उरले आहेत दोनच थेंब शांभवीच्या आसवांचे. घुङ्कक त्या दोनच थेंबांचे दीर्घ चुंबन घेतो.]*

एवढंच त्याला
चिक्क चिक्क
चिक्कार झालं !
*[आता रङ्गावर आणि प्रेक्षागारात संपूर्ण अंधार आहे !]*

४

## मी नाही विसरलो

लहानपणी काही काही शब्द विलक्षण कुतूहल जागवतात. प्राथमिक वर्गात 'देवा तुझिया चरणीं नमितों – अंतऽऽस्करणीं तुज आठवितों।' ह्या कोण्या अनामिकाच्या शाळाखात्याने मंजूर केलेल्या कवितेनंतर 'उमाठ्यावरी येतसे सूर्य जेव्हां। नभीं होतसे चंद्र निस्तेज तेव्हां॥ तुझें चंद्राया सरे राज्य आतां। प्रतापी महाराज हा सूर्य येतां॥' अशी एक कविता पाठ करावी लागत असे.

वास्तविक चंद्रमौली उदाराने अत्यंत औदार्याने गंगेच्या जोडीला डोक्यावर चंद्रालाही पोट-भाडेकरू ठेवून, त्याला भलतेच स्थान दिले आहे. त्या भोलानाथानंतर समस्त कविजनांनी चंद्राला अक्षरशः डोक्यावर घेतले आहे. (आणि इतरांचे डोकेही उठवले आहे!) परंतु ह्या सरकारी शाळाखात्याने मंजूर केलेला असा एक कवी निघाला की, त्याने काही कारण नसताना सूर्याची नेमणूक झाल्यावर चंद्राला निष्कारण हिणवून ठेवले. सरकारी शाळाखात्यात त्यावेळी असल्या मंजुरीलायक कविता कोण लिहीत असेल देव जाणे! त्या बिचाऱ्या श्रेष्ठ कलावंतांनी संस्कृतीच्या करूनसवरून नामा-निराळे राहण्याच्या परंपरेला अनुसरून, अजंठा-वेरूळच्या कलावंतांप्रमाणे

कवितेखाली आपले नावही दिले नाही! 'वाहवा वाहवा वेंड्र हा' आणि 'भो पंचम' ही हातवारे करून म्हणायची काव्ये लिहिणाऱ्या 'मिस मेरी भोर'चे नाव सोडल्यास, त्यावेळी निदान मराठी चौथीपर्यंत तरी एकाही कवीने अगर धडे लिहिणाऱ्याने कुठल्या तरी धड्याखालचे 'जयपाळ' आणि 'कीर्तने' (चू० भू० घा० घ्या०) ही नावे सोडून स्वतःचे नावगाव कधी दिले नाही. 'मिस मेरी भोर' हादेखील कवितेतलाच एक भाग आहे, असे त्यावेळी वाटे. "हा आला हा धरिला—" पासून "मिस मेरी भोर"पर्यंत कविता आहे, असा प्रामाणिक समज होता. पुढे भारतीय संस्कृतीच्या अनामिकतेशी परिचय झाल्यावर ही मेरी आपली नसावी म्हणून तिने नाव घातले असावे, असे स्वतःचे समाधान करून घेतले. परंतु पुढे केव्हातरी मिस मेरी भोर ही गोरीभोर नसून काळीभोर होती असे कळल्यावर थोडे दुःख झाले. मुद्दा मात्र ह्यातला कुठलाच नाही. मुद्दा आहे काही अविस्मरणीय शब्दांचा!

'देवा तुझिया चरणीं नमितों'बद्दल फारसे कुतूहल नव्हते. चार ओळींची कविता अंतःकरणाचा ठाव नाही घेऊ शकली. 'पण उमाठ्यावरी येतसे सूर्य जेव्हां' तेव्हा मात्र डोळ्यांपुढे चित्र उभे राहिले आणि पहिली ठेच लागली ती उमाठ्यावर!

आयुष्यात हा 'उमाठा' त्यावेळी जो आला त्यानंतर पुन्हा कधीच भेटला नाही.

माझ्या बालपणी सूर्य यायचा तो गावदेवीच्या पलीकडच्या इमारतीच्या छपरावरून, त्यामुळे उमाठा हे प्रकरण काय आहे याची उगीच हुरहूर लागून राहिली होती! त्यानंतर डोळ्यांखालून लाखो शब्द गेले, पण 'उमाठा' काही पुन्हा भेटला नाही. चंद्राला हिणवण्याचे कारण कळले नाही, ह्याचे बालपणी दुःख नव्हते. पण हा उमाठा कुठे असतो, हे मात्र कित्येक वर्षे कळले नव्हते. त्यानंतर वाङ्मयात उमाळे आले, इतिहासात उमराठे आले, उंबरठेही ओलांडले, पण इन्फंटीनंतर किंवा कदाचित पहिलीनंतर 'उमाठा' जो एकदाचा नाहीसा झाला तो पुन्हा भेटला नाही. पण मी उमाठ्याला विसरू शकलो नाही. विसरणार नाही.

उमाठ्यासारखीच 'सज्जन' नावाच्या एका शब्दाने अशीच हुरहूर लावली होती. ह्याच उमाठ्यावर सूर्य आल्यानंतर, 'कोल्हे तसे चोर वनीं'

दडत असत आणि मग 'कामें करू सज्जन हे निघाले!' राणीच्या बागेत कोल्हा पाहिला होता. 'करावें तसें भरावें'मध्ये विहिरीच्या काठावर बसलेले पिन्या आणि काळ्या हे चोरही पाहून परिचित झाले. परंतु कामे करू निघणारे 'सज्जन' काही आढळत नव्हते. कित्येक दिवस सकाळी उठल्या-बरोबर सज्जन पाहावा म्हणून चाळीच्या कठड्यापाशी मी उभा असे. पण रस्त्यातून पेपरवाले, दूधवाले भय्ये, किंवा सकाळच्या वेळी विरुद्ध दिशेला निघालेली शेजारची नारूचे बाबा, रेगेकाका, अण्णा देव वगैरे मंडळी दिसायची. त्यांना सज्जन म्हणवत नसे. सज्जनाची मूर्ती डोळ्यांपुढे उभी राहायची ती कोल्हे आणि चोर वनात दडल्यावर कपाळाला गंध लावून, रुमाल बांधलेल्या, लांब डगला घातलेल्या, जंगलातून चाललेल्या माणसाची! तसला 'सज्जन' अजूनही काही सापडत नाही, त्यामुळे 'मना सज्जना भक्तिपंथेचि जावें' हा श्लोक पहिल्यांदा पाठ करायला घेतला, तेव्हा हा 'मना' नावाचा सज्जन कामे करू निघालेल्या सज्जनांच्या कुटुंबातला असावा, असे उगीचच वाटले!

असाच आणखी एक शब्द कित्येक वर्षे भेटला नाही. 'परोपकारी संभू'ची आठवण बरीच मंडळी विसरली असतील. पण मी नाही विसरलो. कारण तो संभू 'विरळा' होता. हा 'विरळा' आता फारच विरळा होत चाललेला आहे. आता 'विरळा' येतो तो 'क्वचित' होऊन! पण 'विरळ्या'ची मजा क्वचितला क्वचितच येते! कधीमधी भेटलाच तर संभूची आठवण देऊन जातो. डाळेकुरमुरे आणि उसाचा रस आणणारा भडभुंजाचा रामू (बहुतेक रामू) जसा डाळेकुरमुरे किंवा उसाचा रस दिसला की माझी स्मृती चाळवून जातो, तसाच हा संभू! जुन्या शब्दांसारखी ही काही जुनी मंडळीदेखील हुरहूर लावून गेली आहेत.

"काका उठा, दार उघडा. हा रामा आला—" ह्या धड्यात काकाला उठवणाऱ्या ह्या पुतण्याचे नाव काय असेल याची तो धडा वाचल्या दिवसा-पासून मला रुखरूख लागून राहिली आहे. सामान्यतः जुन्या एकत्र कुटुंबात पहाटे पोरांना उठवण्याचे कार्य वडील मंडळी करायची. पण 'हा रामा आल्यानंतर'देखील डाराडूर झोपून राहिलेले 'काका' आणि त्यांना 'उठा— दार उघडा' अशी 'ऑर्डर' देणारा हा पुतण्या भलताच धीट वाटायचा!

पुतण्याचं नाव आणि पत्ता गुलदस्तात ठेवून लिहिलेली ही जुनी नवकथा धूसर वातावरण ठेवण्याच्या बाबतीत 'आद्य' ठरावी! 'काका उठा!' ह्या वाक्याने ओसरीवर घोरत पडलेले काका आणि त्यांचे पांघरूण ओढणारा पुतण्या ह्या प्रतिमा डोळ्यापुढे येतात.

तसाच तो पाटावर बसलेला मुरलीधर. अजूनही मुरलीधर नावाचा कोणीही इसम भेटला की, दुधाची वाटी आणणारी सगुणा नावाची त्याला बहीणही असावी असे आपले उगीचच वाटते! वाङ्मयाचा चिरकालीन परिणाम राहतो म्हणतात तो हाच असावा. अशीच दुसरी बहीणभावंडे मनाला चटका लावून गेली ती 'मोरू आणि काशी'! दसऱ्याला आपट्याच्या पानाबरोबर सायंकाळी सोने लुटून आलेल्या मोरूची आठवण येते. भावबंधनातला अंगभर सोने चढवून आलेला मोरू प्रथम मी पाहिला तेव्हा मी ह्या सोने लुटणाऱ्या मोरूच्या आठवणीने गहिवरलो होतो. आणि त्याला दारी येऊन ओवाळणारी काशी! देशमुखांच्या घरी सकाळीच सुरू झालेला चौघडा. आणि हातपाय धुवून देवाच्या पाया पडायला लावणारा मोरूचा बाप! थोडक्यात, शरद्‌बाबू, हरिभाऊ यांच्यासारख्यांनी निर्माण केलेल्या खूप व्यक्तींचा परिचय झाला; पण मोरू, काशी, मुरलीधर, सगुणा, मोरूचा बाप, परोपकारी संभू, काळ्या आणि पिऱ्या हे अनुक्रमे बुडून आणि मिठाई खाऊन मेलेले चोर, शहर पाहण्यासाठी आलेले होनाप्पा आणि सातप्पा हे कोष्टी, रामा धार काढायला आला तरी घोरत पडलेले काका, ह्यांची सृष्टी शंकरमामंजी, श्रीकांत, गणपतराव, यशवंतराव, भावानंद, वंदना, विप्रदास, या साऱ्यांहूनही मनात अधिक पक्के ठाण मांडून बसली आहे.

ही माणसे काय किंवा ते शब्द काय, डोळ्यांपुढे अजून मूर्त होऊन येतात.

माझ्या लेखी मोरूची शेंडी बनातीच्या टोपीतून बाहेर आली आहे.... ओवाळणाऱ्या काशीचे नाक टोचून काडी घातली आहे आणि तिला नाकपुडीवर लालसर पुळी आली आहे. संभूने धोतराचा काचा मारून पायात कोकणी वहाण घातली आहे. मुरलीधराच्या कानात भिकबाळी आहे आणि सगुणा दुधाची वाटी आणताना, बेंबीजवळ परकर खोचून चालत येते आहे. पिऱ्या आणि काळ्या हे दोन चोर चोरीचा धंदा करण्यापूर्वी

आगगाडीच्या इंजिनात कोळसे घालणारे फायरमन असावेत आणि मोरूचा बाप चकणा असावा असे त्यावेळी जे मी ठरवले होते, त्यात अजूनही बदल होऊ शकत नाही! शाळेतल्या पोरांना लाकडाच्या मोळ्या आणायला लावणारा सांदीपनी आम्हांला विड्या आणायला सांगणाऱ्या छत्रेमास्तरांसारखा मला अद्यापी वाटतो. सर्वांचे चेहरेमोहरे पक्के आहेत.

मी खरा चोर पाहिला त्यावेळी आठनऊ वर्षांचा होतो. बेड्या घालून एक चोर पोलिसांनी रस्त्यातून चालवला होता आणि मधले बोट धरून वडिलांनी मला रस्त्यातून चालवले होते. त्या चोराने माझी स्वप्नसृष्टी पार ढासळून टाकली होती. चोर हा काळाच असला पाहिजे असा मी माझ्या मनाशी निर्णय केला होता. परंतु मी प्रथम पाहिलेला चोर पोलिसापेक्षा गोरा होता. त्यामुळे पोलिसाने चौकीवर वर्दी द्यायला आलेल्या मालकालाच चोर म्हणून पकडले असावे, असे वाटून मी खिन्न झालो होतो! अजूनही "असुनि खास मालक घरचा म्हणति चोर त्याला...." ही ओळ ऐकली की मला तो गोरा चोर आणि काळा पोलीस आठवतो.

अशी स्वप्ने भंगवण्याचे पाप चोराप्रमाणे 'दिपोटी'नेही एकदा स्वतःच्या माथी घेतले आहे. दिपोटी हा उंच आणि लठ्ठ असतो आणि तो पगडी आणि फुलबूट घालतो ह्या व्याख्येत मी पाहिलेला पहिला 'दिपोटी' बसला नाही. तो नुसतीच काळी गोल टोपी घालून आला होता. आणि मास्तरांनी आम्हांला फसवले असावे, असे मला राहून राहून वाटले होते. एकदा मनात मांडलेल्या चित्रांची लगोरी पडली की पडली. ती पुन्हा उभी करणे मुष्कील होते. कारण त्यानंतर बऱ्याच वेळा दिपोटी आले. पगडी-फुलबूट घातलेले दिपोटीदेखील आले. पण दिपोटी आणि चोर कसाही असू शकतो हे सत्य ती लगोरी एकदा उधळून गेले ते गेलेच.

प्रत्येक विषय असा एक निरनिराळ्या जातींचे ठसे घेऊन येत असे.

काळ-काम-वेगात मजुरांची गणिते असायची. सगळ्या मजुरांना अ, ब किंवा क अशी एकाक्षरी नावेच असतात, असा माझा दृढ समज त्या गणितांनी करून दिला होता. अ हा मजूर सद्गुणी असायचा, ब थोडासा बावळट, धांदरट आणि क हा लुच्चा हे समीकरण मनात पक्के होते. मराठी शाळेतून इंग्रजी शाळेत शिरण्याच्या अवधीत उपनगरात आमचे घर बांधायला

सुरवात झाली आणि काळ-काम-वेगातले गोखल्यांच्या गणितात वस्ती करून राहिलेले मजूर प्रत्यक्षात पाहण्याचा प्रसंग आला, तेव्हा त्यांतले 'अ' मजूर कुठले, 'ब' कुठले, आणि 'क' कुठले असतील, याचे अंदाज घेत मी माझ्या नव्या घराचे बांधकाम पाहायला जाऊ लागलो. बेडरूम, प्लिंथ आणि व्हरांडा (हा शब्द मोठी माणसे बायकांच्या देखत कसा म्हणतात याचे मला कुतूहल होते!) हे शब्द मी फार लहानपणी शिकलो. शेवटपर्यंत मला 'अ' मजूर व 'ब' मजूर किंवा 'क' मजूर आढळले नाहीत. मीमण्णा नावाचा एक काटकोळा, काळारोम कामाठी मजूर मला आठवतो. माझ्या 'अ' मजुराच्या चित्राशी त्याचे रूप जुळणारे होते. परंतु त्याचे नाव 'अ' नसून मीमण्णा आहे हे मला कळले, तेव्हा मला उगीचच खट्टू झाल्यासारखे वाटले.

भूगोलाने संस्थाने पिवळी असतात असे शिकवले होते. साहेब लाल असल्यामुळे त्याचा मुलूख लाल असावा, ही पक्की समजूत होती. परंतु माझ्या पाहण्यात पहिले संस्थान आले ते कोल्हापूर. वयाच्या सातव्या किंवा आठव्या वर्षी मी कोल्हापूरला गेलो. आणि तिथली माती, रस्ते, इमारती, राजवाडा—कुठे कुठे म्हणून मला पिवळा रंग आढळला नाही आणि भूगोलावरचा माझा विश्वास उडाला! इतिहासात युद्ध चालू असेपर्यंत मी आनंदात असे. विशेषतः राक्षसतागडीची लढाई कोणाकोणात झाली हे मला कधीच आठवले नसूनही ती लढाई 'राक्षसतागडी' ह्या नावामुळे स्मरणात राहिली. आजमितीलाही मी आठवून पाहिले तरी राक्षसतागडीची लढाई कोणी केली हे मला स्मरत नाही. परंतु राक्षस आणि तागडी ही परस्परांशी अजिबात संबंध न येणारी मंडळी एकत्र कशी आली, ह्या विचारामुळे ते नाव डोक्यात राहिले.

खर्ड्याची लढाई, डभोई, प्लासी, वसई वगैरे गावे 'काय कोठे कशाविषयी प्रसिद्ध' ह्या प्रश्नात हटकून यायची.

लढायांशी आपले भांडण नव्हते. पण 'तह' हा शब्द मात्र अजिबात न आवडणारा. 'तह' आला की कलमे आली. 'तहाची कलमे' हा इतिहासातला एक कमालीचा तापदायक भाग. युद्ध परवडे, पण 'तह' नको वाटे! *युद्धात मौज होती, तहात 'अभ्यास' यायचा.* अजूनदेखील 'तह' म्हटले की भीती वाटते. हरलेल्या पक्षाने 'तैनाती फौज' ठेवण्याचे आणि

कुणीतरी कुणाला तरी मुलूख तोडून देण्याचे त्यात कबूल केलेले असायचे. 'मुलूख तोडून दिला' हा वाक्यप्रयोग आला की फौजेतले हरलेले भिडू भाले-तरवारी टाकून निमूटपणे हातात फावडी, कुदळी, कुऱ्हाडी घेऊन मुलूख तोडायच्या कामाला लागले आहेत, हे दृश्य अजून डोळ्यापुढून हलत नाही. 'चौथाई आणि सरदेशमुखी वसूल करायचा हक्क'देखील इकडून तिकडे जायचा! ही चौथाई सरदेशमुखीच्या जोडीजोडीनेच का जायची देव जाणे! कुणी कुणाला नुसतीच चौथाई दिल्याचे आठवत नाही. किंवा "तूर्त सरदेशमुखी घ्या. चौथाईचे पुढल्या लढाईच्या वेळी पाहू." असे म्हटल्याचेही स्मरत नाही! ह्या तहाच्या 'वाटाघाटी' नावाचा प्रकार होता, ह्या कशा होत असतील हेही एक कुतूहल होते. ते मात्र अजून आहे. दिल्लीला बडे पाहुणे आंतरराष्ट्रीय पातळीवर कशा चर्चा करतात हेदेखील मला अजून सतावणारे कोडे आहे. समोर फुलदाण्या आणि सातआठ चित्रविचित्र पदार्थांनी भरलेली काचपात्रे ठेवून मंडळी आंतरराष्ट्रीय पातळीवर बासुंदीचा भुरका कसा मारीत असतील, हे एकदा 'याचि देहीं याचि डोळां' पाहिल्याशिवाय माझा शेवटचा दीस गोड होणार नाही!

भूगोलाच्या पुस्तकात 'व्यापारी वारे' नावाचा प्रकार होता. हे बाणाबाणांनी नकाशात दाखवलेले असत. ते नेमके केव्हा सुरू होतात हे आता मला आठवत नाही. किंबहुना, व्यापारीदेखील दुकानदाराहून निराळा दिसणारा प्राणी असावा असा माझा समज होता. परंतु व्यापारी वाऱ्यांचे हे बाण आकाशात कधीतरी पाहायला मिळावेत, अशी एक बालपणी फार इच्छा होती. ती अजून तृप्त झाली नाही. तीच गोष्ट विषुववृत्ताच्या पट्ट्याची! हा पट्टा एवढ्या पृथ्वीच्या पोटावरून ओढायचा खटाटोप करणारा कोण बरे हा महाभाग असेल याच्या चिंतेने मी बरीच वर्षे हैराण झालो होतो. आकाशातले सप्तर्षी मी प्रथम पाहिले तेव्हा त्यांपैकी एकाही ऋषीची दाढी न दिसल्यामुळे आपली काहीतरी फसवणूक करण्यात येत आहे, ही माझी ठाम समजूत होती. "सप्तऋषींमध्यें सती बैसलीसे अरुंधती—लाडक्या ह्या आजीसंगें झिम्मा खेळूं ये" ही ओळ पाठ झाल्यावर अरुंधती स्वतःच्या समोर लहानशी बुरंडीबुट्टी घेऊन कापूस पिंजण्याच्या धनुकलीने वातीसाठी कापूस पिंजत असावी, हे एकमेव दृश्य कित्येक वर्षे मी डोळ्यांपुढे बाळगून होतो.

ह्याच कवितेतली एक ओळ मात्र मला अजिबात आवडत नसे. 'आका-शिंच्या ताऱ्यांसंगें झिम्मा खेळूं ये!' ही कविता लिहिणाऱ्या कवीने ताऱ्यांना 'शिंच्या' का म्हटले हे मला कळूच शकले नव्हते! 'आकाशिंच्या'मधली 'आका' आणि 'शिंच्या' ह्या अक्षरांच्या गैरविभागणीतून हा गोंधळ झाला, हे कळायला मला फार दिवस लागले. असले काही शब्द वाचून मला थोडेसे जागच्या जागी लाजल्यासारखे होत असे. विशेषत: शिवाजीच्या तलवारीचे नाव 'भवानी' किंवा तानाजीच्या घोरपडीचे नाव 'यशवंती' हे मला जितके प्रिय होते तितकेच अर्जुनाच्या धनुष्याचे नाव वाचताना आपल्याला कुणी पाहिले नाही ना, अशी भीतीदेखील वाटायची! संत मंडळीत रामदास हा अत्यंत प्रिय. कारण त्याने औरंगजेबाला 'बुडाला औरंग्या पापी' म्हणण्याचे श्रेष्ठ धारिष्ट जीवी धरले होते! रामदास शिवाजी-महाराजांना गुपचूप युक्त्या सुचवून जात होते, असा एक दृढ विश्वास होता. औरंगजेबाला 'औरंग्या' म्हणणाऱ्या ह्या समर्थांबद्दल भयंकर आदर वाटायचा. फक्त इतक्या समर्थ माणसाला 'कुबडी' कशाला लागते हे कळत नसे! पुढे माझ्या वर्गातल्या एका मित्राने त्या कुबडीत सुरा लपवलेला असे हे गुह्य मला सांगितले तेव्हापासून तर 'असा चतुर पुरुष होणें नाहीं' असे मला वाटू लागले. 'बोहले' हा शब्द मी पहिल्या प्रथम मनाच्या श्लोकाच्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत वाचला. बोहल्यावरून समर्थ पळाले, ह्या घटनेचा मनावर इतका परिणाम झाला की कुठल्याही लग्नात बोहले पाहिले की समर्थांची आठवण व्हायची! ह्या महातेजस्वी ब्रह्मचाऱ्याची आठवण बोहल्यापाशी निगडित व्हावी ही घटना योग्य नाही हे आज पटते. परंतु केवळ त्या शब्दाने केलेली ती किमया आहे.

आज कित्येक शब्द विस्मृतीच्या पडद्याआड गेले. जुन्या पगड्या जशा गेल्या तसे शब्द गेले. आता पूर्वीसारख्या अबला 'गर्तेत' कुठे पडतात? गर्ता पाहण्याची इच्छा राहून गेली. 'हरहर', 'अहह' वगैरे भारदस्त मंडळी आता चुकूनदेखील भेटत नाहीत. माणसाला हल्ली 'आनंद' होतो, परंतु 'संतोष' झाल्याचे आढळत नाही. 'इकडील सर्वत्रांनीं क्षेम' असायचे सोडूनच दिले आहे. 'त्रिकालचरणीं मस्तक' ठेवायला कुणाचे डोके ठिकाणावरच नाही! 'बालकें राजारामाचा शि. सा. न.' हे वाचून राजाराम हे चांगले

पंचेचाळीस वर्षांचे 'बालक' आहे हे पटत नसे. पण आता बालके राहिलेली आहेत कुठे? सर्व मंडळी एकदम 'प्रिय' झाली!

परवा कित्येक वर्षांनी एका विद्वानांच्या लेखात मला 'एकसमयावच्छेदेंकरून' आढळला आणि जुना मित्र भेटल्याचा आनंद झाला. त्या वाक्यावर मी घोटाळलो. 'एकसमयावच्छेदेंकरून' ला कडकडून भेटलो. हा भारदस्त गृहस्थ आता पूर्वीसारखा नाही भेटत. 'खचित', 'गमत' 'अजि', 'वर्तलें' वगैरे नाटकी मंडळींचे दर्शनदेखील जुन्या कंपनीच्या नटांच्या दर्शनाइतकेच दुर्मिळ झाले आहे! जुन्या नाटकांच्या पदांतून ही मंडळी कंपन्यांच्या बिऱ्हाडी सदैव वस्तीला असायची. ऑथरच्या हाकेला 'ओ' देऊन यायची आणि नटाच्या गळ्याशी लागायची. नाटक मंडळ्यांनी ऑर्गन-तबले उचलले आणि 'खचित', 'गमत' वगैरे उपेक्षेच्या अंधारात गेले. 'गम'ल्याने तर नाटकमंडळ्यांत कित्येक वर्षे मुक्काम ठेवला होता. 'भज गमे ऐसा जनक तो', 'गमते सदा मजला', 'गमली मना निज साउली', 'गमे सुख आजि' (ही ऱ्हस्व 'आजी'देखील नाटकांतून 'आजि राधाबाला', 'आजि टाकुं गडे धनवेषा', अशी खूप वेळा डोकावून जायची!) 'मम आत्मा गमला' अशा नाना तऱ्हेने हा नाटकात गमला होता. आता कुठे लोपला कोण जाणे!

अशी खूप मंडळी लोपतात. सार्वजनिक स्मरण फार अल्पायुषी असते अशी इंग्रजीत म्हण आहे. वादळात सापडलेल्या त्या बिचाऱ्या सोमदत्ताला शेवटी कुठे आसरा मिळाला की नाही, अजूनही कळत नाही. 'विरोळ्यानं काय सांगितलें?' ते आठवत नाही, पण 'विरोळा' आठवतो. 'धरा बुद्धि पोटीं' हे पाठ करताना पडलेल्या, बुद्धी डोक्यातून पोटात कशी गेली ह्या कोड्याचे उत्तर सुटायचे आहे! फुलांस देऊन स्वागत करणारे सन्मित्र आता राहिले आहेत, ते केवळ आठवणीत. 'इतुकें बोलुनि थकलीं सुकलीं मुकलीं' इत्यादी जाईची दिव्य फुले भेंड्या लावताना 'इ' ह्या प्रारंभाक्षरामुळे अधिक प्रिय वाटत होती. 'कलंक मतिचा झडो – विषय सर्वथा नावडो' ही प्रार्थना शाळेत इतके विषय शिकवीत असताना मंजूर कशी झाली, ह्याचा अचंबा ओसरायला बरीच वर्षे लागली! 'लवथवती विक्राळा'तला 'लवथवती' फक्त गणपतीच्या दिवसांत भेटतो. लवथवतीला त्या आरतीखेरीज कुठेही लवथवायला मिळाले का नाही? का ही उपेक्षा?

बालमनाच्या कोपऱ्यात या मंडळींनी एके काळी आपली इवलीशी चूल मांडली होती. जुने शेजारी अचानक भेटावे आणि त्यावेळी आपले फारसे पटत नसले तरी जुना शेजार आठवून क्षणभर अंतःकरणात काहीतरी पाझरल्यासारखे व्हावे, असे मात्र ह्या उमाळ्यावर उगवलेल्या आठवणींनी झाल्याशिवाय राहात नाही. मनाच्या खोल गुहेत त्यांनी आपला अजिंठा उभा केला आहे. काही चित्रे पुसली आहेत. काही ढेपाळली आहेत. ....पण पार वाहून मात्र गेली नाहीत. मी माझ्या ह्या कोवळ्या चित्रसृष्टीतल्या सोंगड्यांना नाही विसरलो!

◊ ◊

५

## घरमालकास मानपत्र

" मालक, आपले आणि आमचे, मालक आणि भाडेकरू संबंध प्रस्थापित होऊन किती काळ लोटला हे भाड्याच्या पावत्यांवरून आपल्या सहज लक्षात येईल. वास्तविक हा संबंध कधी घडून येईल असे स्वप्नातही वाटले नव्हते. किंबहुना ज्या दिवशी आपली चाळ उभी राहिली, त्या दिवशी 'याचि देहीं याचि डोळां' आम्ही डोळ्यांपुढे जे दृश्य पाहिले ते पाहून 'घोडा घोडा म्हणतात तो हाच का?' ह्या चालीवर 'चाळ चाळ म्हणतात ती हीच का?' असा प्रश्न त्या चाळीप्रमाणेच आमच्यापुढे उभा राहिला. जीवनाला विल्यम शेक्सपिअर नामक इंग्रजी नाटककाराने रंगभूमीची उपमा दिली आहे. आपली आणि आम्हां मंडळींची गाठ हा एक नाट्यप्रसंगच! संघर्ष हा नाट्याचा पाया असतो म्हणतात. पण संघर्षाची कुठलीही ठिणगी पडू न देता अनपेक्षित कलाटणी देऊन कोणत्याही प्रसंगातून नाट्य निर्माण करण्याचे आपले कसब अजब आहे. आपला सदा प्रसन्न चेहरा. वजनी आणि मापी ऐसपैस देहसौष्ठव. मधूनच खांदे उडवण्याची लकब. शिवप्रभू-प्रमाणे गुडघ्यात अमळ अधू असल्याप्रमाणे चालण्याची ढब. ह्या साऱ्या गोष्टींनी आपल्या ठिकाणी एक आगळेच व्यक्तिमत्त्व आकारून आले आहे.

आपणांप्रमाणे आपले वज्रचुडेमंडित कुटुंबही ! विस्तारभयामुळे मालकीणबाई-संबंधी लिहीत नाही. परंतु अहिल्यामाता, जिजामाता ह्यांच्याच तोलाचे त्यांचे मोल. आणि आपली अपत्ये ! त्यांच्याबद्दल तर लिहावे तितके थोडेच आहे. मानपत्राच्या प्रारंभी ह्या सर्वांचे भरल्या अंतःकरणाने, फुटल्या कोपरांनी, मोडल्या कंबरांनी आणि मुरगळल्या पायांनी स्मरण करून हे मानपत्र दृष्टीखाली घालावे अशी आपणांस नम्र विनंती करतो.

नकळत आपल्या अतिप्रेमळ सहवासातले अनेक प्रसंग डोळ्यांपुढे उभे राहतात. आमच्या 'रोज रोज तेच ते' जीवनाला आपण विविधता आणण्याच्या कार्यात केवढा हातभार लावलात ! सुरवातीचाच प्रसंग ! जणू आज घडल्यासारखाच उभा राहतो. आपण आमच्याकडून प्रत्येकी पाच पाच सहस्र रुपये घेऊन आमच्या निवाऱ्याची सोय करण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतलीत. त्यावेळी आमच्या भावी 'संसाराचें चित्र चिमुकलें' रंगवताना आपल्या ओठावर सरस्वती नाचत होती आणि जिभेवर शारदा बागडत होती. ब्रह्मदेवाने लाजेने आपली चारी तोंडे खाली घालावी असे आपल्या वाणीला सामर्थ्य आले होते. आमच्या त्या दोन खोल्यांच्या ब्लॉकला चारी बाजूंनी उजेड येणार होता आणि अष्टदिशांनी वारे खेळणार होते. दोन्ही खोल्यांतच काय, परंतु गॅलरीवर, गच्चीत, मोरीत आणि शौचकूपात देखील आपण पंखे लावणार होता. जिन्याच्या पायऱ्यांवर मखमली गालीचा पसरणार होता. त्याची जाडी सहा इंच असावी की बारा ह्या चिंतेने आपणांस झोप येत नव्हती. इस्लामी बंधूंच्या नमाजाप्रमाणे, दिवसातून तीन वेळा चाळ साफ करण्यासाठी आपण लक्ष्मीधरांचा ताफा ठेवणार होता. (मालक, झाडूला 'लक्ष्मी' म्हणतात हे तुम्हीच आम्हांला सांगितलेत आणि 'स्वच्छता म्हणजे संपत्ती' हे आपल्या पहिल्या भेटीत आपल्या मुखातून आमच्या श्रवणी पडलेले पहिले सुभाषित.) भिंतींनाच काय, पण मोरीच्या कट्टयालादेखील ऑइल पेंट लावणार हा आपला हट्ट होता. आपल्या ह्या औदार्याने व्याकुळ होऊन 'निष्कारण खर्च करू नका' म्हणून आम्हीच आपणांस ह्या विचारापासून परावृत्त करीत होतो. पाण्याचे नळ ही तर सामान्यच गोष्ट, परंतु आपली भरारी प्रत्येकाच्या खोलीसमोर कारंजे खेळवायची होती. चाळीच्या मधल्या चौकात पुष्पवाटिका कराव्या,

ग्रीष्मागार बांधावे की शनवारवाड्यात होते तसले छप्पन्न पाकळ्यांचे कारंजे करावे ह्या विषयावर आपल्या प्रेमळ छत्राखाली येऊ इच्छिणाऱ्या भाडेकरूंना आपापसात एकमत करता न आल्यामुळे "तूर्त चौक तसाच ठेवावा लागेल तर" हे वाक्य उच्चारताना आपल्या डोळ्यातून त्या छप्पन्न कारंज्यासारखे अश्रू वाहिले होते. गॅलरीत आपण कॅशिया, मॅग्नोलिया, डेलिया, गुलमोहर, गार्डेनिया, ग्लॅडिओलूस, डॅफोडिल्स, अशा परदेशी पुष्पसृष्टीचा वसंत फुलवणार होता. एका हातात पोचा सीड्सचा क्याटलॉग आणि दुसऱ्या हातात पालेकर कंपनीची पुस्तिका घेऊन कुठल्या भाडेकरूच्या दारात काय शोभेल याची चिंता करीत उभी असलेली तुमची मूर्ती पाहून आम्हांला तुमची चिंता वाटत होती. नळावरच्या भांडणांनी चाळीचे स्वास्थ्य बिघडते म्हणून—दर पाच पावलांवर एक-एक तोटी ठेवायचे आपले धोरण होते. खेळत्या पाण्याने खेळते वातावरण ठेवण्याच्या आपल्या योजनेने समस्त भाडेकरूंच्या तोंडाला पाणी सुटले होते. प्रत्येक माणसाच्या उशाशी पाण्याचा तांब्या आणि पायाशी पांघरूण याखेरीज सर्व सोयींचे अभिवचन आपण दिले होते.

नीटनेटका प्रपंच हा नीटनेटक्या स्वयंपाकघराशिवाय अशक्य आहे हे आपले दुसरे सुभाषित. ह्या दृष्टीने आपण आखलेल्या स्वयंपाकघराच्या योजनेत तर इकडली भांडी तिकडे करायची आमची प्राज्ञा नव्हती. चुली गॅसवर पेटणार होत्या. मोरीच्या कट्टयाला पाणी जाण्यासाठी अनेक वाटा होत्या. भिंतीवर तर इतक्या फळ्या येणार होत्या की, त्या फळ्यांतून भिंती शोधून काढणे अशक्य झाले असते. कपडे वाळत घालायच्या तारांचे तर डोक्यावर जाळे बांधून कपडे लवकर वाळावेत म्हणून आपण त्यांतून हवा खेळवणार होता! आणि धुणी वाळत घालायच्या काठ्यादेखील पुरवायचे अभिवचन आपण दिले होते. "स्नानगृहात गीझर लावू—की इमर्शन हीटरच चालेल?" हा आपला प्रश्न ऐकूनच आनंदाने न्हाऊन निघाल्याचा आम्हांला भास झाला होता. कोळशांच्या पोत्यांना भुयारे बांधणार होता. एका साइजची टमरेले खरीदणार होता. भिंतीत बिजागऱ्या बसवून डायनिंग टेबले करण्याची आपली कल्पना अभिनव होती. त्याशिवाय वॉशबेसिन्स, सिंक्स, 'शॉवर' अशी अनेक न ऐकलेली नावे आम्ही त्या सुमारास ऐकत होतो.

'यथा राजा तथा प्रजा!' ह्या न्यायाने नव्या घराचा आपला उत्साह आम्हा भाडेकरूंनाही उत्साहित करीत होता. इतर भाडेकरूंचे हाल पाहून आम्हांला वाटणारे दुःख आम्ही आपल्या चाळीचे बांधकाम पाहायला येताना व्यक्त करीत होतो. आपण आम्हांला देऊ केलेल्या सगळ्या सोयींच्या वर्णनात आमची थोडी भर टाकून आम्ही त्यांचा पाणउतारा करण्यात धन्यता मानीत होतो.—गॅसच्या चुलीवर स्वयंपाक करणारे आमचे कुटुंब आणि पुढल्या दारच्या मॅग्नोलिया, ग्लॅडिओला, कॅशिया अगर अशा कुठल्या तरी विलायती फुलांचा वास घेत उभे असलेले आम्ही, चौकातील ग्रीष्मगृहात आराम करीत पडलेले आमचे शेजारी, न्हाणीघरातल्या गीझरच्या उन्हाळी झऱ्यात डुंबणारी आमची अपत्ये आणि डोक्यावरच्या पंख्याने वाढणारा आमच्या पाहुण्यांच्या असूयेचा दाह—हे आमच्या भावी संसाराचे लोभसवाणे चित्र होते.

शंकेला जागा नव्हती! पायाभरणीला सुरवात झाली होती. त्या वेळी ठिकठिकाणचे खड्डे दाखवून इथे कारंजे, इथे गॅलरी, इथे हे, तिथे ते असे सांगून आपण आमच्या आनंदाला समोरच्या चुन्याशी स्पर्धा करणाऱ्या उकळ्या आणीत होता. त्या आनंदात भिस्त्याने भिजवलेल्या धोतराचे दुःख झाले नाही. मधल्याच एका प्रचंड खड्ड्यात पाय घसरत असता आपण तोल सावरलात आणि तिथे पोहण्याचा तलाव बांधणार असल्याचा निश्चय जाहीर केलात. चित्ररथ गंधर्वाने जलविहार केल्याचे आठवत होते. त्याच चालीवर आम्ही, रावूनाना, नारूकाका अशा मंडळींची कुटुंबे आपल्या कबिल्यासकट जलविहार करणार, ह्या कल्पनेने अंग महिरून निघाले. विशेषतः नारूकाकांचे कुटुंब पाण्यात उतरल्यावर त्या तलावाचे पाणी ओसंडून तर जाणार नाही ना ह्या भीतीने मन जरा थरकलेही! तहानेलेल्या कावळ्याने रांजणात दगड टाकून पाणी वर उपसल्याचे बालपणी वाचले होते. त्याच आठवणीने नारूकाकांचे कुटुंब पोहण्याच्या तलावात उतरते आणि उपसा होतो असे भीषण चित्र क्षणैकच मनापुढे तरळले.

कल्पनेतही उभा करू शकणार नाही असा स्वर्ग निळ्यावर पांढरे केलेला एक कागद आमच्यापुढे पसरून आपण उभा केला. त्या कागदावरच्या पांढऱ्या रेघोट्यांनी आमच्या डोक्यात कोणताच प्रकाश पडत नव्हता.

मधूनच चित्रे काढलेली—चौकोन, षट्कोन, अष्टकोन, इतस्ततः पेरलेली इंग्रजी आद्याक्षरे—अमूक बाय तमूक, तमूक बाय अमूक! इतक्या फुटांचा गाळा आणि तितक्या फुटांचा दर्जा, रीइन्फोर्स्ड सीमेंट, स्टीलचे गर्डर्स, टेरेस गार्डन—अशा अपरिचित शब्दांची डोक्यात भाऊगर्दी झाली होती.

रकमेच्या मानाने अशा सुंदर सुखसोयींनी सज्ज जागा त्रिखंडात धुंडून मिळणार नाही असे जो तो आम्हांला बजावीत होता. आपल्याही अंदाजाचा आम्हांला अंदाज येत नव्हता. पाच सहस्रांत हे सारे आपल्याला कसे झेपणार याची आम्हांला चिंता वाटत होती. उपनगरात झाली म्हणून काय झाले, चाळीला इतर खर्च मुख्य शहरात लागतो तेवढाच येणार अशी आमची कल्पना! खुद्द शहरात तर फूटपाथ मोकळा नव्हता. त्यामुळे ऑफिसपासून दूर पडलो तरी सुखात नांदू ही एकमेव आशा होती. परंतु सुख असे उकळत्या दुधासारखे सांडणार आहे ही कल्पना नव्हती. जागा रेल्वेस्टेशनपासून अडीच मैल दूर होती एवढीच गैरसोय. स्टेशन उचलून चाळीच्या दारात आणणे हे आपल्या शक्तीबाहेरचे होते, एवढे का आम्हांला कळत नव्हते? पण भीत भीत "बसची काही सोय होईल का?" हा प्रश्न रविवारला जोडून कॅज्युअल लीव्ह मागताना होतो तसा चेहरा करून आम्ही आपल्याला विचारला होता.

"बस??"—आपण उसळून उद्गारलात, "दारात आणून उभी करतो बस! म्हणाल तर दुमजलीदेखील! इथे बसस्टॉप येईल, पोलीस चौकी येईल, इतकंच काय पण क्रॉफर्ड मार्केटच्या तोंडात मारील असं मार्केट उठणार आहे सहा महिन्यांत!" आपला आत्मविश्वास दुर्दम्य होता. आपल्या त्या वेळच्या अवसानाकडे पाहून भारतवर्षात विक्रम-शालिवाहन-आंध्रभृत्यादी नरवीरांची परंपरा अजून टिकून आहे याची खात्री पटली—मनात आणले असते तर आपण त्या वेळी चाळीच्या दाराशी अरबी समुद्र आणि परसात हिंदी महासागर आणला असता, गंगेच्या पाण्याने आम्ही स्नान केले असते—आणि संध्याकाळी नर्मदेत पाय बुडवून बसलो असतो. आपला आवेश सेतुबंधाला निघालेल्या रामाचा होता. मुकादमावर खेकसताना आपण नेपोलियनसारखे भासला. गवंड्यांवर गरजताना साक्षात राणा प्रताप तर गरजत नाही ना, असा भास झाला. सुतारांवर संतापताना प्रत्यक्ष

चिमाजीअप्पांचा आवेश आपल्या अंगांगात सळसळत होता. त्या भीतीने थाप्या, पटाइया आणि करवती चळचळ कापू लागल्या.

नाना तऱ्हेच्या शास्त्रांतली आपली गती पाहून इंद्रचंद्रांनी आपला हेवा करावा. सिमिटात रेती किती मिसळावी येथपासून ते वर्ल्ड बँकमध्ये कोणाकोणाची खाती उघडली आहेत येथपर्यंत आपण लीलेने बोलू शकत होता. आजूबाजूच्या इमारती बांधणाऱ्या इंजिनिअर्सना अकला कशा नाहीत हे आपण सहज पटवून देत होता! मुन्सिपालटीकडून पाण्याचे नळ लवकर आणायच्या वाटा कोणत्या, विजेचा प्रवाह कुठल्या दिशेने आपल्या इमारतीकडे वाहू शकेल, पावसाळा किती दिवस टिकेल, अंबरचरखा, रिलेटिव्हिटी, चित्रपटांतली गाणी, भरतनाट्यातला तिल्लाणा, भारतीय संगीतातील श्रुतिविचार आणि ग्रामपद्धती आणि त्यागराजाच्या कृती अशा असंख्य विषयांवर आपण माळ्याने खुरपे चालवावे अशा चापल्याने जीभ चालवीत होता. आपल्याशी बोलण्यात उभ्या वसंतव्याख्यानमालेचे पुण्य एका तासात गाठीला लागत होते. एखाद्या पडत्या राजवटीला हात देऊन उभे करू शकणारी बुद्धिमत्ता चाळ उभी करण्यात गुंतावी याचा आम्हांला खेद होत होता.

जीभ हे आपले एकमेव शस्त्र आणि एकमेव भांडवल! ती वाकत होती, फाकत होती, वळवळत होती, कळवळत होती. आमच्या शंकांचे दगड, फुले होऊन आमच्या हातात येत होते. आम्ही विचारावे, "मालक, भिंती कधी चढणार?"—आपण म्हणत होता, "नुसते हिंडून या आणि चारी भिंतींच्या पाहाऱ्यात उभे राहा!" आम्ही म्हणावे, "मालक दिवाळीला घर होणार का?" आपण सांगावे, "नारळीपौर्णिमेच्या खोबऱ्याच्या करंज्या ह्या घरात बसून खाल्ल्या नाहीत तर आडनाव बदलीन!" आम्ही विचारावे, "मालक अजून पाया भरत का नाही?" आपण तत्परतेने उत्तर द्यावे, "माझे चार मजल्यांचे प्लॅनिंग बदलून पाचव्या मजल्याचे प्लॅनिंग आहे. त्या कळसाचा विचार करून मी पाया घालतो आहे." जोडीला "आधी कळस मग पाया रे" हे संतवचन फेकून आम्हांला गार करावे. संतांची तर आपणांवर उदंड कृपा! त्यांची वाणी घेऊन आपण जन्माला आला. 'दक्षिणेतून पितृदिशेचा वारा आणणारी खिडकी, उत्तरेतून हिमगिरीच्या

झुळका, पूर्वेकडून उषेच्या महालातल्या लहरी आणि पश्चिमेचे वारे आल्सच्या कोल्डस्टोरेजमधून मागवले आहे' हे आपले शब्द.

जसजसे दिवस जात चालले, तसतसा आमचा धीर खचू लागला. पण आपण मात्र काँक्रीटच्या स्लॅबसारखे अभंग होता! कधी विटांच्या टंचाईमुळे भिंतींची उंची स्थिरावली होती, तर कधी टाटाच्या पोलादाने आमची कंबर वाकवली होती. पण आपण मेरूसारखे स्थिर होता आणि जुन्या मालकांनी नोटिशी दिलेले आम्ही मात्र मोरूसारखे अजागळ दिसू लागलो होतो.

नव्यानव्या सबबी कानांवर येत होत्या. विटा-शिमिट आणि पोलाद यांचा लपंडाव सुरू झाला होता. "यां चिन्तयामि सततं मयि सा विरक्ता!—हे भर्तृहरीचे वचन आपण ऐकले आहे का?" असा प्रश्न आपण आम्हांला केला. आम्ही म्हटले, "घर बांधून पुरे होण्याशी याचा काय संबंध?" आपण न डगमगता म्हणाला, "मी सिमेंटचे चिंतन करतो, तेव्हा लोखंड प्रसन्न होते आणि लोखंडाची परमिट हाती आली की विटा अदृश्य होतात –त्यामुळे आय ॲम ॲट माय विट्स एंड!" आपण इंग्रजीतूनदेखील चतुर विनोद करू शकत होता! परंतु नव्या घरात उत्साहाने शिरू पाहणारे आम्ही मात्र शेवटी कमरेवर हात घेऊन त्या अपुऱ्या इमारतीकडे तुमच्या विटेवर विठ्ठलासारखे पाहत उभे होतो.

वृद्धत्व मुदतीबरोबर आमच्या चिंताही वाढल्या. पण भिंतींची उंची वाढत नव्हती. जुन्या मालकापुढे लोटांगणे घालून फूटपाथवर पडणारी भांडी पडू दिली नाहीत. आणि भिंती चढल्याची बातमी एका सहभाडेकरूने आणली. "पहिल्या मजल्याच्या भिंती चढायचाच अवकाश!—बाकीच्या भिंती चढवायच्या म्हणजे नुसता हातचा मळ आहे. गवंड्यांच्या." आम्ही चार भिंतींकडे पाहात निश्चल उभे होतो. "आतां खालच्या मजल्याला मी लगेच दारं लावून घेणार आहे. उद्या स्लॅब पडला की दुसऱ्या मजल्याच्या भिंती की पुन्हा स्लॅब की तिसरा मजला की पुन्हा स्लॅब की चौथा मजला—" नुसत्या शब्दांनी आम्हांला चारी मजल्यांवर आपण चढवलेत.

"डरो मत!" आपण आश्वासनाला हिंदीचा आधार घेतलात. "दसऱ्याला जुन्या जागेतून सीमोल्लंघन करा!" आपण नारळीपौर्णिमेवरून दसऱ्यापर्यंत मुदत कशी वाढवली हे आम्ही समस्त भाडेकरू सीमोल्लंघनाच्या स्वारीवर

निघाल्याचे चित्र पाहता पाहता आमच्या ध्यानातही आले नाही. "पण तोपर्यंत आमची बायकापोरे काय शमीच्या ढोलीत ठेवायची?" एक सहभाडेकरू चिडला. पण आपली मनःशांती ढळली नाही. एका विडीने आपण त्याचे तोंड बंद केलेत. "अहो, नारळी पौर्णिमेला आपण आलात म्हणून माझी हरकत नाही. पण संसारसागरात तुमची नाव पहिल्यांदाच हाकारीत असतात तर मी हाही मुहूर्त मान्य केला असता! पण संसारयात्रेतले तुम्ही मुरब्बी खलाशी! वादळात बोटी घालणारे! त्याशिवाय का एवढे गलबत इतकी वर्षे चालवलेत? तुमच्या पराक्रमाला दसराच हवा! विजयादशमी! राम रावणाला जिंकून आले! तुम्ही जुन्या जागेला लाथ मारून वीरासारखे या! मी दारात सोन्याची पाने ठेवीन. त्यांची लूट करा आणि सुवर्णवैभवात माझ्या....छे, छे....माझ्या कसल्या, तुमच्याच जागेत राहा. 'दसरा सण मोठा' म्हटलंच आहे. वास्तविक मला काय? मला आता ह्या क्षणाला दसरादिवाळी वाटते आहे!" आम्हांला कळेना. चार अर्धवट भिंती, सतरा ठिकाणी खड्डे खणलेले, डोक्यावर केव्हा घमेले कोसळेल याची खात्री नाही अशा वातावरणात, मालक, तुम्हांला ती दसरादिवाळी का वाटली ते कळले नाही. आम्ही भाबडेपणाने आपल्याला शंका विचारली आणि आपण म्हणाला, "तुमचे पाय लागले—तुमच्यासारख्या साधुसंतांचे पाय लागले ह्या वास्तूला, हीच माझी दसरा-दिवाळी." मालक, आपण चाळ का हो बांधलीत? मालक, आपण विश्वधर्मपरिषदेची, जागतिक शांतता परिषदेची, किमान पक्षी एखाद्या शांति-फौजेची स्थापना का केली नाही—गेला बाजार होमगार्ड तरी?

कसे तरी रडतराउताला घोड्यावर चढवावे तसा आणखी एक मजला चढला आणि 'दसरा सण मोठा' येऊन गेला. आम्ही पुन्हा आपल्याला दसऱ्याच्याच दिवशी भेटलो. आपण आम्हांला कडकडून मिठी मारली आणि आमच्या हातांत आपट्याची पाने दिली. नारूकाका चिडले आपल्यावर आणि म्हणाले, "आता तुळशीची पाने घाला आमच्या तोंडावर!" पण मालक, बुद्ध शरमला असता आपली मनःशांती पाहून! आपण म्हणाला, "सच्चा मराठा दसऱ्याच्या मुहूर्तावर स्वतःचे घर सोडून मुलुखगिरीवर जायचा! मग ह्या मुहूर्तावर घरकोंबडे का होणार आहात तुम्ही? जुन्या घरात दिवाळी उरका आणि होळीच्या दिवशी पोळी खायला नवीन घरात या!—थंडीच्या

दिवसांत नाही तरी नवीन इमारतीत राहायला जाऊ नये. भिंतींना ओल असते. त्यातून ह्या भागात थंडी जरा अधिक! उगीच मला माझे भाडेकरू आजारी पडायला नको आहेत. तसा मी इथं एक छोटासा दवाखाना ठेवणार आहे. या—" असे म्हणून आपण आम्हांला त्या दगडाविटांच्या ढिगातून कुठेतरी घेऊन गेलात आणि एका भागाकडे बोट दाखवून इथे दवाखाना येईल, असे सांगितलेत. सर्व भाडेकरूंची मोफत वैद्यकीय तपासणी ही आपली नवी योजना होती. त्या विभागातल्या सात डॉक्टरांनी दर दिवशी एक याप्रमाणे सात दिवस फुकट दवाखाना चालवण्याचे आश्वासन दिले आहे हेही आपण आम्हांला सांगितले होते. त्यामुळे तोंड फुटेपर्यंत भांडायला गेलेले आम्ही भाडेकरू तोंड फाटेपर्यंत आपली तारीफ करीत परतलो.

रक्कम तर आपल्या हातात अडकलेली आणि इमारत तर पुढे दिसतच नाही अशा अवस्थेत कुणी कुणाच्या ओसरीवर, कुणी बायकापोरे कोकणात पाठवून खाणावळीत तुकडे मोडीत, कुणी कोडगेपणाने मित्र अगर नातेवाईक यांच्यावर भार देऊन असे राहिले होते. आणि अकल्पित लॉटरी फुटावी तशी चाळ उठल्याची बातमी कानांवर आली. लांडगा आला रे आला अशी हाकाटी व्हावी आणि प्रत्यक्ष लांडगा आल्याक्षणी बेसावध असावे अशी अवस्था होती. परंतु पाच सहस्र सुरवातीला आणि खिडक्यांच्या काचांचे, गजांचे, नळाचे, शॉवरचे, बेसिनचे अशी नित्य नूतन कारणे सांगून घेतलेले आणखी सहस्रभर रुपये चैन पडू देत नव्हते. हातांतली कामे टाकून समस्त भाडेकरू मंडळी उपनगरातल्या आपल्या नव्या घराकडे धावली. आणि अहो आश्चर्यम् !

चित्रकारापुढे तीन दिवस पाठ मोडेपर्यंत बसावे आणि आपला म्हणून जो त्याने पोर्ट्रेट काढला असेल त्यात एक डोळा नसावा, कानांची लांबी विषम असावी, ओठांना हबशी कळा यावी, नाकाची दुसरी नाकपुडीच दिसू नये, हनुवटी गळ्यातून निघावी आणि मान उंटाच्या ऐटीने पाहात असावी— असे चित्र निघालेले दिसल्यावर जसा चेहरा होईल तसा आमच्या सर्वांच्या चेहऱ्यांचा एक सामुदायिक चेहरा झाला.

राग, संताप, क्रोध, तिरस्कार, द्वेष, चीड, रडकुंडीला येणे, हादरा बसणे, ओठ थरथरू लागणे इत्यादी क्रिया एकदम झाल्या तर जे होईल ते होऊन आम्ही थक्क होऊन त्या विटा-मातीच्या अवाढव्य सांगाड्याकडे पाहात होतो.

भिंती होत्या, पण गिलावा नव्हता—रंग दूरच! खिडक्या होत्या, पण गज नव्हते. दाराला एक माणूस डोक्यावर बोजा घेऊन आरपार जाईल इतक्या फटी होत्या. स्वयंपाकघरात नळ होते, पण तोट्या नव्हत्या—त्यामुळे एक लोखंडी थोटा हात भिंतीतून बाहेर आल्याचा भास होत होता. जिने होते, परंतु कठडे नव्हते. चारी दिशांचा उजेड आमच्या डोक्यांखेरीज अन्यत्र कुठेही पडला नव्हता. विजेचे सोडा, पण हाताने वारा घ्यायचे पंखेदेखील नव्हते. थोडक्यात ट्रायलला म्हणून शिंपी नुसतेच टाके घालून कापड दुमडून कोट शिवतो तशी चाळ उभी होती! आम्ही विचारले, "चाळ पुरी केव्हा होणार?"

आपण थंडपणे उत्तरलात, "मग समोर दिसतंय ते काय?"

"म्हणजे? ही चाळ पुरी झाली? आणि फरशी?"

"त्याला काय वेळ लागतोय?"

"आणि गज?"

"अहो, गज काय उद्या!"

"नळ?"

"पाणी आले की नळ आलेच!"

"पाणी केव्हा येणार?"

"उद्या!"

"वीज?"

"आत्ता!"

"आणि जिन्याला कठडे?"

"दुपारपर्यंत!"

"वॉश बेसिन्स?"

"तुम्ही आणली रे आणली की ठोकलीच!"

"म्हणजे आम्ही आणायची? आपण लावून देतो म्हणालात!"

"अजून म्हणतो—आणून द्या, लावून देतो!"

"छपरावर कौले?"

"आकाशाची शोभा पाहा!"

"आणि पावसात?"

"ढगांची!"

"शौचकूप?"

"फर्लांगावर समुद्र आहे! कॉल ऑफ नेचर नॅचरल सराउंडिंगमध्येच व्हावा—हॅ, हॅ, हॅ!"

"आणि पंखे?"

"थंडीत पंखे? हसतील लोक!"

"भिंतींना रंग?"

"पहिला पाऊस पडून जाऊ दे!"

"दवाखाना?"

"वैद्यो नारायणो हरिः!"

"दारांना कड्या? चोरीबिरी झाली तर?"

"तुम्हांलादेखील आत शिरणं मुश्किल करतील असे सहा कुत्रे ठेवणार आहे! अल्सेशियन! चोरांची काय ताकद आहे?"

"गॅसच्या चुली?"

"डेंजरस!"

"स्वयंपाकघरातल्या फळ्या?"

"लाकूड औट ऑफ स्टॉक आहे!"

"कपडे वाळत घालायच्या तारा?"

"गॅलरीत अधिक लवकर वाळतील. अर्जंट वॉशिंग. सकाळी धुवा, दुपारी वाळवून घ्या."

"खोल्यांत काळोख आहे!"

"आपल्या देशात असंच पाहिजे. जुने वाडे पाहा. डोळे बिघडणार नाहीत—".

"जिन्याला कठडा नाही—पोरं पडली तर?"

"पोरांवर लक्ष पाहिजे आईबापांचं."

"स्विमिंग पूल कुठं आहे?"

"समुद्र आहे हाकेवर! शिवाय किनाऱ्यावर फुकट ओझोन!"

"शी, शी, ह्या चाळीत राह्यचं कसं?"

"मुलामाणसांसह आनंदात."

"पण सोयी नाहीत ना!"

"गरजा वाढवू नका. न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति।"

युगांयुगांची आमची पुण्याई म्हणून आपल्यासारखे घरमालक आम्हांला लाभले. बिरबलाचे चातुर्य आणि हजरजबाबीपणा आजवर ऐकिवात होता तो प्रत्यक्षात आढळला. नळ आहेत, पाणी नाही—खिडकी आहे, वारा नाही—दिवे आहेत, उजेड नाही. फक्त दोन्हीचे अस्तिपक्षी उत्तर सापडत होते ते 'मालक आहेत आणि भाडेकरूही आहेत' यात! भाडे बुडवण्याचा प्रश्नच नव्हता. गरजवंतांना अक्कल नसते: तशा अवस्थेत आम्ही चाळीत कुटुंबकबिले आणि बिऱ्हाडबाजलें आणले. पहिल्या दिवशी जिन्यावरून पाय घसरून पहिल्या ते चौथ्या मजल्यापर्यंतचे सर्व कचेरीपदस्थ. खाली आले. हात, पाय, गुडघे, डोके, वगैरे अवयव दणकून निघाले. आपण शांतपणे म्हणाला, "आयुष्यात प्रत्येक पाऊल जपून टाका." पाण्यासाठी तर पहाटे चार वाजता उठावे लागे. आपण नळावरच बोर्ड टांगला होता, "लवकर निजे, लवकर उठे, तया ज्ञान, आरोग्य, संपत्ती भेटे!" याउपर बोलायला तोंडच उघडणे अशक्य होते.

होतील तितक्या सोयी करण्याचा मी आटोकाट प्रयत्न करीत आहे, हे आपले सूत्र आम्ही रोज ऐकतो. नळाला पाणी दुसरी पंचवार्षिक योजना पूर्ण झाल्यावर येणार आहे. आणि त्या वेळीच बागा उठणार आहेत, कारंजी उडणार आहेत, हेही आपण सांगितलेच आहे. शंका एवढीच की पुढले पाच महिने तरी इहलोकी आमचा वास होईल का! पण ही शंका येण्याचे कारण नाही. कारण मालक, आपण आम्हांला जगण्याचे शास्त्र शिकवलेत. कोणत्याही प्रसंगी आपली मनःशांती ढळत नाही. व्यंकटप्पा बिंगेगलचे भाडे तुंबल्यावर त्यांच्या खोल्यातले ढेकूण मारण्यासाठी फर्निचर बाहेर काढतो असे सांगून आपण ते बाहेरच्या बाहेर गिऱ्हाइकाला विकून भाडे वसूल केलेत. ढेकूणही गेले आणि फर्निचरही गेले. बिंगेगलप्पा चिडून ओरड ओरड ओरडला. परंतु आपण त्याला मिठाच्या पाण्याने गुळण्या करून घसा अधिक साफ होईल, हा वैद्यकीय सल्ला देऊन निघून गेला. नारूकाकांचे कुटुंब तर उकळते पाणी डोक्यावर ओतायची धमकी देऊन जात होते. आपण म्हणालात, "जरा कोमट पाणी ओता—मी साबण घेऊन येतो—

आपला रागही शमेल, माझी आंघोळही होईल!" अहाहा! काय ही मनःशांती!! साक्रेटिसाने आपले पाय धरावे, तुकारामाने आपल्या पुढे टाळ वाजवावी आणि इतर शांतिवादी येरूंनी पायघड्या घालाव्या.

वोखटे ते गोमटे दाखवण्याचे कसब आपल्यापासून आम्ही शिकलो. भर पावसात भिजावे कसे, डोक्यावरून पाणी गळत असताना झोपावे कसे, ह्या विद्या आपण आम्हांला दिल्या. आपले सहा कुत्रे ऑस्ट्रेलियाहून यायचे ते न आल्यामुळे चोरांनी अंगावरचे कपडे आणि चुलीवरची भांडी तेवढी चोरायची ठेवली आहेत. अनासक्ती आणि अपरिग्रहाची केवढी थोर शिकवण मिळाली? सुरवातीला घरातल्या घरात चरफडलो, मग शेजारी शेजारी कावून भांडलो आणि अखेर आपल्याशी वैयक्तिक आणि सामुदायिक सामना दिला! कायद्याचे आपल्याला भयच नाही. आम्ही कोर्टात जातो म्हटल्यावर आपणच आम्हांला चांगल्या वकिलाचे नाव सुचवून गोंधळात पाडलेत. त्यामुळे ती पायरी चढलो नाही. त्या पायऱ्या चाळीच्या पायऱ्यांहून विकट असतात असेही आपण आपुलकीने बजावलेत! आज प्रत्येक बिऱ्हाडकरूच्या खोल्यांना वेटिंगरूमची कळा आहे. दरवाजे बंद करायची सोय नाही. कारण कड्यांवर आपली श्रद्धा नाही. घेईन तर पितळी कड्या नाहीतर कड्या लावणार नाही, ही आपली खाईन तर तुपाशी थाटाची प्रतिज्ञा आहे. त्यामुळे सुरवातीला पाहारे झाले. पाळीपाळीने जागणे झाले. आता देवावर भार टाकून घोरत पडतो. चोरही एकाच ठिकाणची चोरी करून करून कंटाळले. देशाला एकदम जथावंद विरक्त मंडळी पुरविण्याचे श्रेय आपण घेतलेत. डोक्यावर केव्हातरी वरून वीटच पडते. जिन्याच्या पायऱ्या केव्हाच डगमगू लागल्या आहेत. कठड्यावरून जवळजवळ प्रत्येकाची पोरे पडली—आता त्याचे काही वाटत नाही. भांडणतंट्यांची चारुती संपली. चोराचिलटाला तर कस्पटासमान लेखतो. कारण कस्पटाच्या किंमतीचेदेखील जवळ काही राहिले नाही.

तस्मात्, श्रीमान मालक, भगवद्गीतेत वर्णिलेल्या ह्या सर्व दैवी गुणांची जोड आपल्या चाळीत राहायला आल्यामुळे झाली. कृतज्ञतेने आम्ही मोरीइतके तुंबलो आहो. उपकारांचे ओझे वाहून शरीर छतासारखे वाकून गेले आहे. होतीनव्हती ती पुंजी आगाऊ भाड्यापोटी दिली. आपण

आमच्या जीवनात घडवून आणलेल्या ह्या असामान्य धर्मचक्रपरिवर्तनाबद्दल समस्त भाडेकरू मंडळीतर्फे आम्ही आपल्याला हे मानपत्र अर्पण करीत आहो. हेच पत्री आमच्या पोरांना खोका पाडून रक्ताची भीती घालवणाऱ्या आपल्या चिरंजिवांना, आमच्या सुनालेकींचा मालकिणीच्या तोऱ्यात अपमान करून त्यांच्यातील अहंकार नाहीसा करून त्यांना संतपदाची जोड करून देणाऱ्या आपल्या सहधर्मचारिणीला, आणि कधी चहाचा चोथा, कधी कोलंबीची साले, कधी कालचे मुरलेले वरण यांचे आम्हा भाडेकरूंना अवभृथस्नान घालणाऱ्या आपल्या स्वयंपाकीणबाईंना, कचऱ्याची पुष्पवृष्टी करणाऱ्या आपल्या रामाला आणि सदैव पान खाऊन आमच्या अंगावर थुंकून परटाच्या धंद्याला तोंडी असून सक्रिय अशी अजब सहानुभूती दाखवून बरकत आणणाऱ्या आपल्या कारकुनाला, आणि आमच्या दुधावर वाढणाऱ्या तुमच्या घरातल्या बोक्याला, आणि आमच्या पोटऱ्या, धोतरे, आमच्या पोरांच्या मांड्या यांचे लीलेने चावे घेऊन जन्ममरणाचे भय घालवणाऱ्या आपल्या टॉमीला याच मानपत्रातून आम्ही साष्टांग नमस्कार प्रविष्ट करीत आहोत. मानपत्रात शेवटी एखादी मागणी असते. आपल्या कृपेने अशीच महालक्ष्मीच्या देवळातल्या साधूंसारखी उघडी-नागडी जगायची सवय लागली तर एखादे दिवशी गोपीचंदासारखे आम्ही, नारूकाका आणि इतर, धोतरापैरणीला गेरू लावून ज्या वेळी 'मालिक तेरा भला करे' म्हणून हिंडू लागू, त्या वेळी आमच्या डोळ्यांपुढे तो वर आकाशात राहणारा मालीक न येता आपणच उभे राहाल. आपल्या कृपेने आमचे जे झाले तेच इतरांचेही होवो हीच आमची इच्छा असणार! अशा वेळी विनंती हीच की, भिक्षेला पहिले घर म्हणून आपल्या दारी उभे राहू! त्या वेळी आशीर्वादाची भिक्षा तरी घालाल ना? आपणाकडून आशीर्वाद यापलिकडे काहीही अपेक्षा नाही. आपल्या चाळीने आम्हांला जगातून उठवले तरी आपण चाळ उठवली, हेच जगाला दिसणार. तेच दिसो ही प्रार्थना.

आपले नम्र,
आपले समस्त भाडेकरू

◊ ◊

६

## बंधू आणि भगिनींनो—

" इतके बोलून मी आपली रजा घेतो." टाळ्यांचा प्रचंड कडकडाट होतो आणि व्याख्यान संपते. आपला अमूल्य वेळ खर्च करून आल्याबद्दल कोणीतरी आभार मानायची गोड कामगिरी करतो. कधी कधी हा आभार मानणारा ती कामगिरी फारच गोड करून ऐकणाऱ्यांच्या अगदी गळ्याशी गोडगोड गोडगोड 'येत' राहील इतके बोलतो.

हार घेऊन उभा राहिलेला स्वयंसेवक ताटकळत असतो. त्याच्या हाताला रंग लागलेली असते. शेवटी आभाराची गोड कामगिरी संपते आणि हार घालायचे विसरून राहते. 'बंधू आणि भगिनीं'च्या लक्षात ही गोष्ट येते आणि सभेत बारीकशी खसखस पिकते. गोड कामगिरीवाले स्वतःच्या वक्तव्यावर प्रसन्न असतात. त्यांना कोणीतरी ढोसून 'हार हार' म्हणतात. तेही भानावर येतात आणि मग एकदाचा 'फूल ना फुलाची पाकळी' हा पिढीजाद चालत आलेला मंत्र म्हणून ती फुले गळ्यावर चढतात. एका अर्थी फुलाची पाकळी हेच खरे असते. सकाळी आणून ठेवलेला हार पाकळी-पाकळी होऊनच अंगभर रुळतो. अध्यक्ष "आजच्या सभेचे काम संपले" असे जाहीर करतात आणि बंधू आणि भगिनी उठता उठता, का

कोण जाणे पण अध्यक्षांच्या याही वाक्याला हसतात. बंधू आणि भगिनी व्यासपीठापाशी गर्दी करतात. त्यांच्या हातांत स्वाक्षऱ्यांसाठी सुंदर कातडी बांधणीच्या पुस्तकांपासून ते सुप्रसिद्ध साहित्यिक '....' यांच्या व्याख्यानाच्या हँडबिलाच्या पाठकोऱ्या बाजूपर्यंत काय वाटेल ते असते. मग स्वाक्षऱ्या आणि संदेश यांची मागणी सुरू होते. त्यातल्या निळी चड्डी आणि पोटात खोचलेला सदरा घालणाऱ्या बंधूंच्या पेनात शाई नसते. असली तर सुरवातीला चांगला जाड ठिपका पडेल अशी सोय असते. आणि भगिनी "जरा झटकायला हवं" असा पेनइतकाच नाजूक आवाज काढून "संदेशही द्या हं—" असा 'हं' च्या जोडीला मानेला हळुवार झटका देऊन लडिवाळ हुकूम करतात. मग संदेशावर विनोद करावा लागतो—आणि ते बंधू व भगिनी पुन्हा हसतात. भगिनींच्या वहीवर 'जिचे हाती पाळण्याची दोरी'पासून ते 'जीवनाच्या सुपाला व्यवहाराचे शेण' लावण्यापर्यंत सारे संदेश येऊन गेलेले असतात. अशा वेळी नवा संदेश सुचत नाही. बोले तैसा चाले वगैरे संदेशांना नाकाच्या हालचालीवरून भगिनी काय किंमत देतात हा पूर्वानुभव असतो. मग 'विशाल व्हा' अशासारखा नवा संदेश बनवावा लागतो.

"अय्या ! मग आम्हांलाही संदेश हवा...." अशी मागणी वाढते.

"तुम्हांला हा बाकी नेहमीचाच त्रास असेल—" अशी सहानुभूती गळ्यात हार घालणारे 'गोड कामगिरीवाले' दर्शवतात.

एव्हांना बरेचसे बंधू आणि भगिनी गेलेल्या असतात. काही मागे रेंगाळतात. त्यातले काही कार्यकारी मंडळाचे सभासद असतात. व्याख्यात्यां-बरोबरच्या कॉफीचा त्यांचा 'मान' असतो. शिवाय इतरही सातआठ बंधुभगिनी असतात. त्यांत बहुधा गावातले हेडमास्तर असतात. 'ही बरीचशी मंडळी आमचे विद्यार्थी आहेत' असे हे बंधू न चुकता सांगतात. दुसरे दोनचार वकील बंधू असतात. एखादा डॉक्टर बंधूही असतो. कुणी गावातले कविबंधू असतात. वनितामंडळाच्या सेक्रेटरी भगिनीही त्यांत असतात आणि मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या पत्नी असलेल्या, मासिकातून लघुकथा वगैरे लिहिणाऱ्या भगिनीही असतात.

"चांगलं झालं व्याख्यान—" वकील बंधू मधल्या कॉफी येईपर्यंतच्या

चमत्कारिक शांततेचा भंग करीत म्हणतात. ह्या उद्गारांनी धन्यता वाटते न वाटते तोपर्यंत हेडमास्तर बंधू पुढे सरसावतात.

"तो गेल्या महिन्यात आला होता तो कोण लेखक हो?"

"प्रोफेसर डाळिंबे."

"डाळिंबे का तो? तो नव्या साहित्यिकांची चांगली काढली होती त्याने तो?"

"वा! फर्मासच झालं होतं त्याचं व्याख्यान!" डाळिंब्यांची तारीफ सुरू होते. म्हणजे नव्या साहित्यिकांची 'काढलेले'ही व्याख्यान आवडले होते का ह्या बंधू आणि भगिनींना?—एक निराश विचार चटकन टोचून जातो. कारण आजच्या व्याख्यानाचा कंठशोष नव्या साहित्यिकांचा दृष्टिकोण, त्यांचे अंतर्मनांतले अवगाहन, प्युअर इस्थेटिक जॉयची परसूट, नवे निकष, नव्या सौंदर्यात्मक पातळ्या हे समजण्यासाठी केलेला असतो. जुन्या साहित्यिकांची ह्या व्याख्यानात 'काढलेली' असते—आणि त्यालाही आता घरोघरी जाऊन बसलेली (बहुधा पाटावर) बंधू आणि भगिनी मंडळी खूप हसलेली—खूष होऊन गेलेली असतात.

डाळिंब्यांचे व्याख्यान ह्या गावी झाले आहे हे आधी कळले असते तर? —छेः! कोपऱ्यात पोरांची काहीतरी दंगामस्ती चालल्यासारखी दिसते, दोनतीन पोरे मघाचा फूल ना फुलाची पाकळीवाला हार घेऊन रस्सीखेच खेळत असतात. आता तो हार संपूर्ण पाकळीत्वाला जाऊन पोहोचलेला असतो. "तरी साडेनऊ वाजले नाही? बराच वेळ लांबले व्याख्यान!" कॉफी आणणाऱ्या पोऱ्याच्या वाटेकडे डोळे लावलेले कार्यकारी मंडळाचे सभासद ह्या आपल्या वाक्याने कोणा बिचाऱ्याच्या अंतःकरणाला घरे पडतील याचा विचारदेखील मनात न येऊ देता बोलतात.

"का रामभाऊ? आज ब्रिज बुडवलात वाटतं—" मघाचे घरपाडू वाक्य बोलणाऱ्या 'बंधू'चे नाव रामभाऊ तर?

"हो! आज आबाराव गेले आहेत मळ्यावर! गुऱ्हाळ सुरू झालंय—" त्यानंतर सामान्यतः अर्धा तास गूळ ह्या विषयावर चर्चा होते. ज्या दिवाणखान्यात घटकेपूर्वी रिचर्ड्स, सौंदर्यात्मक प्रक्रिया, अतिवास्तवता वगैरे शब्द घुसलेले असतात तिथे आता काहिली, ढेपा, चुन्याची निवळी वगैरे मंडळी

घुसतात. जिथे भावनात्मक समतानता आणि आंतरिक संघर्ष यांची तुलना झालेली असते तिथे जयसिंगपूरची पेठ आणि सांगली पेठ यांची तुलना सुरू होते. शेवटची गोड कामगिरी करणारे तर गूळ ह्या विषयावर अधिकार-वाणीने बोलतात, कारण ते शेतकीखात्यात आहेत. शेतकीत असूनदेखील वाङ्मयात त्यांना बराच रस आहे अशी तारीफ होते. "कवीवरून काकवीवर आलात की मंडळी?" असे एक बंधू म्हणतात—आणि बंधू आणि भगिनी जीव जाईपर्यंत हसतात. आपल्यालाही हसावे लागते. मघाशी व्याख्यानात बरेचसे विनोद तमाम बंधू आणि भगिनींच्या डोक्यावरून का गेले ह्याचे कोडे आता उलगडते. काकवीकरांची पाहुण्यांशी ओळख करून देण्यात येते. बहुधा हे पोस्टमास्तर असतात आणि अत्यंत विनोदी म्हणून त्यांची गावात ख्याती असते. गुंडूराव, खंडोपंत, पिलूनाना अशा स्वरूपाचे त्यांचे नाव असते आणि आडनाव मात्र कुळकर्णी याखेरीज दुसरे काहीही नसते.

"खंडोपंत, तुमची परवाची कुठली हो ती कोटी?" अशी पृच्छा होते. आणि मग गुंडूराव, खंडोपंत अथवा पिलूनाना खाकी सदऱ्याच्या खिशातून तपकिरीची डबी काढून चिमूटभर तपकीर नाकात कोंबून परवाची कोटी आठवू लागतात. कोणातरी दुसऱ्याला ती आठवते. तो बंधू ती सांगू लागतो आणि भगिनी आधीच पदर दातात धरून हसायला लागतात. खंडोपंतांची 'कोटी' सांगायला सुरवात केलेले बंधू कोटी विसरतात. मग इतर बंधू खंडोपंतांनाच आग्रह करतात. काळ्यारोम चेहऱ्यावरील किटसनच्या प्रकाशात तुकतुकणारे पांढऱ्या दाढीचे खुंट जरासे नखांनी कुरतडीत आपली हातखंडा कोटी ते सांगतात. कोटी, कोणत्याही 'भलताच विनोदी बुवा'-जातीच्या इसमाच्या कोटीइतकीच भिकार असते. पण बंधू आणि भगिनी 'घरात ही राणी नाही म्हणून इराणी गाठला चहा प्यायला' ह्या देहान्तशासनाच्या लायकीच्या कोटीला खोखोखो हसतात. फक्त हेडमास्तर हसत नाहीत हे कुणाच्या तरी लक्षात येते. त्यांचे लक्ष नसते. त्यांच्यासाठी कुळकर्णीबंधू पुन्हा कोटी सांगतात. हेडमास्तर ठसका लागेपर्यंत हसतात. इतरही बंधू आणि भगिनी पुन्हा हसतात. आता कुळकर्णीमास्तरांना अवसान येते—ते कुणाचीशी बायको संपूर्ण महिने भरण्यापूर्वी बाळंत झाली ती 'एक्स्प्रेस डिलिव्हरी' कशी येथपासून ते करमरकरसाहेब म्हणजे हूडायडूसाहेब

येथपर्यंत दहा लाख वेळा सांगितलेल्या कोट्या सांगतात. बंधू आणि भगिनी अगदी मनमुराद हसतात. हेडमास्तरांच्या लक्षात प्रत्येक कोटी उशिरा येते—त्यामुळे त्यांच्यासाठी म्हणून ती कोटी पुन्हा सांगावी लागते.

अजून कॉफी आली नाही. त्यामुळे हे सगळे सहन केले पाहिजे. बंधू आणि भगिनी आता कोट्यांच्या गर्दीत घुसली आहेत. दीड तास दिलेल्या विचारपरिप्लुत (अध्यक्षांनी ओळख करून देतानाच हा शब्द वापरला होता —आता विचारपरिप्लुताच्या ऐवजी परिलुप्त म्हणाला होता तो जिव्हाप्रमाद!) व्याख्यानाला आता संपूर्ण मूठमाती मिळाली आहे. गेला दीड महिना ह्या व्याख्यानाची तयारी करावी लागली होती. व्याख्यान संपून दीड तास लोटला नाही, पण ते सारे अभ्यासपूर्ण आणि मननीय विचार (आभाराच्या गोड कामगिरीवाल्याचे बरं हे शब्द!!!) वातावरणात नष्ट होऊन गेले आहेत.

"साहित्यातली सौंदर्यस्थळे"—व्याख्यानाचा विषय विस्मृतीच्या गटारातून केव्हाच वाहून गेला! काय बंधू आहेत आणि भगिनी तरी? विचारचक्र निराशेच्या गियरमध्ये जाऊन पडते.

बंधू आणि भगिनी!!—बंधू आणि भगिनी...."मघाशी तुम्ही जो एक पॉइंट मांडला—" भयंकर उकाड्यात थंडगार झुळूक यावी किंवा उप्पिट-मधले उडीद चावताना काजूगर सापडावा तसे हे शब्द कानांवर पडतात.

"काय म्हणत होता आपण?"

"नाही—मी म्हणत होते—" मॅजिस्ट्रेटसाहेबांच्या सुविद्य पत्नी बोलत असतात. "मघाशी तुम्ही सौंदर्यशास्त्राबद्दल बोलत होता तेव्हा असं म्हणालात की सौंदर्याची अनुभूती घेण्याची पात्रता असावी लागते."

"हो—"

"पण खरं सांगू का—सौंदर्य टिकविण्याबद्दल आस्थाच नाही आपल्याकडे...."

"आपल्या प्रश्नाचा रोख नाही ध्यानात आला...."

"आता हेच पाहा ना—मी इथे एक सौंदर्यस्पर्धा करावी म्हणून ह्या मनोरमाबाईंना म्हणत होते—"

वाङ्मयीन सौंदर्य आणि जनरल सौंदर्य ह्यात गोंधळ झाला आहे. उप्पिटांतला काजू कुजका निघाला....

"साधी शरीरसौष्ठवाचीदेखील काळजी घेत नाहीत बायका....मी 'ललना' मासिकात एक 'भगिनींनो, तुम्हांला सुंदर व्हायचेय का?' म्हणून लेख लिहिला आहे. आपल्याला सवड असेल तर जरा वाचून पाहा...." पर्समधून एक कात्रण काढले जाते. "म्हणजे आम्ही काही साहित्यिक नाही हं—"

"वा वा!!" वकीलसाहेबांना त्यांच्या साहेबांच्या बाईसाहेबांना खूश करण्याची मिळालेली संधी ते बरे सोडतील? "बरं का हो, बाईसाहेबांना साहित्याची चांगलीच आवड आहे! काय मास्तर?"

"वा!" आता हेडमास्तरांची पाळी. "परवा शारदोत्सवाच्या उद्घाटनाचं भाषण फारच अभ्यासयुक्त आणि अगदी विचारपरिप्लुत झालं!" म्हणजे हे देखील 'विचारपरिप्लुत' होते!—आणि सौंदर्यशास्त्रावरचे! आणि प्रोफेसर डाळिंब्यांचेदेखील? ललना मासिकाचे कात्रण वाचावे लागते. त्यात मोसंबीचा रस, लिंबूपाणी, शीर्षासन, केसांची काळजी—हे 'उतारू' असतात. ह्यांचा कलात्मक सौंदर्यशोधाशी काय संबंध?

"कसा वाटला लेख?"

"सावकाश वाचावा लागेल!" पळवाटीचे वाक्य.

"आपण आज जेवायलाच या ना बंगल्यावर....का हो सेक्रेटरीसाहेब?"

"नाही! आमची हरकत नाही—" सेक्रेटरी म्हणजे गोड कामगिरीवाला!

....म्हणजे झालं!! केळ्यांची शिकरण, सकाळची वालाची उरलेली उसळ, मोरांबा आणि 'ललना' मासिकातले उरलेले लेख!!

"थँक्यू....पण रात्रीच्या गाडीला गेलं पाहिजे—परवा भाकरवाडीला व्याख्यान आहे...." बाप रे! म्हणजे आता तिथली बंधू आणि भगिनी....

बंधू आणि भगिनी म्हणजे समोर पाचपंचवीस कारटी—एकमेकांना चिमटे काढणारी, सारखी 'खीक' करून हसणारी, व्याख्यानानंतरच्या मेळ्यासाठी आलेली; त्यांच्या मागून त्यांच्या आया-वहिणी—ह्या भगिनी! सारख्या कुचकूच कुचकूच करून बोलणाऱ्या. इकडे भावनांचा अनिर्बंध ओघ भावना 'इमोट' कशा करतो हे चालू असताना शंकरपाळ्यातले साखरेचे प्रमाण काय हे शेजारणीला विचारणाऱ्या. बालकवींच्या मुग्ध सौंदर्यावर सखोल विचार मांडले जात असताना "ब्लाउझची शिलाई काय?" ह्या

मौलिक प्रश्न टाकून उत्तराची अपेक्षा करीत बसलेल्या. साहित्यातली नवनिर्मिती ऐकायला आपल्या स्वतःच्या पाचसहा महिन्यांच्या नवनिर्मितीला घेऊन आलेल्या. आणि व्याख्यान चालू असताना मामलेदारांची चार वर्षे वयाची ज्योत्स्ना किंवा सर्जनसाहेबांची गेल्या महिन्याच्या 'ललना' मासिकाच्या 'हसरी कळी' विभागात फोटो आलेली साडेचार वर्षांची कलिका अथवा म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष मेहेरबान दाजीसाहेब बोटचेपे यांची नात अगर नातू यांनी तर उच्छाद मांडलेला असतो. आणि बहुतेक बंधू आणि भगिनींचे लक्ष व्याख्यानापेक्षा त्यांच्या बाललीलांकडे असते. आणि हे बाल-बंधू आणि बाल-भगिनी मध्येच स्टेजवर येतात, मध्येच 'ए माछी—काका' वगैरे बाळबोलीत ओरडतात—

"....सौंदर्याच्या मुख्यतः तीन प्रक्रिया...." (एकदम प्रचंड हशा) सौंदर्याच्या तीन प्रक्रियांत हसण्यासारखे काय आहे म्हणून विचार पडतो—परंतु एका क्षणात खुलासा होतो. बंधू आणि भगिनींतील सर्वांत लहान बंधू अगर भगिनी—कोण आहे हे कळायला वाव नसतो, कारण तो अगर ती रांगत रांगत अध्यक्षांच्या खुर्चीपर्यंत टेबलाखालून गेलेले असते! मघाच्या दीड तासातला एकेक प्रसंग पुढे येतो....

आणि बंधू? त्यांत रुमालवाले, टोपीवाले, बिनटोपीवाले, बुशकोटवाले, सद्रावाले, खादीचा अंगरखावाले, मिशावाले, बिनमिशावाले, भांगवाले, टक्कलवाले, चष्मावाले, नुसत्याच डोळ्यांचे, चकणे, एक डोळावाले, लठ्ठ, बारीक, उंच, ठेंगू, वहीत लिहून घेणारे, जांभया देणारे, दात पुढे असलेले, नसलेले, कवळीवाले, बोळकेवाले, काळे, गोरे, देवीचे वणवाले, पुटकुळ्यावाले, लेंगेवाले, धोतरवाले, अर्धी विजारवाले, पाऊण विजारवाले, पूर्ण विजारवाले, उभे राहिलेले, ताठ बसलेले, पोक काढून बसलेले, दात-कान-नाक कोरणारे, तपकीर ओढणारे, मधेच उठून जाणारे, शेवटपर्यंत बसणारे पण शेवटी गाढ झोपलेले, व्याख्यान चालू असताना वर्तमानपत्र वाचणारे, हळूच चावट कोट्या करणारे, भगिनींच्या दिशेला ध्यान लावून बसलेले, कुठेतरी पाहून गालातल्या गालात हसणारे, 'चला चला' अशी बायकोला खूण करणारे, विनोदाला हसणारे व न हसणारे, विनोद होण्यापूर्वीच हसणारे, बरोबर आहे अशा माना डोलावणारे, सविकार, निर्विकार....किती तऱ्हेचे बंधू—

आणि किती तऱ्हेच्या भगिनी—प्रत्येक व्याख्यात्याच्या "बंधू आणि भगिनींनो" ला 'ओ' द्यायला मौजूद आहेत.

हे बंधू आणि भगिनी 'तैत्तिरीयसंहिता आणि छांदोग्योपनिषदाची तुलना' ऐकतात, 'दातांची निगा व रोग' ऐकतात, 'पंचवार्षिक योजनेतील पहिली दोन वर्षे' ऐकतात, 'समाजवाद आणि हिंदुराष्ट्र' ऐकतात, 'शाकुंतलातील प्रियंवदा हीच नायिका कशी?' हे ऐकतात. 'दशमान चलन', 'कोंबड्यांचे रोग', 'आधुनिक मराठी कादंबरीचा उत्क्रांतिमार्ग', 'सहकारी पतपेढ्या', 'जपानी भातशेती', 'नागपंचमीचे महत्त्व', 'आर्यांचे नौकानयन', 'जातिसंस्थांचे निर्मूलन', 'दारूबंदी का?', 'दगडी कोळशाचे नवे उपयोग', 'कोबाल्ट बॉंब कसा करतात?', 'स्त्रियांना, मतदान कशाला?', 'धूम्रपान आणि कॅन्सर', 'टिळक पंचांगाची शास्त्रीयता', 'कालवे आणि धरणे', 'हातमागाचा जीर्णोद्धार', 'मी नटी का झाले?', 'सर्वोदय आणि मद्य', 'विजेचे अपघात कसे टाळावे?', 'बहिऱ्यांचे शिक्षण', 'वेदकालीन आगपेट्या', 'स्टॅलिन आणि याज्ञवल्क्य', 'डेन्मार्क-मधल्या लोकशाळा', 'शिरडीचे माहात्म्य', 'साम्यवादी स्वर्ग', 'माणूस मेल्यावर कुठे जातो?' 'आगरकरांचे पुण्यस्मरण', 'टांगेमहाराजांची पुण्यतिथी', 'भगतसिंगाचे गुणगान', 'जैन साधूंची अहिंसा', 'अंडी आणि आरोग्य' ह्यांतले काहीही किंवा सर्व काही ऐकायला जमतात. मग साहित्या-तली नवनिर्मितीही ऐकायला त्यांनी का जमू नये? हे सारे ऐकणाऱ्या ह्या बंधू आणि भगिनी अमर आहेत—आणि नसल्या तर असोत. एकाच शेतात भात, गहू, हरभरा, पोकळा, पडवळ, तूर, बाजरी, शेपू पेरणारा शेतकरी जन्माला आला नसेल, पण ह्या बंधुभगिनींच्या पुढे काहीही पेरावे—उगवण्याची भीतीच नाही, पेरणाऱ्याचा शौक एवढेच!

"ध्या!" ह्या शब्दांनी जाग येते. येत आहे, येत आहे—या शब्दांनी गाजलेली कॉफी शेवटी येते. त्या घोटाबरोबर गळ्याशी असलेली प्रस्तुत व्याख्यानासंबंधीची उरलीसुरली आठवण पार तळाशी जाते. आता दिवाणखान्यातली मंडळी पांगतात! झाले. व्याख्यानाला (की व्याख्यात्याला?) कॉफीची तिलांजली मिळाली—संपला ऋणानुबंध!!!

दीड महिन्याची तयारी, वाचनालये, पुस्तके, कोश, विद्वान प्राध्यापक

मित्रांशी चर्चा, सगळ्या तपावर कॉफी पडली—आता काय? एक भयंकर पोकळी निर्माण होते. त्यात सेक्रेटरीचा आवाज घुमतो—

"माफ करा हं प्राध्यापकसाहेब....निघूच या आपण, पण एवढी एंट्री करतो ह्या बुकात. आपल्या व्याख्यानाचा विषय काय होता आजच्या?"

व्याख्यानाच्या शवपेटिकेतला ह्या शेवटचा खिळा!!

"सांगता ना विषय....काहीतरी सौंदर्यबिंदर्य होतं ना?"

"सौंदर्याच्या नव्या वाटा."

सेक्रेटरी 'बुकात' विषय लिहितात.

अरे बाप रे—हा विषय भाकरवाडीच्या साहित्यवर्धक मंडळाचा—जाऊ दे! काय बिघडतंय—

आता पुन्हा दोन दिवसांनी संध्याकाळी भाकरवाडीला—'बंधू आणि भगिनींनो....'

◊ ◊

७

# माजघरातला स्फिंक्स

## एक परीक्षण, दहा पत्रे आणि एक खुलासा
## (एक साहित्यिक चर्चा)

'माजघरातला स्फिंक्स' हे जगदीश खर्डेनवीस ह्यांचे नाटक. ह्याचा प्रयोग पाहणाऱ्यांच्या नशिबी निराशा यावी. ह्यापूर्वीच्या त्यांच्या 'शरद्कुमार नावाचा बोका', 'साडेसहा आणि शंभर' आणि 'वाढता वाढता वाढे' ह्या तीन नाटकांनी अपेक्षांची पातळी उंचावली. ह्या नाटकाने ती खालावली.

तीन तास हे नाटक सारखे रंगत जाते हे ह्या नाटकाचे टोकदार यश आणि अपयशही! पहिला अंक फारच बटबटीत वाटावा. दुसरा भुसभुशीत आणि तिसरा सपक. तिसरा अंक नसता तर नाट्यवस्तूला गोलाई आली असती आणि रुंदाईही. गेल्या वर्षात रंगभूमीवर आलेल्या सर्व नाटकांत हा दोष आढळावा. स्वतः नाटककार जगदीश खर्डेनवीस ह्यांनीच ह्या नाटकाचे दिग्दर्शन केले होते आणि 'नवकलाकिरण' ह्या संस्थेने हे रंगभूमीवर आणले.

कुठल्याही न बदललेल्या परिघातून ह्या नाटकाचा विकास होतो. त्यामुळे कथावस्तूचा कोंजेपणा पदोपदी जाणवावा. भावनाविष्काराच्या पातळ्या

एकमेकींना चाटून जातात आणि संघर्षाची ठिणगी ठायीठायी विझते. कथावस्तूला बटबटीत संवादांनी सतत ढका लागतो. कथावस्तू थोडक्यात अशी : दिलीप नावाचा असहाय कलाकार. त्याला देवकी नावाच्या तरुणीविषयी आंतरिक ओढ वाटू लागते. दिलीप मूर्तिकार आहे. देवकीचा शिवणकामाचा क्लास आहे. त्यांच्या परिचयाच्या प्रसंगात पहिला अंक संपतो. आणि इथे नायिकेचे पात्र आकार घेऊ लागते. हा प्रसंग वास्तविक कथावस्तूला एक आगळा छेद देऊन जातो. आणि नाटक इथेच संपते. इथे मॉर्टिमूर मरियानाच्या 'इव्हिनिंग बिकम्स मॉर्निंग' ह्या अलौकिक नाटकाची आठवण यावी. गेल्याच वर्षी ह्या नाटकाचा 'फ्लटलाइट फॉलोअर्स' ह्या नाटकसंस्थेने हॉर्नबी रोडवरच्या ट्रॅफीक आयलंडमध्ये केलेला आधुनिक तंत्राचा प्रयोग स्मरावा. 'इव्हिनिंग बिकम्स मॉर्निंग'ला रस्त्याची पार्श्वभूमी आहे. वाहत्या ट्रामचा आणि बसेस व मोटारींचा त्रिमिती परिणाम साधण्याच्या दृष्टीने हा प्रयोग ट्रॅफीक आयलंडमध्ये करण्यामागील औचित्य ध्यानात यावे. प्रेक्षक ही नाटकाला लागणारी अत्यंत अनावश्यक बाब आहे हेही उमजावे. कलाकारांचे स्वान्तःसुखही जाणवावे. 'फ्लटलाइट फॉलोअर्स'च्या एकेचाळीस सभासदांनी ट्रॅफीक आयलंडच्या आत राहून हा प्रयोग पाहिला. प्रकाश-योजना म्युनिसिपालिटीच्या आणि मोटारींच्या गतिमान दिव्यांनी साधली होती. तिच्याशी तुलना करता 'माजघरातील स्फिंक्स'मध्ये निर्मितिमूल्यांची वोयट आबाळ झाली होती. सारी पात्रे रंगमंचामागूनच येत होती. पार्श्वसंगीताची योजना फारच सामान्य भासावी. दिलीपची भूमिका शाम सोंडूरकर ह्यांनी केली. त्यांच्या भूमिकेला कोन अजिबात नव्हते. त्यामुळे ती गुळगुळीत वाटली. त्यांची संवाद उच्चारायची पद्धती फारच सदोष वाटावी. प्रत्येक संवाद प्रेक्षकांना कळला पाहिजे ह्या हट्टात चापल्य फिसकटावे आणि भूमिका धुरकटावी. त्या मानाने 'शरदकुमार नावाचा बोका' ह्या नाटकात त्यांचा अभिनय उजवा वाटावा. तिथे त्यांच्या भूमिकेने बाळसे धरल्यामुळे रूपाकृती सुस्पष्ट असून त्यात कलात्मक धूसरता राहिली आणि गेलीही.

स्वतः नाटककार जगदीश खर्डेनवीस ह्यांनी देवकीच्या बापाची भूमिका केली. त्यांना तन्मय अलिप्तता साधली नाही. त्यांची ठुणठुणीत संवाद

म्हणण्याची पद्धती विसंवादी भासावी. त्यांच्या संवादात एक नकली झिलई आहे. त्यामुळे सामान्य प्रेक्षक झिंगून जातात. इथे एक कलाहीनतेची पोकळी निर्माण होते आणि त्यात नाट्य गडगडते आणि तरंगतेही, परंतु रुजत नाही. कथावस्तू फुलण्यासाठी रुजावी ही किमान अपेक्षा. इष्ट परिणाम साधण्यासाठी योजलेल्या ठराविक क्लृप्त्या ठराविकतेत परावर्तित होत जातात आणि नाटक दुसऱ्या अंकात स्वतःभोवती रुंजी घालू लागते. इथे गतीला आसाची धार राहात नाही आणि ते घरंगळते.

एकूण सात पात्रे असलेल्या ह्या नाटकात कुणाच्याही अभिनयाला टोक आले नाही. इथे कथावस्तूच्या बोथटपणाचे टोपण जाणवावे. पार्श्वसंगीतातील सूचकता काही ठिकाणी मर्यादा सोडून प्रेक्षकांपर्यंत पोहोचते आणि नाटकाचा तलमपणा भंगतो. उदाहरणार्थ, दिलीपच्या डोक्यात देवकीबद्दल विचार घोळत आहेत हे दाखविण्यासाठी रंगमंचाच्या मागल्या बाजूने शिलाईचे यंत्र चालू असल्याचा आवाज प्रेक्षकांना न ऐकू येता जर नायकालाच फक्त ऐकू आला असता तर नाटक अधिक मऊ राहिले असते. नाटकभर अंधार ठेवून पडदा पडता पडता जर रंगमंचावर प्रकाशझोत टाकला असता तर धूसरतेत अधिक भर पडली असती. ठळक प्रकाशयोजनेमुळे एक कृत्रिम झगझगाट निर्माण होतो. त्याने नाटक करपावे. देवकीची भूमिका साधना सोनगावकर ह्यांनी केली. त्यांच्या कामामधून हल्ली तोचतोपणा फारच भासावा. त्यांची सुई बोचल्यानंतरची किंकाळी आणि झेड अल्बुकर्क ह्यांनी यंदाच 'विंग कमांडर्स' ह्या नाट्यसंस्थेतर्फे रंगभूमीवर आणलेल्या 'ऑथेल्लो'मधील कुमी पलसेटिया ह्यांची डेस्डिमोनाची शेवटल्या अंकातली किंकाळी ह्यांची इथे तुलना व्हावी. त्या किंकाळीला एक त्रिज्या होती, एक आगळी धार होती आणि एक प्रकारची त्रिपरिमिती जाणवून देणारी 'क्यूबिकॅलिटी' होती. त्या मानाने साधना सोनगावकर ह्यांची किंकाळी अकारण फुगली. बाकीच्यांच्या भूमिकांबद्दल न लिहिणेच बरे. हे नाटक कदाचित संस्थेला आर्थिक लाभ करून देईल. इथेच निर्मळ कलाकृतींना निर्माण झालेला कलात्मक धोका !

अ० ब० क०

*पत्र पहिले*

संपादक 'आर्द्रा' यांस स० न० वि० वि०

आपल्या गेल्या आठवड्याच्या अंकात श्री अ० ब० क० ह्यांनी श्री जगदीश खर्डेनचीस ह्यांच्या नव्या नाटकावर लिहिलेले परीक्षण वाचले. त्यात नाटककारावर अन्याय होतो आहे, असे वाटते. वास्तविक नाटकाचे संपूर्ण कथानक देण्याची आवश्यकता होती. पहिल्याच अंकाच्या कथानकाचा गोषवारा दिला आहे. त्यामुळे परीक्षणातील पुढचा भाग अप्रस्तुत वाटतो.

२१ उस्मानबाग कऱ्हाड

आपला
गोविंद गोवित्रीकर

*पत्र दुसरे*

संपादक 'आर्द्रा' यांस स० न० वि० वि०

श्री गोविंद गोवित्रीकर ह्यांचे पत्र वाचले. मी आज गेली पंचवीस वर्षे कऱ्हाडला राहात आहे. कऱ्हाडात उस्मानबाग कुठे आहे ह्याचा श्री गोविंद गोवित्रीकर त्याच उस्मानबागेतून खुलासा करतील काय?

दत्तघाट, कऱ्हाड

आपला,
नारायण गंगाधर कुलकर्णी उंब्रजकर

*पत्र तिसरे*

संपादक 'आर्द्रा' यांस स० न० वि० वि०

(१) श्री उंब्रजकर कुलकर्णी ह्यांचे गेल्या अंकातील पत्र वाचले. कऱ्हाडात उस्मानबाग असण्याशी त्यांनी उत्पन्न केलेल्या मुद्दयाचा काय कलात्मक संबंध आहे हे समजत नाही. वास्तविक श्री गोवित्रीकरांनी आपला पत्ता दिला नसता तरी भागण्यासारखे होते. कलात्मक चर्चेचा हा प्रश्न असून टपालखात्याचा नाही हे साधे तत्त्व दत्तघाट, कऱ्हाड येथे राहणाऱ्या नारायण गंगाधर कुलकर्णी उंब्रजकर ह्यांच्या ध्यानात का येऊ नये? टीकाकार कुठे राहतो ह्यावर टीकेचे मूल्यमापन ठरू नये.

(२) आता 'शरदकुमार नावाचा स्फिंक्स' विषयी थोडेसे : प्रस्तुत नाटक आम्ही पाहिले नाही. (आणि कदाचित पाहिलेही नसते.) परंतु अ० ब० क०

ह्यांच्या टीकेशी आम्ही सहमत आहो. नाट्यवस्तूच्या पातळ्या एकमेकांत मिसळल्या नाहीत तर कलाकृतीला एकसंधत्व प्राप्त होत नाही हे तत्त्व कुणालाही मान्य व्हावे. आपल्याकडील बहुतेक नाटककारांचा हा दोष आहे. शेक्सपिअरसारखे नाटककारदेखील ह्या दोषाचे धनी आहेत. उदाहरणार्थ, हॅम्लेटमधील थडगे उकरण्याचा प्रसंग घ्या. केवळ अपेक्षित परिणाम साधण्यासाठी शेक्सपिअरने थडग्यातून कवटी काढण्याचा अत्यंत कृत्रिम प्रसंग घातला आहे. जीवनातली अस्थिरता जाणवण्यासाठी थडगे उकरण्याची आवश्यकता नव्हती.

(३) पहिल्या अंकातच कथावस्तू संपते आणि त्यामुळे नाटकही! असे असताना श्री जगदीश खर्डेनवीस ह्यांनी दुसऱ्या व तिसऱ्या अंकासाठी कागद व शाईचा अपव्यय का केला? विशेषतः टंचाईच्या दिवसांत हा राष्ट्रीय संपत्तीचा अपव्यय नाही का?

खुलाशाची अपेक्षा नाही. तो होत नसतो हा पूर्वानुभव.

आपले
राम देखणे
बाबुराव बोरवणकर
अ. ज. दत्तपुत्रे
कमळाकर सारंगपाणी
मालिनी मेणवलीकर

नवी खेतवाडी, मुंबई

*पत्र चौथे*

प्रिय संपादक,

गेल्या अंकात राम देखणे आणि चार इतर ह्यांनी लिहिलेल्या पत्रात 'शरदकुमार नावाचा स्फिंक्स' असा उल्लेख आहे. परीक्षण झाले ते 'शरदकुमार नावाचा बोका' ह्या नाटकाचे असावे. चुकीची दुरुस्ती व्हावी.

आपला,
गदाधर देठे

माहीम

संपादक 'आर्द्रा' ह्यांस,

स० न० वि० वि० आपल्या पत्रात सध्या चालू असलेल्या नाट्यचर्चेच्या निमित्ताने नाट्यनिर्मितीच्या मूल्यांविषयी मी थोडेसे लिहावे म्हणतो.

आपल्या रंगभूमीला शंभरावर वर्षे होऊन गेली हे वादातीत आहे. मी नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या 'रंगमंच आणि रंगदेवता' ह्या पुस्तकात (प्रकाशक : धायफोडे आणि सन्स, धरमपेठ, नागपूर) मी पहिले नाटक केव्हा प्रसिद्ध झाले हे लिहिले आहे. जिज्ञासूंनी ते मुळातच पाहावे.

नाट्येतिहासाच्या संपूर्ण सिंहावलोकनासाठी मी प्रगतीचे चार टप्पे कल्पिलेले आहेत. पहिल्या टप्प्याला मी प्रथम पर्व म्हणतो. ह्या टप्प्यात नाट्यकलेची बीजे कशात आहेत हे मी सुस्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. नाट्य हे संघर्षातून निर्माण होते हा सार्वत्रिक अपसमज आहे हे मी नम्रपणे सुचवू इच्छितो. ह्यात कोणत्याही ख्यातनाम टीकाकारांना दुखवण्याचा माझा हेतू नाही. कारण प्रत्येक टीकाकार आपापल्या जागी श्रेष्ठ आहे हे मी जाणतो. परंतु संघर्ष जर कशातून निर्माण होत असेल तर नाट्यातून. नाट्य हे बीज आहे आणि संघर्ष हा अंकुर आहे. नाट्य निर्माण न होते तर संघर्ष का निर्माण होता? (ह्यासंबंधीचे विस्तृत विवेचन मी माझ्या 'संघर्ष हवाच का' ह्या पुस्तिकेत केले आहे. प्रकाशक : चोंभा प्रकाशन, महाल, नागपूर. प्रस्तावनालेखक म. म. बल्लाळशास्त्री चामुंडराय, वाङ्मयमहाप्रसाद. त्यामुळे त्याविषयी मी आता अधिक लिहू इच्छीत नाही.)

नाट्यकलेच्या प्रगतीच्या दुसऱ्या टप्प्याला मी 'द्वितीय पर्व' असे सुटसुटीत नाव दिले आहे. त्यात मी वैश्विक नाट्यवाङ्मयाचा थोडक्यात परामर्श घेतला आहे. त्यात नाटकाच्या अंकांना अंक न म्हणता 'भुज' म्हणावे हे मत मी प्रतिपादन केले आहे. नाट्यवस्तू अंकांनी वाढत नसून भुजांनी वाढते आणि एकभुजावतारी नाट्यदेवता प्रसंगी दशभुजाही कशी होते आणि खलत्वाचा विध्वंस करून मांगल्याचा विजय कसा साधते, हे देशो-देशीच्या नाटकांवरून कुशलतेने सिद्ध केले आहे. संस्कृतातील एक उपेक्षित नाट्यपरामर्शी भट्टभुंजक ह्याचा मी वेळोवेळी आधार घेतला आहे हे मी इथे अत्यंत कृतज्ञतेने नमूद करू इच्छितो. (भट्टभुंजक ह्यावरूनच मराठीत

भडभुंजा हा शब्दप्रयोग आला असेल का?) अर्थात कोणत्याही ख्यातनाम अशा आधुनिक भड्भुंजकांचा मला अपमान करावयाचा नाही हे मी अत्यंत नम्रपणे ह्या छोट्या पत्रावरून पुन्हा सांगू इच्छितो.

प्रस्तुत ग्रंथात नाट्यकलेच्या तिसऱ्या खंडाला मी 'तृतीय पर्व' असे नाव देऊन 'नाट्य आणि नट' ह्यांचा अन्योन्यसंबंध सिद्ध केला आहे. ह्या खंडाविषयी लिहिताना पेशावरचे एक ख्यातनाम टीकाकार डॉक्टर मक्मूल हुसेन 'गब्दुल' आपल्या पुश्तू टीकेत म्हणतात, "परुतुनी डरामाई खिदमदगार याऱ्चंद पिशावरी नाष्टगोफ्त रुख फुख लोष्ट शुकशुकाष्ट शुक्रगुजार प्रोफेसर यार्कुंदवार इ. नागपूरी." अर्थ उघड आहे. शिवाय स्वतःची स्तुती इतकी स्पष्ट करून सांगणे संकोचामुळे आवरतो. पुश्तू भाषेत माझ्या हळकुंडवार ह्या नावाचे यार्कुंदवार असे उच्चारण होते ही मौजेची गोष्ट आहे. चौथ्या भागात पहिल्या तीनही भागांची थोडक्यात उजळणी करून प्रत्येक पर्वाचा सारांश दिला आहे.

प्रस्तुत ग्रंथाविषयी विस्ताराने लिहावयाचे एकच कारण की आजकालच्या टीकावाङ्मयाकडे पाहता सखोल अभ्यासाचा अभाव जाणवतो.

'माजघरातील स्फिंक्स' हे श्री जगदीश खर्डेनवीस ह्यांचे नाटक मला पाहावयास मिळाले नाही. किंबहुना वैश्विक वाङ्मयाच्या अभ्यासात गेली कित्येक वर्षे गुंतल्यामुळे आधुनिक नाटके वाचण्यास सवड मिळाली नाही. परंतु रचनेच्या दृष्टीने मी एकोणिसशे चौदा साली लिहिलेल्या 'विमलाबाई' ह्या नाटकाकडे वाचकांचे लक्ष वेधू इच्छितो. प्रस्तुत नाटकातील नाट्यामुळे प्रचंड संघर्ष निर्माण झाला. हे नाटक धामापूरकर संगीत मंडळीने इ० स० १९१४ साली एप्रिल महिन्याच्या चौदा तारखेला वाशीम येथे रंगभूमीवर आणले. दुर्दैवाने पहिल्या प्रयोगानंतर कंपनी फुटल्यामुळे अजूनही दुसरा प्रयोग होऊ शकला नाही. त्यातील विमलाबाईचे काम मास्टर गुरुनाथ बुरूड कमालीच्या तन्मयतेने करीत असे. वाशिमला पहिला प्रयोग पाहण्यासाठी आलेले त्या वेळचे कमिशनर विल्यम बीरबॉटम ह्यांनी मास्टर गुरुनाथ बुरूड ह्यांची एलेन टेरीशी तुलना केली होती. विल्यम बीरबॉटम ह्यांच्या आजोबांची आणि एलेन टेरीच्या मावशीची दाट ओळख होती. (हा सारा इतिहास मी माझ्या 'नाट्यमंदिराचे चिरे' ह्या पुस्तकात दिला आहे.)

'विमलाबाई' हे नाटक त्यानंतर आजपर्यंत अव्याहत गाजत आहे. पहिल्या प्रयोगाचा परिणाम अजूनही गेला नाही असे वाशिमची वृद्ध मंडळी सांगतात. जिज्ञासूंनी वाशिमला जाऊन खात्री करून घ्यावी.

ह्या असामान्य नाटकाने (हे शब्द कै० काकासाहेब चोपडे, दारव्हा येथील मालगुजार व नाट्यरसिक, ह्यांचे आहेत.) मला नाट्यक्षेत्रात जे एक स्थान मिळवून दिले त्या नम्र आधारावर प्रस्तुत पत्र लिहिले आहे. ह्यात कोणत्याही ख्यातनाम टीकाकाराला दुखवण्याचा उद्देश नाही. नाट्यकला चिरायू होवो.

आपला

हिलटॉप कॉलेज — डॉ० नीमराज भास्कर हळकुंडवार

रामटेक—व्हाया नागपूर — रिटायर्ड प्रोफेसर

ता० क०—वर उल्लेखिलेली माझी सर्व पुस्तके ह्या पत्त्यावरून मागवता येतील.

***पत्र सहावे***

संपादक 'आर्द्रा',

स० न० वि० वि०

'विमलाबाई'कर्ते डॉक्टर हळकुंडवार ह्यांचे अत्यंत मुद्देसूद पत्र वाचले.

'विमलाबाई' नाटकाच्या पहिल्या प्रयोगाची आठवण वाशिमचे वृद्ध अजून सांगतात हे सत्य आहे. त्या दिवशी थेटरात झालेल्या खुर्च्यांच्या फेकाफेकीत माझ्या कपाळात आदळलेल्या खुर्चीमुळे झालेली जखम बरी झाली, परंतु वण अजून आहे. जिज्ञासूंनी वाशिमला येऊन 'विमलाबाई' नाटकाची ही सखोल आठवण प्रत्यक्ष पाहावी.

आपला

वाशीम — एक वाशिमकर वृद्ध

*पत्र सातवे*

संपादक 'आर्द्रा',

स० न० वि० वि०

एक शंका : एका वाशिमकर वृद्धांच्या कपाळावरची जखम ही 'विमलाबाई'च्या पहिल्या प्रयोगाच्या वेळच्या थेटरातल्या मारामारीवरून झाली ह्याचा पुरावा काय?

आपला

पुणे — एक पुणेकर तरुण

*पत्र आठवे*

संपादक 'आर्द्रा',

स० न० वि० वि०

चौदा साली कपाळावर झालेल्या जखमेला एक वाशिमकर वृद्ध पुरावा काय देणार कपाळ?

नाशिक — एक नाशिककर मध्यम वयस्कर

*पत्र नववे*

प्रिय संपादक 'आर्द्रा',

ह्यांसी स० न० वि० वि०

गेले काही आठवडे आपल्या अत्यंत लोकप्रिय पत्रातून चाललेली 'माजघरातील स्फिंक्स' ह्या नाटकाची चर्चा मी वाचीत आहे. आजकाल वाङ्मयीन चर्चेला अत्यंत हीन स्वरूप येत चाललेले आहे. वैयक्तिक कुचाळकी अगर वैयक्तिक ढोल बडविणे ह्यापेक्षा ह्या चर्चेला फारशी किंमत राहिली नाही. उदाहरणादाखल डॉ० नी० भा० हळकुंडवार ह्यांचे पत्र पाहा. प्रस्तुत पत्रात श्री खर्डेनवीस ह्यांच्या नाटकाविषयी—(मी ते नाटक पाहिले नाही आणि पाहणारही नाही. आधुनिक नाटके भिकार असतात असे माझे ठाम मत आहे.) एक अक्षरही नसून स्वतःच्या 'रंगभूमी आणि रंग-देवता' ह्या चुकीच्या माहितीने भरलेल्या ग्रंथाविषयी भरमसाट तारीफ करण्यात प्राध्यापकमजकुरांनी धन्यता मानली आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या मी

दोन महिन्यांपूर्वी साप्ताहिक 'धनंजया'तून चिंध्या केल्या आहेत. आपल्याकडे साडेतीन पुस्तके वाचून विद्वान झालेल्या लोकांत असले प्राध्यापक खूप आहेत. भरमसाट विधाने करणे हे त्यांचे मुख्य भांडवल आहे. ॲरिस्टॉटलची तर एकालाही माहिती नाही. भरताचे नाट्यशास्त्र कशाशी खातात हे ठाऊक नाही. तरीही नाट्यवाङ्मयाचे अधिकारी म्हणून लुडबूड करायची आणि इतरांवर असभ्य राळ उडवीत अललडुर्र करून वाङ्मयीन रंगमंचावर नाचायचे ही राक्षसी रूढी विद्वानांनी तरी बंद केली पाहिजे. टीकाशास्त्र हा पोरखेळ होऊ पाहात आहे. माझ्या सहा लेखांनंतरही डॉक्टर हळकुंडवारांनी स्वतःच्या नाट्यवाङ्मयाविषयी लिहावे हे कोडगेपणाचे लक्षण नाही काय?

वास्तविक टीका वस्तुनिष्ठ असावी. चिखलफेक म्हणजे टीका नव्हे किंवा आत्मप्रौढी म्हणजेही टीका नव्हे. विशुद्ध सौंदर्यशास्त्रीय दृष्टिकोण हा वास्तविक साहित्यिक टीकेचा मूळ पाया. परंतु ॲरिस्टॉटल, प्लेटो, हेगेल, मेगॅस्थिनीस, जिजिबेरीस, बोहिली कॉर्बिनी, शांपेन-ड-पॉपेन ह्या जागतिक कीर्तीच्या टीकाशास्त्रज्ञांची तोंडओळखही नसलेल्या तथाकथित विद्वानांनी हा अट्टाहास करण्यापूर्वी दहा वेळा विचार करावा व अर्ध्या हळकुंडाचे हे वार बंद करावेत. वाङ्मयीन टीकेची निर्मलता तरच राहील. आणि कोणत्याही वैयक्तिक निंदेला बळी न पडणाऱ्या आमच्यासारख्या नम्र साहित्योपासकांच्या निस्सीम साधनेची बूज राहील.

आपला नम्र
गो० ग० कापशे
प्रो० ऑफ इंग्लिश

बेकनहॅम कॉलेज, मांडूप

*पत्र दुसरे*

संपादक 'आर्द्रा' ह्यांस,

स० न० वि० वि०

'माजघरातील स्फिंक्स' हे नाटक स्वतंत्र नसून कोणत्या तरी परकीय नाटकाचे भाषांतर असावे असे वाटते. अशाच स्वरूपाचे एक नाटक पूर्वी वाचल्याचे स्मरते. आपल्याकडे मूळ लेखकाचे नाव न देता भाषांतर करण्याची

प्रवृत्ती वाढत आहे, तिला आळा बसणे आवश्यक आहे. तरी मूळ परकीय नाटकाचे नाव कोणाला स्मरत असल्यास आपल्या लोकप्रिय साप्ताहिकातून तो ते कळवण्याची दखल घेईल का? मी अजून हे नाटक संपूर्ण वाचले नाही. परंतु कव्हरवरील स्फिंक्सचे चित्र पाहून मला जी शंका आली ती कळवीत आहे. खुद्द नाटककाराने खुलासा करावा.

आपला

९१९ कार्टर गेट, पुणे जोसेफ हरि पवार

"प्रस्तुत विषयासंबंधीची चर्चा आता आम्ही बंद केली आहे." संपादक 'आर्द्रा' ह्यांनी हा मजकूर कंपॉझिटरच्या स्वाधीन केला आणि दुपारच्या डाकेने नाटककाराचा खुलासा आला.

संपादक आर्द्रा ह्यांस,

स० न० वि० वि०

आपल्या लोकप्रिय पत्रातील माझ्या नाटकासंबंधीचा पत्रव्यवहार आजच वाचून काढला. कंपनीचा मुक्काम वेंगुर्ल्याला असल्यामुळे आपले लोकप्रिय साप्ताहिक वाचनात आले नव्हते. पहिल्या प्रयोगाचे परीक्षण वाचून आश्चर्य वाटले. कारण प्रयोग खुल्या रंगमंचात झाला आणि पहिल्या अंकानंतर पाऊस आल्यामुळे पुढले दोन अंक होऊच शकले नाहीत. तरीही आपल्या टीकाकाराने नाट्यप्रयोगाचे परीक्षण लिहिल्याबद्दल आभार. वेंगुर्ल्यास सोळा प्रयोग हाउसफुल्ल झाले हे अपयश नमूद व्हावे.

आपला नम्र

जगदीश खर्डेनवीस

—संपादकांनी पत्राचा चोळामोळा करून तो टोपलीत टाकला आणि संपादकीय अधिकारात वेळीच पत्रव्यवहार बंद केल्याचा सुस्कारा सोडून आपली वाङ्मयीन टिप्पणी लिहिण्याचे काम पुढे चालू केले. कंपॉझिटर म्याटरचा तगादा लावीत होता.

"...बेजबाबदार टीकापद्धतीला पायबंद हे वाङ्मयीन क्रूसेड्सच्या धर्तीने चालवण्याचे कार्य आहे..." इ० इ० इ०

## ८

# सर्दी

सर्दी हा एक मोठा चमत्कारिक रोग आहे. वास्तविक रोग म्हणवून घेण्याच्या लायकीचाही हा रोग नाही. 'रोग' ह्या शब्दालाही काही दर्जा आहे. दमा, क्षय वगैरे भारदस्त मंडळींनाच ही उपाधी लागू पडते. रक्तदाब हा मला वाटते एक नुसता विकार आहे. मधुमेह हा विकार आणि रोग ह्यांच्या सीमारेषेवर घुटमळणारा चाळिशी उलटलेला गृहस्थ आहे. पण सर्दी ही नुसतीच एक पीडा आहे. पूर्वी नथ, पाटली वगैरे 'दागिन्यां'च्या सदरात मोजत नसत. बाई म्हटली की नथ-पाटली आपोआप यायची. ठुशी, तन्मणी हे दागिने! त्या दागिन्यांचे कौतुक व्हायचे—चौकशी व्हायची. एखाद्या बाईच्या हातात पाटली आली तर मुद्दाम होऊन तिने आपला हात पुढे नाचविल्याशिवाय तिथे कुणाचे लक्षच जात नसे.

सर्दीचे असेच आहे. हा रोग 'रोग' ह्या सदरात येत नसल्यामुळे त्याचे कौतुक अगर चौकशी होत नाही. आपल्याला सर्दी झाल्याबद्दल सहानुभूती मिळत नाही. वास्तविक खऱ्या सहानुभूतीची आवश्यकता असते ती असल्या चिल्लर वाटणाऱ्या पीडांच्या बाबतीत! मान धरलेला इसम (आपोआप!—दुसऱ्या कोणी नव्हे.) हे इंद्रियगोचर सृष्टीतले माझ्या मते सर्वांत करुण दृश्य!

तेव्हा मान आखडते किंवा धरते तेव्हा माणसाच्या साऱ्या नाड्या आखडतात. तो खुळ्यासारखाच दिसायला लागतो. त्याचे एकूण व्यक्तिमत्त्वच काहीच्या काही होऊन जाते. परंतु ह्या प्रकरणात सगळ्यात दुःख असते ते सहानुभूतीच्या अभावाचे! कुणाला आस्थेने आपली मान धरल्याचे सांगावे आणि परिणामी त्याच्याकडून एखादी क्षुद्र कोटी किंवा 'कोयता ओढा', 'पायाळू माणसाची लाथ खा' असला काहीतरी आचरट इलाज ऐकायला मिळावा.

सर्दीचे असेच आहे. सर्दी का होते हेही कळत नाही आणि का बरी होते हेही कळत नाही; औषधांनी ती बरी होत नाही हे मात्र निश्चित!

मान धरलेला माणूस आणि सर्दी झालेला माणूस ह्यांच्या दर्शनात मात्र खूप अंतर आहे! मान धरली की चेहऱ्यावर एकाएकी दैन्य येते. चेहरा कितीही उग्र असो, मिशांचे चढलेले आकडे असोत, डोळ्यांत जरब असो, छातीचा कोट असो किंवा केस ताठ असोत, एकदा मान धरली की सारी जरब, सारा रुबाब, कडवेपणा, कुठल्याकुठे पळून जातात आणि खर्चाशिवाय खटला काढून टाकल्यावर दिसणाऱ्या वादीसारखा माणूस गरीब्या दिसायला लागतो. सर्दीचे तसे नाही. सर्दीमुळे माणसाच्या चेहऱ्यावर एक व्यक्तिमत्त्व येते! गोरी माणसे सर्दी झाल्यावर अधिकच रुबाबदार दिसतात. आणि गोऱ्यापान तरुणींना तर सर्दीमुळे निराळीच कांती येते! गर्भकांतीचे कौतुक सर्वांनीच केले आहे. परंतु शिंकेने हैराण झालेल्या युवतीच्या सौंदर्याची सर फक्त रुसव्यापोटी निघालेल्या रडण्यातल्या सौंदर्यालाच आली तर येईल.

माणसाप्रमाणे सर्दीला बाल्य, यौवन, वार्धक्य असते. म्हणजे पहिल्या दिवसाची सर्दी अवखळ असते. फटाफट शिंकाच काय येतात, घसाच काय खवखवायला लागतो. ही बाळसर्दी आपल्याला एका जागी बसू देत नाही. एकाएकी तहान लागते, तपकीर ओढावीशी वाटू लागते; कडकडीत दुधात हळद घालून प्यावेसे वाटू लागते. परंतु हळूहळू तिच्यातही एक प्रौढत्व येते आणि मग ती गंभीर होते आणि आपल्यालाही गंभीर करते. आपली छाती वाजू लागते. छातीत नुसत्याच खर्जाचे तंबोरे ठेवल्यासारखे वाटायला लागते. डोके काठोकाठ भरलेल्या माठासारखे जड होते किंवा खांद्यावर एरवी डोक्याचे वजन कधी भासत नाही ते भासू लागते आणि नकळत आपल्या चेहऱ्यावर एखाद्या तत्त्वज्ञाची गंभीर कळा येते. एखादा विद्वान

अध्यक्षाला व्यासपीठाकडे नेताना तालुक्याच्या गावातल्या बालोत्तेजक किंवा तरुणोद्धार मंडळाच्या चिटणिसाचा चेहरा जसा एकदम गंभीर होतो किंवा सुपरवायझर वर्गात शिरले की शाळामास्तराच्या चेहऱ्यावर जसे अगतिकता आणि गांभीर्य यांचे चमत्कारिक लिंपण लागते तसे काहीसे आपण दिसायला लागतो. हे गांभीर्य सत्त्वगुणी नसते. त्याची मुळे तमोगुणात शिरलेली असतात. हे गांभीर्य आपल्या चेहऱ्यावर लादलेले असते. अवघडलेल्या मानेच्या माणसाची मान ताठ असून जशी ताठ नसते तद्वत सर्दी भरल्यामुळे चेहऱ्यावर आलेले गांभीर्य 'इमिटेशन' गांभीर्य असते. असल्या माणसाकडे पाहिले की आपली दर्शनी फसवणूक होते. परंतु तो बोलायला लागला की त्याच्या आवाजावरून त्या गांभीर्याच्या झिरमिळ्यांचा जर खोटा आहे हे आपल्याला लगेच उमगते. बाकी ही देखील एक मौजच आहे. दातांची नवी कवळी बसवलेला म्हातारा काय विलक्षण तुकतुकीत दिसतो! विशेषतः दंतवैद्याच्या नजरचुकीने चेहऱ्याचा ठसा बदलून टाकणारी कवळी बसवली जावी म्हणजे तर चेहऱ्याच्या मूळच्या सुरकुतलेल्या रेषांना पार इस्त्री होऊन गाल चांगले ताणून गेलेले असतात. पण हे सारे तोंड उघडीपर्यंत! एकदा असल्या इसमाने तोंड उघडले की ह्या साऱ्या तुकतुकीचे कारण चटकन उघडे पडते. सर्दीचे गांभीर्य असल्याच जातीचे!

पण सर्दीची तिसरी अवस्था मात्र अस्वादाचे व्रत शिकविण्यासाठी जन्माला येते. ह्या अवस्थेत घ्राणेंद्रियांचा संप सुरू होतो. पोळी खाल्ली काय किंवा पोस्ट कार्ड खाल्ले काय काही फरक कळत नाही. वासाच्या दुनियेतले हर्षखेद मावळतात. पोपईची आणि आंब्याची फोड ह्यांतला फरक नष्ट होतो. अशा एका अवस्थेत मी वसईच्या कोळीवाड्यावरून सकाळी फिरून आलो. किनाऱ्याला भराभर विजान बसवलेले मचवे लागत होते. त्यांतून टोपल्या भरभरून तऱ्हेतऱ्हेची मासळी किनाऱ्यावर येऊन पडत होती. सुकायला टाकलेल्या बोंबलाच्या आणि 'सुकटां'च्या रांगांनी बांबूंचे ते मांडव बहरले होते. परंतु माझ्या डोळ्यांपर्यंतच ते पोहोचत होते. नाकाला वर्दी नव्हती. चांगला तासभर मी तिथून हिंडत होतो, पण एकदाही हातरुमाल नाकाशी गेला नाही. किनाऱ्यावर पसरलेल्या असंख्य जातींच्या माशांच्या रंगांशी, आकाराशी आणि ताजेपणाशी स्पर्धा करणाऱ्या मत्स्यगंधा

तेथे होत्या. पण माझ्या हिशोबी त्या मत्स्यगंधा नव्हत्या, नुसत्याच कोळणी होत्या.

गंधसृष्टीने माझ्यापुढे लोखंडी पडदा टाकला होता. रामनवमीला रामाच्या देवळात जाऊन नुसतेच कीर्तन ऐकू यावे आणि सुंठवडा मिळू नये अशी माझी अवस्था होती. माशांचे मासेपण माझ्या लेखी (नाकी?) तरी हरपले होते. मांदाळी खाल्ली काय, पापलेट खाल्ले काय किंवा सुरणाच्या फोडी तळून खाल्ल्या काय, मला सर्व सारखेच होते. मला एकदम एक निराळाच साक्षात्कार झाला. सर्वत्र समभावाने पाहणाऱ्या संतांची परिस्थिती काय करुण होत असेल याची जाणीव मला त्या वेळी प्रथम झाली. तळलेले पापलेट आणि तळलेला सुरण दोन्ही मला सारखे? मला माझी कीव आली. जीवनातला सारा आनंद विषमभावात आहे हे त्या वेळी मला कळले! ओढ्याचे जिवंत खळाळणे आणि सोडावॉटरच्या बाटलीचे फसफसणे ह्या मूलतः किती निराळ्या गोष्टी आहेत हे मला तिथे उमजले.

नाद, रंग, रस आणि गंध ह्यांनी आपल्यावर काय अपार उपकार केले आहेत याची पहिली जाणीव माझ्या संपावर गेलेल्या नाकाने दिली. चौपाटी-वरची भेळ चौपाटीवरच का चांगली लागते ह्यामागले गूढ मला उकलले. तिथे लाटांचा नाजूक आवाज असतो, मावळत्या सूर्याचे रंग असतात, ओलसर वाळूचा स्पर्श असतो, अंगावरून जाणाऱ्या अनोळखी रेशमी साडीची सळसळ असते आणि त्याशिवाय मग भेळ असते! म्हणून ती भेळ चांगली! हे सारे निरनिराळेपण आपल्याला दिसते, आपल्या कानावरून जाते, आपल्या नाकाशी, ओठाशी घोटाळते म्हणून या साऱ्या धडपडीला अर्थ येतो. छे, छे! कंटकशल्ये बोथटता कामा नयेत. मखमालीची लव वठता कामा नये. डोळ्यात आसू हवेत, ओठावर हसू हवे—आणि ह्या साऱ्यांच्या वृंदवादनात झपूर्झाही हवा.

मला एकाएकी वासाची ओढ लागली. खरपूस बाजरीच्या भाकरीचा वास, दुपारच्या झोपेतून उठलेल्या बालकाच्या अंगाचा वास, नव्या पुस्तकाचा वास, हळदीचे पान टाकून कढवल्या जाणाऱ्या लोण्याचा वास, घरातले हळदीकुंकू आटोपल्यावर दिवाणखान्यात रेंगाळणारा वास, गुऱ्हाळातला वास, गोठ्यातला वास, गाभाऱ्यातला वास,....माझ्या प्रत्येक

श्वासाने नवा वास घेतला आहे. वास नष्ट होणे आणि श्वास नष्ट होणे सारखेच !

साचे साचे वास आपल्याला कुठल्या कुठे घेऊन जातात. अजूनही नव्या पुस्तकाचा वास मला माझ्या मराठी शाळेत घेऊन जातो. पुष्कळदा पूर्वी येत होता तसला वास येत नाही नव्या पुस्तकाला आणि आपल्याला फसल्यासारखे वाटते! बदलत्या साहित्याने पुस्तकांचे वासही बदललेले दिसताहेत! बाकी शब्दांनाच जर वास असता किंवा घ्राण असती तर साहित्याचे मूल्यमापन फार सोपे झाले असते. पण जिव्हाळ्याच्या शब्दांना वास असतो. नाही असे नाही. स्पर्शदेखील असतो. अजूनही कोणी उभ्याउभ्या जरी मला "चिरंजीव हो" असा आशीर्वाद दिला तरी मला पाठीवरून हात फिरवल्यासारखा वाटतो. पण खराखुराच जर का वास असता शब्दांना तर भलतीच आफत झाली असती. कागदी शब्दांना कागदी फुलासारखा वासच आला नसता आणि 'फुलराणी'सारखी कविता उघडल्या-बरोबर घमघमाट सुटला असता. बाकी डोक्यात भलतीच सर्दी शिरलेली नसली तर अजूनही तो वास येतो. ज्ञानेशाची ओवी कानावर पडली किंवा पंतांची आर्या खणखणली की उदबत्तीचा सुगंध ठेवून गेल्याशिवाय राहात नाही. अशा वेळी विचार येतो की ह्या नव-कविता कसला सुगंध ठेवून जातात? पण सुगंधाचा ठेवा हा काही विचार करून सापडत नसतो. सुगंधाची खरी गंमत, खरा लुत्फ तो नकळत भेटतो तेव्हा! कल्पनाही नसते आणि आपल्याला वास येतो. वास घेण्यापेक्षा वास येण्यात आनंद आहे. पूर्वीच्या काळी बायका ठेवणीच्या लुगड्यात वाळा घालून ठेवीत आणि मग सणासुदीला त्यांनी ट्रंक उघडली की अनपेक्षितपणे तो वाळ्याचा वास दरवळायचा. काव्याचा वासदेखील असाच दरवळला पाहिजे! अलिकडे कित्येक वर्षांत असा वास ठेवून जाणारी कविताच वाचली नाही. ह्या नवकवितांनाच वास नाही की माझ्या नाकात सर्दी भरली आहे देव जाणे! कदाचित नव्या सुगंधाचा मला साक्षात्कार नसेल. मला देवळातल्या गाभाऱ्यातल्या मशालीच्या जळक्या कापडाचा वास आवडतो, पण मशीन पुसायच्या कापडाच्या चोथ्याचा वास माझ्यावर काही संस्कार उठवून जात नाही. नवी गंधसृष्टी समजायला, मला वाटते, ह्या वासांची नाकाला सवय

हवी! माझे नाक आता जुने होत चालले. त्याला ओढ आहे ताज्या शेणाने सारवून हिरव्या झालेल्या जमिनीच्या वासाची! सिमेंटच्या वासातून ते बिचारे फुलत नाही.

आम्ही शहरची वस्ती सोडून एका बाळबोध गावात राहायला गेलो होतो. टुमदार गाव होते. सुसंस्कृत होते. कलाप्रिय होते. पण आम्हांला घर मिळाले ते शेणाच्या जमिनीचे! माझ्या पत्नीने पहिल्या दिवशी घर सारवले आणि शेणाने भरलेल्या हातांनी ती भिंतीला टेकून आपली कर्तबगारी पाहात उभी राहिली होती. त्या ताज्या गोमयाच्या गंधाची त्या दर्शनाला साथ मिळाली होती. आणि म्हणून माझ्या नाकात सारवलेल्या जमिनीच्या वासाला एक मनोहर आकार आहे! तो गंध नाही. गंधाची कन्या आहे. अजूनही मला तो वास आला की त्या वासाचीच सौभाग्यवती मूर्ती माझ्यापुढे उभी राहते!

पुराणात कुणी योजनगंधा होती म्हणतात. कित्येक योजने दूर असली तरी म्हणे तिचा वास येत होता. मला वाटते, प्रत्येक नगरी ही योजनगंधा असते! पुण्याहून कल्याणला गाडी आली की मला मुंबईचा वास येऊ लागतो आणि जाताना देहूरोड गेले की पुणे दरवळायला लागते. ह्या नुसत्या वासांच्या आठवणींनी मी हिंदुस्थानातल्या हिंदुस्थानात तरी खूप भटकून येतो!

आणि आज माझी पंचाईत झाली आहे. मी तऱ्हातऱ्हा करून पाहिल्या. पण माझे नाक ऐकायलाच तयार नाही. मी सकाळी उठलो आणि ब्रशावर पेस्ट ओतली. दात घासले, वास नाही. चहा प्यालो, पत्ता नाही. सिगरेट ओढली, जळकी काटकी ओढल्याचा भास झाला. जेवलो. भाजी, आमटी, भात, आणि ताज्या माशाचे तळलेले तुकडे. काही फरक नाही. पान खाल्ले. ते आंब्याचे किंवा केळीचे असते तरी चालले असते. सुपारी आणि कातरलेले लाकूड मला आज सारखेच! सर्वत्र समभाव. संतांची दृष्टी नसली तरी संतांची जीभ मला लाभली होती. अस्वादाने अन्न भक्षण करणाऱ्या, जाणिजे यज्ञकर्म म्हणून पोटातल्या वैश्वानराला आहुती टाकणाऱ्या संतांची रसहीन रसना! मला ती रसना नको आहे. सर्दीचा आणि संतांचा संसर्ग एकूण माणसांना उपयोगाचाच नाही. सर्दीचे गांभीर्यही नको, स्वादहीनता नको आणि संतांची समदृष्टी तर नकोच नको. त्यांना साऱ्याची चवच सारखी

लागते, एवढेच नव्हे, तर सारे सारखेच दिसतात आणि सारे स्वरदेखील सारखेच वाटतात म्हणे! अरे, अरे, अरे! माझ्या नाकात जरी या क्षणी वास नसला, डोक्यात जरी काठोकाठ भरलेली सर्दी असली तरी अंतःकरणात मात्र एकाएकी ह्या संतांविषयी विलक्षण कळवळा दाटला आहे! मात्र एक बारीक प्रश्न वर डोकं काढतो आहे! संतांना आपल्याबद्दल कळवळा वाटतो म्हणतात तो कशासाठी मग?

● ●

१

# घरगुती भांडणे

संसाराला बहिणाबाईंनी तापलेल्या तव्याची उपमा दिली आहे. दोन चार चटके लागल्याशिवाय खरपूस भाकरी मिळायची नाही. थोडक्यात म्हणजे संसार ही सुळावरची पोळी नसली तरी तापलेल्या तव्यावरची पोळी आहे. वातावरण थंड असलं तर थंड स्वयंपाकाइतकाच संसारही बेचव. अधूनमधून वाहणारे उष्ण वारे संसार कसा उबदार ठेवतात. आणि म्हणूनच संसारातल्या बारीकसारीक चकमकीतून उडणाऱ्या ठिणग्यांना एवढं महत्त्व आलं आहे. लग्नपत्रिकेत छत्तीस गुण जमतात की नाही हे मोठं बारकाईने पाहिलं जातं—आणि अशा ह्या छत्तीसगुणी पत्रिका लग्नानंतर एकत्र आल्या की त्या पत्रिकांतील गुणांपेक्षा छत्तीस या आकड्याचंच काही विशेष वजन वाटू लागतं. अधूनमधून, कुणाच्या तरी बत्तिशीचा गुण म्हणा नाहीतर काही म्हणा, एरवी अतिशय प्रेमात वागणारं जोडपं एकदम छत्तिसाच्या थाटात एकमेकाकडे पाठ फिरवतं.

कुण्या विद्वानानं मराठी भाषेतला 'तिरसट' हा शब्द कुठल्यातरी 'त्रेसष्ट' साधूंच्यावरून आला आहे असं म्हटलंय. मला व्युत्पत्तिशास्त्र फारसं येत नाही—परंतु त्रेसष्टात तिरसटपणा अजिबात नाही; उलट तोंडमिळवणी

करण्याची इच्छा आहे. त्या मानाने हा छत्तीस अधिक तिरसट आहे. पंचविशीत भांडणाचा प्रश्नच नसतो. तिशीत पुरुषाला तरी निदान भांडायला सवड नसते. कारण तो त्याचा ऐन कर्तबगारीचा काळ. पानात पिठलं आहे की श्रीखंड आहे, याची चर्चा करायला त्याला वेळच नसतो. पण एकदा पस्तिशीपर्यंत सगळी स्थिरस्थावर झाली की छत्तिशी सुरू होते आणि अंबाडीची भाजी शिजून तयार झाली की शेवटली फोडणी पडावी तशी घरगुती भांडणाची फोडणी तिथे पडते. विशी-पंचविशीत भांडणं होतात, पण त्यांना तिखटामिठाची चव यावी इतकी ती टिकत नाहीत. म्हणजे वळवाच्या सरीइतकीदेखील ती टिकाऊ नसतात. त्यामुळे भांडण चांगलं रुजतच नाही. बरं, भांडायला मुद्देही फार नसतात. छत्तिशीत संसाराचं दशक गाठलेलं असतं. कलहकार्याला 'आज गेली दहा वर्षं पाहतोय मी' किंवा 'गेली दहा वर्षं सोसतेय मी' असा संकल्प सोडून सुरवात करता येते. आणि भांडणाचं कारण लपवणं हे तर भांडणातलं खरं कसब. 'तुम्ही मला लुगडं आणतो असं कबूल करून लुगडं आणलं नाही' अशा स्पष्ट 'नोटीस बजावणेत येत आहे' च्या थाटात भांडण सुरू झाल्याचं माझ्या चोरून देखील ऐकिवात नाही. आम्हीही काही भांडणं ऐकली आहेत—काही काही चांगली भांडणं ऐकली आहेत. ज्यांत नवऱ्याच्या चतुराईनं मी मी म्हणणाऱ्या मुत्सद्द्यांना विचार करायला लावला असता अशी भांडणं ऐकली आहेत. आणि काही भांडणांना स्वतःही तोंड दिलं आहे. आता भांडण मिटवायला, तोंड देणं हा उपाय चांगला की तोंड न देणं—हा प्रश्न ज्याचा त्याचा आहे. संसारात भांडण हे तोंडीलावणं आहे का तोंडीलागणं आहे हे भांडणाऱ्याच्या कसबावर अवलंबून आहे. ज्याप्रमाणे पटाईत कुस्तीगीर कुस्ती खेळतात आणि आडमाप तालीमबाज नुसतेच मातीत दंगा करतात, त्याप्रमाणे पटाईत नवरे ही भांडणं खेळतात. आणि हा खेळ अत्यंत विकट आहे. कारण हे भांडण आताच मी म्हणालो तसं सरळसरळ नसतं. मघाचंच उदाहरण घ्यायचं म्हणजे प्रसंग असा—नवऱ्यानं पातळ आणण्याचं वचन देऊन आणलं नाही. समजा हेच दोन पुरुषात भांडण असतं तर कसं झालं असतं? आता पुरुषांत एकमेकांना पातळ आणून देण्याचा प्रश्न उद्भवत नाही. समजा, दोन मित्र आहेत—एकानं दुसऱ्याला ऑफिसातून येता येता सिनेमाचं तिकीट काढून

आणून द्यायचं वचन दिलं आणि तो विसरला. ह्या प्रसंगातला कलह सरळ होईल.

"बंडोपंत, विसरलो बुवा तिकीट आणायला."

"महामूर्ख आहात. तुमच्यावर विश्वास ठेवला हा आमचाच गाढवपणा.... आता मंडईतून येता येता पुन्हा मटार आणायला सांगाल का? लेको, साधं सिनेमाचं एवढंसं तिकीट आणता आलं नाही तुम्हांला आठवणीनं. ऑफिसातून काय गांजा पिऊन येता काय रे....मला चांगले हरिभाऊ फुकट नेत होते नाटकाला तर आम्ही बसलो तुमच्या तिकिटाची वाट पाहात...."

"हे पाहा बंडोपंत, मी तिकीट आणायला विसरलो हे सत्य आहे— माणूस हा विस्मरणशील आहे. आणि अस्खलितशील की काही तरी आहे. आता जास्त बोलाल तर त्याच अस्खलितशीलपणाला स्मरून मुस्कटात मारीन."

काय स्वच्छ अगदी आरशासारखं निर्मळ भांडण आहे हे. ह्यात डावपेच नाही. आडव्या वाटा नाहीत—प्रतीकं नाहीत. प्रतिमा असल्याच तर गाढव वगैरे सर्वपरिचित प्रतिमा. त्यामुळं हे भांडण शास्त्रोक्त वाटतं. पण संसारातल्या भांडणाची जातच निराळी. सणसणीत आवाज हे वास्तविक भांडणांचं भांडवल. भांडणं ही मुद्द्यापेक्षा आवाजावर जिंकली जातात. पण मघाचं लुगड्यासंबंधीचं भांडणच घ्या. तुम्ही लुगडं आणायला विसरला आहा. तुम्ही खरोखरच विसरला आहा. तुम्ही नेहमीप्रमाणं उजव्या हातात पिशवीभर अळू, मेथीची भाजी अगर तत्सम विटामीन अगर प्रोटीनयुक्त भाज्या घेऊन घरात शिरता. बेल वाजवता. तत्परतेनं दार उघडलं जातं. आत स्टोव्ह पेटतो आहे. त्यावरून तुमच्या येण्याच्या वेळेची प्रतीक्षा होत होती, याचा अंदाज तुमच्या सराईत कानांना लागतो. कुटुंबाची दृष्टी पिशवीवरून बकोटीकडे जाते. तिथं नुसतीच छत्री आणि सकाळचं वर्तमानपत्रच आहे. हे वर्तमानपत्र तुमच्या आफिसातले नाना हरहरे तुम्हांला वाचून निम्म्या किंमतीला विकतात हा मुद्दा गौण आहे. परंतु नुसतंच वर्तमानपत्र, तिथं दुसरं पुडकं नाही; हे पाहून अॅसिडमध्ये टाकलेल्या लिटमस पेपरसारखा कुटुंबाच्या चेहऱ्याचा रंग बदलत जातो. उदाहरणादाखल चेहऱ्यावरील रंगाचा बदल दिसू शकेल असाच कौटुंबिक चेहरा गृहीत धरला आहे. कानशिलं

लालसर दिसू लागली आहेत. नाकाच्या शेंड्यावर एक विचित्र थरथर सुरू झालेली आहे. क्षणभर तुम्ही विचारात पडता आणि बंडाचं तात्कालिक कारण काही तुमच्या ध्यानात येत नाही. तुमच्या पोटात बर्फाची लादी बसवल्याचा तुम्हांला भास होतो. आता फक्त पहिलं भांडं केव्हा वाजतं याची वाट पाहण्यापलिकडे तुम्हांला उद्योग नसतो. पूर्वी दारूगोळा पेटायला लागला की 'भांडी वाजों लागलीं' म्हणत. त्याचा उगम ह्या ह्या स्वैपाकघरातल्या भांड्यात असावा. आता हे भांडण कसं होतं पाहा. चहाचं पातेलं दणकन आपटलं जातं. उकळतं पाणी हातावर उडतं. तुम्ही म्हणता, "अग, अग, हळू—चटका बसेल!" उत्तर नाही. तुम्हांला वाटतं, चटक्याबद्दल भरपूर सहानुभूती दाखवली गेली नाही. तुम्ही म्हणता, "ह्या स्टोशी जरा बेतानं वागावं. आजच वर्तमानपत्रात आलंय...." तुमची अपेक्षा असते, "काय?" ह्या प्रश्नाची. पण आज अपेक्षित अशी कोणतीही प्रतिक्रिया होणार नाही. वायदा पातळाचा होता. त्याऐवजी हिऱ्याची आंगठी आणली तरी त्या पातळावरच ती अधिक खुलून दिसली असती म्हणून भांडण. मग तुम्ही चटक्याची सहानुभूती वाढवून म्हणता, "परवा ती कोणीतरी बाई—चहाचं आधण पायावर पडून मेली म्हणे." अपेक्षा ही की आता कुटुंब त्या मृत बाईबद्दल "अगाई ग बिचारी! मुलंबाळं होती का तिला....?" अशी सहानुभूती दाखवणार. पण नाही. ती बाई मेली ह्या वाक्याला "सुटली" हे उत्तर. घरगुती भांडणाला जर आगळी मीठ-मसाल्याचीच उपमा द्यायची असेल तर असलं मितभाषी भांडण म्हणजे लवंगी मिरच्यांचा ठेचा. मिरची जितकी लहान तितकी अधिक तिखट ह्या न्यायानं शब्द जितके कमी तितकं भांडण कसदार—आणि मिरचीच्या ठेच्याइतकंच डोळ्यांतून पाणी आणणारं. हां, पण उपमेत बारीक फरक आहे. मिरचीचा ठेचा खाणाऱ्याच्या डोळ्यांत पाणी आणतो. इथे प्रकार उलटा आहे. इथे हे लवंगी शब्द उच्चारताना डोळ्यांतल्या पाण्याच्या प्रवाहात भिजवून उच्चारले जातात. आणि ते डोळ्यांतलं पाणी म्हणजे स्पिरिटसारखं झोंबत जातं; ह्या भांडणाचा प्रसंग वैऱ्यावर देखील न येवो!

अर्थात प्रापंचिक चकमकींना पातळ, नथ, पाटली, बुगडी, असलं काही महाग कारण लागतं असं नाही. अगदी मजेत फिरायला जावं, सोबत कुटुंब

असूनदेखील आनंदात असावं, मुलांना हट्ट सुचू नये आणि त्यांनी शेजाऱ्यांच्या घरी खेळायचं कबूल करावं. वाटेत आपली अगर तिची मावशी भेटू नये. वेणीवाल्यांचा हरताळ असावा. स्नो-पावडरींच्या दुकानांचं वार्षिक स्टॉकटेकिंग चालू असावं. कचेरीतल्या चहावाल्यानं चुकून आपलं बिल हेडक्लार्ककडून वसूल केलेलं असावं. आपण पर्वतीच्या वाटेवर असावं. मेळवाल्यांना फ्लू झालेला असावा, आणि उसावर उसाच्या अनेक रोगांपैकी त्याच्या गंडेऱ्या केल्यावर होणारा रोग पडलेला असावा. तमाम भिकारी जंगलीमहाराजासमोर गेलेले असावे. थोडक्यात इकडे म्हणजे पर्वतीवर आणि तिकडे म्हणजे घरी आनंदीआनंद असावा, आणि स्वार्थाचा बाजार बंद होऊन कुणीही पामरे रडत नसावी. अशा वातावरणात आपण फिरायला सहकुटुंब निघावं. आता भांडणाला काही कारण आहे का? पण इथेही भांडण होऊ शकतं. मुद्दा साधा असतो. तुम्हांला पर्वतीच्या पायथ्याशी बसावंसं वाटतं. आणि कुटुंबाला त्या दिवशी नेमका देवीच्या दर्शनाचा पुळका येतो. आणि मग तुम्ही म्हणता, "जाऊ पुन्हा केव्हातरी"— बस्स....बिघडला मामला. "कधी तरी मेलं यायचं इथं. जरा चार पायऱ्या चढून वर गेलं तर काय होणार आहे देव जाणे."

"अग, पण चार पायऱ्यांनी भागणारं काम नाही हे. पाचशे बहात्तर पायऱ्या आहेत. दिवसभर ऑफिसात काम करून आलोय मी."

"हो, आणि आम्ही घरी नुसता पंख्यानं वारा घेत पडलो होतो. शेजारच्या प्राज्वेट गंगूबाईसारखा!"

आता प्राज्वेट गंगूबाई हा टोमणा वरपांगी प्राज्वेट गंगूबाईंना आहे असं वाटेल, पण तसं नाही. तुम्हीच कधीतरी गंगूबाईंच्या सुशिक्षितपणाची, तिच्या टापटिपीची गाफिलपणानं तारीफ केलेली असते. त्यामुळे हा घाव त्या प्रसंगातून स्फुरलेला असतो. हे भांडण मात्र जोरदार होतं. तुम्हीही दोन-चार पट्टे फिरवता. गंगूबाईच्या प्राज्वेटपणाची तारीफ तुम्ही अत्यंत सोज्वळ मनानं केलेली असते. ती दिसायला शंभरजणींतली आहे आणि तुमच्या कुटुंबाचा देखणेपणा दहा जणींच्या गिनतीत आटोपतो हा काही तुमचा दोष नव्हे अगर तुमच्या कुटुंबाचाही नव्हे. पण रूप कुणाच्या हातचं नसतं. "गंगूबाईंचा संसार बघायला पाच जिने चढून जाल. पण एवढीशी पर्वतीवर

देवीच्या दर्शनाला जायला निघाले तर पाय मोडले—" असं ह्या भांडणाला भलतंच प्रिॲंबल जोडलं जातं. म्हणजे बराच वेळ प्रतिपक्षाला भांडणाचा नक्की विषय काय ह्याच्याच गोंधळात टाकून द्यायचं. घरगुती भांडणाचं हे एक वैशिष्ट्य आहे. समर्थ म्हणतात, "तुटे वाद संवाद तो हीतकारी" परंतु ह्या न तुटणारा संवाद करायची समर्थांवर वेळच येऊन ठेपली नाही. त्यांच्या सुदैवानं काळ आला होता पण वेळ आली नव्हती. परंतु इथं ह्या वाद आपण गप्प राहूनही तुटत नाही. इथं वाद तर तोडला जात नाही, पण मीठ तोडलं जाण्याचा संभव असतो. स्वैंपाकघरातल्या वातावरणाचं आणि चुलीचं व्यस्त त्रैराशिक असतं. वातावरण थंड, आणि म्हणूनच पर्यायानं तळिराम गार होतो. म्हणून सुज्ञ कौटुंबिक जेवणाच्या वेळी भांडण उकरीत नाहीत. त्यावेळी भांडण उकरलं की भात उकरला जाणार नाही, आणि गिळायला आवंढ्यापलिकडे काही राहणार नाही, याची त्यांना शंभर टक्के खात्री असते.

घरगुती भांडणात आदळआपटीच्या क्रियेला विशेष महत्त्व असतं. किरकोळ भांडणात आपल्यासमोर मूल आणून मांडीवर आपटलं जातं. त्याच्या वरची पायरी म्हणजे भांडी आपटणं. आपटलेल्याला पोचा आला की नवऱ्याला खोक पाडल्याचं पुण्य मिळत असावं. स्वतःचं डोकं आपटणं ह्या अत्यंत आणीबाणीचा प्रसंग; त्याला मात्र फारच सबळ कारण लागतं.

रुसवाफुगवा हे घरगुती भांडणातले अहीमही. त्यांच्या म्हणे रक्तांतून नवे मही जन्माला यायचे. रुसव्याला मारण्याचा कितीही प्रयत्न केला तरी तो वाढतो. हसव्या मार्गांचा तर यावेळी जाणकार कधीही अवलंब करीत नाहीत. माहेरच्या माणसांचा विनोदी भाषेत उल्लेख हे सामान्यतः रुसव्याचं प्रमुख कारण. अशा वेळी भांडणाचा प्रकार निराळा असतो. वेळेवर चहा दिला जातो. धोतराच्या निऱ्या काढल्या जातात. घंघाळात गरम पाणी ओतलं जातं. साबणाची वडीदेखील बदलली जाते. परंतु हे सारं करताना नाकपुड्या अशा एका विशिष्ट तऱ्हेने फुललेल्या असतात की, रुसव्याचा वास त्या फुललेल्या नाकाच्या अनुरोधानं आपल्याला यावा. आणि फुगवा हा रुसव्याचा धाकटा भाऊ. त्याला रुसव्याची ऐट नसते. आणि बालक अशक्तही असतं. फारसं टिकत नाही. नाकाचं फुलण्याचं कार्य गाल करतात. हनुवटी गळ्यात खोपली जाते. डोळा आपल्या डोळ्याखेरीज अन्यत्र

भेडलेला असतो. बहुधा तिच्या वाढदिवसाची विस्मृती हे फुगव्याचं कारण असतं. हा घालवायचा एकमेव उपाय म्हणजे—विनोदाची नाजूक टेचकी. अशा वेळी गालाचा उंचवटा ठिकाणावर आणायला एखादी कपोलकल्पित कथा उपयोगी पडते. फुगलेल्या गालांतली हवा खुदकन बाहेर पडते. संसाराच्या ताटातला हा डाव्या बाजूच्या तिखटगोड लोणच्यासारखा सर्वांत स्वादिष्ट पदार्थ. हे भांडण फक्त गाल भांडतात म्हणूनच नव्हे, तर फुगव्याचं एकूण स्वरूपच मोहक असतं.

त्याखेरीज धोब्याचे कपडे कुणी मांडायचे याविषयीच्या चकमकी, पाहुणे येणार असल्याची पत्रं आल्यानंतरचं द्वंद्वयुद्ध अगर नवा ब्लाउज घातल्यावर त्याकडे आपलं दुर्लक्ष झाल्यामुळं येणाऱ्या वाकटळी—हे कौटुंबिक भांडणा-तले किरकोळ प्रकार आहेत. एक धोरण मात्र निश्चित असावं की, त्या भांडणात आपला पक्ष हा युगायुगांचा पराजित पक्ष आहे, त्याच्या नशिवी राज्यकारभार नाही. हे लक्षात ठेवलं की ह्या भांडणातून तिखट-मिठाची चव निर्माण होते, आणि ही भांडणं पेटवायचीच ठरवली तर योगेश्वर कृष्ण पाठीशी असला तरी आपल्याला तत्र श्रीर्विजयो विजयो काही नाही, याची खात्री असावी. कारण योगेश्वर कृष्णानं अर्जुनाला एका प्रचंड गृहकलहात यश मिळवून दिलं, परंतु घरात मात्र रुक्मिणी-सत्यभामेला तोंड देता देता बिचारा जेरीला आला होता. थोरांच्या उदाहरणांनी आपण सावध असावं.

## १०

# एका दिवंगत गंधाचा मागोवा

गोऱ्या रामाच्या देवळाला उजवी घालून त्या गल्लीत शिरले की नाकात एक वास शिरत असे. त्या वासाला तळणाचा वास म्हणावा तर तो नुसता तळणाचा नसायचा. त्यात थोडासा खरपूस भाजण्याचा वास होता— काहीसा दगडी कोळशाचाही सुगंध होता. चिरलेल्या कच्च्या बटाट्याचीही खुशबू त्यात होती. कुणाही क्षुधार्तोला क्षणमात्र रेंगाळायला लावणारा तो वास होता. पहिलीपासून सातवीपर्यंत सकाळी शाळेत जाताना, दुपारच्या सुटीत येता-जाताना आणि संध्याकाळी परतताना त्या वासाच्या 'गंधच्छटा' नाकाजवळ रुंजी घालून जायच्या. सकाळी त्या वासाला जोष असे. दुपारी त्या वासाची आठवण त्या खाणावळीपुढे रेंगाळत असे. पाटाला पाट जोडून उघडेबंब वाढपी त्यावेळी वामकुक्षी करीत पडलेले असायचे. संध्याकाळी मात्र त्या वासाला आगळे स्वरूप येत असे. संध्याकाळच्या वासात केवळ कांदाच अधिक मिसळलेला असे म्हणून नव्हे, तर खाणावळीच्या दाराशी एक वेणीवाला आपले दुकान थाटायचा आणि मोगरी, जाई, चाफा असल्या सन्माननीय वासांत तो अनोखा गंध मिसळून एक नवाच वास तयार व्हायचा. एखाद्या कारखान्यात काम करणाऱ्या मजुराने दिवसभराचे

कालेजेंद्रे कपडे फेकून आपला मंडईत जाण्याचा स्वच्छपैकी पोशाख करून बाहेर पडावे तसा तो वास संध्याकाळी त्या वेणीवाल्याच्या टोपलीतल्या सुगंधाचा अंगावर जणू काय शिडकावा करून बाहेर पडत असे.

वास कसलाही असो, मला क्षणभर तिथे थांबवल्यावाचून सोडीत नसे. सात वर्षांच्या आमच्या परिचयात मला त्याची सगळी रूपे पाठ झाली होती. खाणावळीचा उग्र दर्प म्हणणाऱ्या लोकांना खाणावळीतल्या एका स्थायी दर्पात किती छटा दडलेल्या असतात याची कल्पना नाही. खरे म्हणजे माणसे वास घेतच नाहीत. रस्तादुरुस्तीचे काम सुरू झाले की दुरून उकळत्या डांबराचा वास घ्यावा. त्या वासाबरोबर, ते जैतापूर-जयगडचे रामा-शिवा-गोविंदा लोक उकरलेल्या रस्त्याकडे पान-तंबाकू चोळीत एकटक लावून बसलेले असतील, मुकादम हातातली तंबाकूची चिमूट तशीच धरून "वालकेशरचा रस्ता खोदलिला तंवा....काय झाला होतां—इंजनेर सांडिचा एकदम कसा फुरशासारका निंगाला न कस्याचा काय न् कायस्याचा काय कसां होऊन गेलां" याच्या कथा कशा सांगत असेल हे चित्र डोळ्यांपुढे उभे राहिले पाहिजे! नुसत्या खाणावळीच्या उंच गजांच्या खिडक्यांपलिकडून येणाऱ्या वासावरून आज तोंडली आहेत की गवार आहे हे ज्याला ओळखता आले नाही, त्याने नाक नुसते तोंडाबरोबर वागवले, वापरले नाही. पन्नास वाद्यांच्या मेळाव्यातून बेसूर व्हायलीन ओळखून काढणाऱ्या चतुर संगीतदिग्दर्शकाच्या कानाप्रमाणे 'नाक' तयार हवे! तळले जातेय ते थालिपीठ आहे की धिरडे आहे हे ज्याला कळले नाही त्याला कळलेच काय शेवटी?

घरगुती स्वयंपाकघर आणि खाणावळीचा मुदपाकखाना यांतून अनेक वास निघतात हे खरे, पण खाणावळीतून वासांचे एकमेकांत मिसळलेले इंद्रधनुष्य निघते. घरगुती स्वयंपाकघरातून एखादी ठसठशीत फोडणीच काय ती दिवाणखान्यापर्यंत उठवळपणे वाट काढीत येते. खाणावळ अवघे वातावरण बदलीत जाते. खाणावळ ही केवळ घासांची दुनिया नाही, वासांची दुनिया आहे. मात्र त्या वासांना परंपरा आहे, खानदान आहे. किंबहुना 'खान'दान शब्दाचा संबंध खानापेक्षा खाण्याशी अधिक असावा. नाहीतरी परंपरा ही खाण्यातूनच सिद्ध होते. होळीला पोळी व्हावी आणि चतुर्थीला

मोदक व्हावे हाच परंपरेचा खरा अर्थ! भोगीला काय पुरणाची पोळी घशाखाली जाणार नाही? पण नाही—तेथे तीळ लावलेली बाजरीची भाकरी आणि वांग्याचे भरीत यांचेच काम आहे.

खाणावळ ह्या संस्थेचे चिरंजीवित्व ह्या वासात होते. डाळभात घरोघरी होतो. परंतु खाणावळीतला भातदेखील स्वतःचा गंध घेऊन येतो. तो भात साक्षात अन्नपूर्णेच्या हाताबाहेरचा आहे. फरसबी नावाच्या शेंगविशेषाचे अस्तित्व हे केवळ खाणावळीसाठीच आहे. बटाटा घरी चिरला जातो आणि खाणावळीतही चिरला जातो. परंतु कौटुंबिक बटाट्याचे गंधरूप खाणावळीतल्या बटाट्याच्या पासंगालाही पुरणार नाही. खाणावळीतल्या चिरल्या बटाट्याचे निःश्वास एका अनाकलनीय गंधाने फुलून येतात. खाणावळींनी ही परंपरा जोपर्यंत सोडली नव्हती तोपर्यंत त्या आपले स्वरूप टिकवून होत्या. पंच्यातला बल्लव अर्ध्या विजारीत गेला आणि त्याचे पाक-परंपरेची पुटे चढलेले जानवे ज्या क्षणी तुटले वा धुतले गेले, त्या क्षणी एक परंपरा धुळीला मिळाली.

परवा मी बऱ्याच वर्षांनी त्या गल्लीतून गेलो. ती गल्ली 'ती' नव्हतीच, कारण तिथे 'तो' वास नव्हता. मी क्षणभर गोंधळलो. मला वाटले, ती गल्ली चुकली. मी प्राणायाम करणारे घेतात तसला श्वास घेऊन पाहिला, पण तो वास आला नाही. अभावितपणे माझे डोळे त्या कोपऱ्यात वळले. तिथे एक निराळीच पाटी होती. आणि आतले दृश्य मी पाहू शकलो नाही—कारण तिथे पाट नव्हते, ते एकापुढे एक मांडून कोणी झोपले नव्हते—तिथे टेबले होती....त्या टेबलांनी, त्या स्वच्छतेने आरोग्य आणले होते आणि तो गंध नेला होता. गड आला असेल पण सिंह गेला होता हे निश्चित!

माझे नाक त्या वासाला हपापले आहे; खूप हिंडलो, पण एकाही गल्लीला आता त्या वासाचे लेणे राहिले नाही.

तो वासच निराळा—त्या वासामागे अनेक गोष्टी दडल्या आहेत. स्वयंपाकघरात प्रचंड चुलीमध्ये लीलेने लाकडाचे ओंडके सरकवता सरकवता पोळ्या लाटणारा तो आचारी—बहुधा 'पांडोबा' ह्या नावाचा! माझ्या परिचयातले बारापैकी सात आचारी पांडोबा ह्याच नावाचे निघाले. बाकीच्या पाचात जनार्दन तीन, एक हरी, आणि एक गोविंदराव होते. दोन गुरखे किंवा दोन आचारी ह्यांच्यातले उजवेडावे ओळखणारा मनुष्य

चित्रकार किंवा गुप्त पोलीस ह्यांहून निराळा असणेच शक्य नाही. पण मी म्हणतो आहे ते मात्र परंपरानिष्ट आचारी! म्हणजे राजापूरच्या पंच्यांपैकी निम्मी खरेदी ज्या मंडळीच्यांत व्हायची, किंवा दोन भुवयांमध्ये शेंदूर लावल्याखेरीज ज्यांनी हातात झारा धरला नाही, अगर नुसते पाटाला पाट लावून ज्यांना दुपारची झोप काढता येत असे ते! त्यांतला एखादा-अधिक परंपरानिष्ठ पोळीवरच हात चालवीत असे असे नाही. अधूनमधून मृदंगासाठीही कणकेचा गोळा थापणारा असायचा. माझ्या नाकात आजतागायत असलेल्या वासाची परंपरा ह्या आचाऱ्यांनी सांभाळली. काही संगीत घराण्यांना साफ पातळ आवाजाऐवजी घोगराच आवाज मंजूर आहे, त्याप्रमाणे चुलखंडाचा सतत शेक आणि गांज्याची चिलीम ह्या दुहेरी भट्टीतून तयार झालेला एक विशिष्ट आवाज ह्यांचेही ह्या आचाऱ्यांना देणे असे. मेंबराने 'पोळीऽऽ' असा पुकारा केल्याबरोबर त्याच्या षड्‌जाचा तार पंचम गाठून 'आलीऽऽ' असा संवादी जबाब फेकणारा आचारी! सार्वजनिक नळावर 'जय जय गंगे भागीरथी' असे मुक्तकंठाने ओरडून आंघोळ करणारा तुस्त बल्लव! हे ह्या परंपरेचे पाईक.

त्यांनी हे वासांचे नवे विश्व निर्माण केले. पोळीवरचा तुपाचा वास आणि भातावरचा तुपाचा वास ह्यांतला फरक देसी आणि बरवा रागाइतका सूक्ष्म आहे. नुसता वासच कशाला? दुसऱ्याच्या पोळीवर तूप ओढण्याची त्याची लकब आणि भाताच्या मुदीवर तुपाची सही करण्याचा त्याचा ढंग आता पाहू जाता सापडणार नाही. लसणाचे तिखट आहे की तिखटाची लसूण आहे हे कळू न देता वाटलेली चटणी, बदलत्या भावाबरोबर कांदा-बटाट्याच्या रस्स्यात बदलणारे कांद्याचे आणि बटाट्यांचे प्रमाण, कोशिंबिरीत काय चिरून टाकले आहे हे अगम्य ठेवण्याची करामत आणि वाटीतल्या डाळपाण्याचे ते विशिष्टाद्वैत ही ह्या परंपरेची खास वैशिष्ट्ये होती. पात्रांची सिद्धता झाल्यानंतर नाटकात सूत्रधाराची एंट्री आणि खाणावळीतल्या गर्भगृहातून हातात मीठ-चटण्यांचे पंचपाळे घेऊन येणारा आचारी हे दोघेही महामुनी भरताचेच शिष्य! रससिद्धी हाच दोहींकडला मात्र! सूत्रधाराच्या पहिल्या वाक्यावर नाटकाचे भवितव्य असे; पात्रधर बल्लवाच्या मुद्रेवरून भोजनाचा रंग सराईत डोळ्यांना ओळखणे अवघड नसे! तरबेज

गायक गुलदस्तातील चीज गायला सुरवात करताना चेहऱ्यावर एक मिष्किल भाव आणतात—श्रोता अपरिचित रागाचा तोंडवळा न ओळखता आल्यामुळे गोंधळात पडतो. त्याचप्रमाणे चाकवत आहे, पालक आहे, अळू आहे, मेथी आहे की चवळी आहे, याचा पत्ता लागू न देता केलेली पातळभाजी वाढताना आद्य पांडोबांच्या चेहऱ्यावर जो भाव आला असेल तोच अंत्य पांडोबांच्या! त्या चालण्यामध्ये एक 'नमवी पद्दा भूमि हा चालतांना'चा धैर्यधरी डौल असे आणि चेहऱ्यावर असा काही तजेला असे की मेंबराने त्याच्या चेहऱ्याकडे पाहून ओळखावे की आज केळ्याचे रायते हे लसणीच्या तिखटाशेजारी नांदणार आहे. तसे काहीच विशेष नसले तर "बाईसाहेब, तांईसाहेबांच्या आंघोळीचं पाणी काढलं आहे" म्हणणाऱ्या निरोप्याचा तिऱ्हाईतपणा त्या एंट्रीत असायचा. पानावर मीठचटणी नुसती उधळली जायची. नेहमीची "कसं काय अण्णा? गुरु मार्गी होतोय...." वगैरे सलगी नसायची. पण हे सारे ज्यांना 'त्या' खाणावळीत जेवायचे भाग्य लाभले आहे त्यांनाच ठाऊक! एरवी हे उमगायचे नाहीं. आयुष्यात जो एकदाही मेंबर म्हणून जगला नाही त्याला हे उमगणे अवघड आहे. मी जरी ह्या गल्लीतल्या माझ्या वासमयी खाणावळीचा मेंबर झालो नाही तरी त्या परंपरेतल्या खाणावळीत चार घास खाल्ले आहेत. ती खाणावळ म्हणजे साक्षात खाणावळ होती; ते बोर्डिंग नव्हते—आरोग्यभुवन तर नव्हतेच नव्हते! स्वच्छ दोन वेळेला जेवायला घालणारी खाणावळ! त्या बिचारीची ह्याहून अधिक अपेक्षा नव्हती. जिथले 'पांडोबा' पाकपटुतेतली कसर वाक्पटुतेने भरून काढीत, असली खाणावळ! बंडोपंतांनी "सार्सापरिला आणा" म्हटले की ते आमटी मागताहेत हे ज्यांना कळत असे, "थोडं मलम लावा" म्हटल्याक्षणी जे ताटाला चटणी लावीत, अशा वाढप्यांची खाणावळ! ज्यांना नुसत्या पाण्यातून ताक करता येत असे, वांग्यांच्या डेखांचे जे भरीत करीत, असल्या बल्लवांची ती कर्मभूमी! जिथे भाजीत पडवळापासून झुरळापर्यंत कुणालाही आडकाठी नव्हती आणि जिथल्या भाताचे तांदूळ सोबत जन्मभूमीतली माती घेऊन यायचे, जिथल्या बटाट्यांच्या भज्यांत बटाट्याच्या पारदर्शक चकत्या असायच्या आणि श्रीखंडाला आरारुटाची लकाकी आलेली असायची त्या खाणावळी!

मी शोधतो आहे तो तो वास! त्या वासाच्या ओढीने मला खाणावळीची आठवण येते. अन्नाला पूर्णब्रह्म म्हटले आहे. ज्या कुण्या ऋषीने हे म्हटले तो वेदकालीन खाणावळीचा मेंबर असला पाहिजे. खाणावळीतल्या अन्नाने ज्याला ब्रह्म आठवले नाही असा मेंबर विरळा!

बाहेर फक्त 'खाणावळ' असा सरळ बोर्ड असायचा, फार तर 'निमकराची खाणावळ' किंवा ज्या कोणाची असेल त्याचे नाव असायचे. दीड पुरुष उंचीचे बोर्ड टांगून त्याच्यावर आपले मेंबर आज काय खाणार आहेत याची स्वस्त जाहिरात त्या खाणावळीतल्या खानदानाला मंजूर नव्हती. किंबहुना आपल्या ताटात आता काय वाढून ठेवले जाणार आहे याची उत्कंठा लावणे हा एक किंचित अध्यात्माचे अंग असलेला हेतूही ठेवला जात होता. सराईत नाकेच तेवढी डोळ्यांपुढे त्या भरल्या ताटाचे स्वरूप आणू शकत. जाहिरात करण्याचे कार्य 'वास' करीत असे. भिंतीवर 'ग्लासात हात धुवू नये' अगर 'आज रोख उद्या उधार' असल्या उर्मट सूचना कधीही नसत. मालकांकडे केवळ पैसेवसुलीचे काम नसे. वेळीप्रसंगी हातात ओगराळे घेऊन ते जातीने मेंबरांच्या ताटावर वरण ओतीत, अगर कात्रिलध्याच्या दांडीने थाळ्यातून भात उकरीत. त्यांचा वेष आणि वाढप्यांचा वेष यात काहीच फरक नसे. एवढेच नव्हे तर वाढप्यांच्या आणि त्यांच्या पंच्याच्या घट्ट खोचणाबाहेर ओसंडणाऱ्या पोटात असलाच तर काही इंचांचाच फरक असायचा. उघड्या छातीने सारी मंडळी वाढायला सरसावत असत. उंचनीच तिथे काही नव्हते. केवळ असल्या खानदानी खाणावळीतून वापरण्यासाठी म्हणून खांद्यावरची सोवणी करणारी एकच कापड गिरणी असावी. कारण नेसूच्या पंचांच्या आणि पुसूच्या सोधण्यांच्या रंगाची एक ढगाळ रंगसंगती असायची. तो रंग चुलीच्या धुराशी, पातेल्याच्या बुडाच्या रंगाशी, किंवा खरपूस भाजलेल्या पोळीच्यादेखील रंगाशी एक विशिष्ट संगती साधून जात असे. काळ्यामिचकूट रंगापासून ते फिकट काळ्यापर्यंत त्यात कृष्णवर्णाच्या असंख्य छटा मिसळलेल्या असायच्या. यामुळे पोळी, भात, ताक, आमटी, कोशिंबिरी, भाज्या, पातळभाज्या, चटण्या आणि खरकटी ताटे इतक्या सगळ्यांच्या वासाशी हे काळ्या रंगाचे गडद नि फिकट आविष्कार एक जणू काय 'सिंफनी'

किंवा स्वरसंगती जमवून जायचे! खानदानी खाणावळीचे व्यक्तिमत्त्व उठून येत असे ह्या रंग-गंधांच्या संमिश्रणातून! जोडीला बल्लवाचे वाचिवीर्य!

व्यावसायिकांत बोलण्याच्या चातुर्याविषयी नापित प्रसिद्ध आहेत. एखाद्याच्या कानाशी लागायची संधी इतर कुणालाही मिळत नाही हे खरे. परंतु खूप बोलणे म्हणजे चतुर बोलणे नव्हे! खरे वाक्पाटव ह्या खानदानी खाणावळीत सापडायचे! भाजीत झुरळ सापडल्याच्या तक्रारीला स्वतःची मिशी अजिबात न फेंदारता, "बंडोपंत, मंथली ट्वेंटीटू रुपीजमध्ये एलिफंट का यायचा भाजीत?" हे जगप्रसिद्ध उत्तर देणारा खाणावळवाला आता दिसणार नाही. वांग्याच्या भरितात डेख सापडले म्हणून संतापलेल्या मेंबराला "डेखाचे भरीत ही आमची पेशालिटी आहे" म्हणून गार करणारा 'पांडोबा' आता कुठे दिसायचा? परवा आगगाडीतल्या जेवणाच्या डब्यात जेवताना अशाच स्वरूपाची तक्रार केल्यावर गार्डासारखा पोशाख करणाऱ्या वाढप्याने पुढे तक्रारबुक आणून "तुम्हांला काय म्हणायचेय ते त्यात लेखी नोंदवा" असे सांगितले, तेव्हा मला जेवतानाच्या तोंडी तक्रारीची तोंडीच वासलात लावणाऱ्या जुन्या वाढप्याची आठवण झाली आणि गळा दाटून आला!

ही सारी मंडळी गेली कुठे? त्यांच्या बाबतीतल्या माझ्या अनेक इच्छा राहिल्या आहेत. एका 'पांडोबां'च्या खाणावळीत मी अनेक वर्षे जेवलो, पण पांडोबांना जेवताना मला पाहायचे होते. ते कधी जेवत होते कोण जाणे. मी खाणावळीत निरनिराळ्या वेळी जाऊन पाहिले; परंतु पांडोबा वाढताना तरी दिसायचे किंवा चक्क जमिनीला पाठ लावून घोरताना आढळायचे! एकदा मी त्यांना पाणी पिताना पाहिले होते. दुपारची वेळ होती. आमची पंगत शेवटली. पाचसात मेंबर जेवत होतो. शेवटल्या पंक्तीला आधीची बटाट्याची भाजी संपली म्हणून स्पेशल कांद्याची भजी वाढण्यात आली होती. आम्ही अवेळी जेवणाऱ्या लोकांच्या यादीतील मेंबर होतो. त्यामुळे त्या पंक्तीला अधिक घरगुती स्वरूप होते. सकाळी नऊपासून एक-दीड वाजेपर्यंत पंगती उठत होत्या. पांडोबा वाढत होते. आम्ही पांडोबांनाही जेवून घेण्याचा खूप आग्रह केला; त्यांनी तो ऐकला नाही. आमच्या, केवळ खाणावळीतच ज्यांना रंग येतो अशा गप्पा चालल्या होत्या. पांडोबा आमच्या ताटांकडे नजर ठेवून

दाराशी उभे होते. अंगातून घामाच्या धारा चालल्या होत्या. त्यांनी फक्त कोपऱ्यातला तांब्या उचलला आणि घटघट घटघट करीत ते पाणी प्याले! पहाटे पाच वाजल्यापासून चुलखंडाच्या त्या भट्टीपुढे कणीक बडवीत, पोळ्या लाटीत, भाजी चिरीत, भात उकरीत, आणि प्रचंड पातेली चढवीतउतरवीत जगणाऱ्या पांडोबांच्या परिश्रमांची सारी कथा त्यांनी त्या घटघट घटघट अशा आवाजात सांगितली.

"काय पांडोबा, आताशा मूड ठीक दिसत नाही." आमच्यापैकी एका साहित्यिक मेंबराने विचारले.

"मूड बेष्ट आहे!"

"थापा मारू नका!—काही तरी इचकलंय!"

"अहो, कसलं काय इचकलंय?—बडीशेप घ्या."

"बडीशेप घेतो पांडोबा—पण हल्ली पूर्वीसारखी तब्रियत लावत नाही तुम्ही! मटरचा सीझन सुरू झाला, अजून उसळ झडली नाही पांडोबा!—हे एरवी होणं नाही. चिंता दिसतेय कसली तरी!"

"हं, आहे थोडी! मुलाचं पत्र आलंय."

"अच्छा! मुलगा आहे का तुम्हांला? फॅमिली कुठं कोकणात का?"

"नाही हो, फ्यामिली केव्हाच गेली! माधव अडीच वर्षांचा होता. त्याला करून घालता घालता तर पोळ्या बडवायला शिकलो. तिथून जे उलथनं हाताला चिकटलं ते आजतागायत आहे. परीक्षा आली आहे त्याची—दीडशे रुपये भरायचीय फी."

"दीडशे रुपये?"

"हो; एलेल्बीला बसतोय—"

"म्हणता काय?"

"हो, पुढल्या वर्षी वकील होईल!"

"अरे, मग भेटला नाही इथं आम्हांला कधी!"

"त्याला नाही आम्ही इथं बोलावीत. अहो, इथं त्याला काय दाखवायचं—बापाला वांगी चिरताना?"

"पांडोबा, ईश चिंता निवारील साऽऽरी. उद्या शिकवणीचे पैसे येतील आमचे—फिफ्टी पर्सेंट घेऊन टाका! ह्या महिन्याला घरमालकांना बसवतो

आलापी करीत. भाडं नेक्स्ट मंथला देऊ...." खाणावळीचे आजीव आणि आकंठ मेंबर चांदेबुवा म्हणाले.

"बघा जमलं तर....आणि अण्णाभाऊ, तुम्हीही बघा...."

खाणावळीच्या त्या वासामागला हा करुण जिव्हाळा उफाळून आला!

मी शोधतोय तो तो वास आणि त्या खाणावळी! असली ती खाणावळ कुठे दिसते का हो?

११

## महाभारतकालीन वर्तमानपत्रे

*(शांडिल्य विद्वत्तासत्राच्या यंदाच्या विद्वत्तासत्रात डॉ० राघो आप्पाजी तुंदिलवार यांनी वाचलेल्या विद्वत्ताप्रचुर प्रबंधातील काही भाग. डॉ० तुंदिलवार यांचा प्राचीन वाङ्मयाचा गाढा व्यासंग सुपरिचित आहे. नुकतेच ते तिबेटातील तट्टे आणि भीमथडीची तट्टे ह्या आपल्या आश्विक संशोधनाच्या कार्यासाठी मेक्सिको-ब्राझील इत्यादी देशांतील दौरा आटोपून आले आहेत. लौकरच ते अतिशयव्येच्या दौऱ्यावर जात आहेत.)*

विद्वज्जन पंडितोपंडित सकल सज्जनहो,

शांडिल्य विद्वत्तासत्रात मला आपण चार शब्द सांगण्यासाठी पाचारण केले ह्याबद्दल मी आपला ऋणी आहे. गेले कित्येक दिवस प्रकृती ठीक नव्हती. आमच्या तिबेटातील तट्टे आणि भीमथडीची तट्टे ह्या विषयाचे संशोधन करीत असताना आम्ही तिबेटातील एका तट्टाच्या खुराचे माप घेत होतो आणि तट्टूधर्माला अनुसरून त्या अश्वशावकाने लाथ झाडली— कानाजवळ जखम झाली. मागे भीमथडीच्या तट्टाने असाच प्रयोग केला होता. त्याही तट्टाने अशीच परंतु नाकावर लाथ झाडली होती. परंतु भीमथडीच्या

तट्टापेक्षा तिबेटी तट्टाचा खूर अधिक बलिष्ठ असतो, असा स्वानुभव आला आणि त्यातून खुरांच्या लांबीरुंदीवर लाथेचा जोर नसतो हा प्रत्यय आला. वास्तविक हा मुद्दा आमच्या दृष्टीतून सुटत होता. त्यामुळे प्रबंधात घोडचूक राहिली असती. ती राहणार नाही याचा आनंद लाथेने झालेल्या वेदनेपेक्षा शतपटीने अधिक होता. संशोधनकार्यात हा आनंद किती विविध स्वरूपात येतो हे दर्शविण्यासाठी प्रस्तुत अनुभवाचे निवेदन केले. अनपेक्षित अशा काही गोष्टी सापडतात आणि महाभारतकालीन वर्तमानपत्रे हा एक असाच अचानक सापडलेला ठेवा आहे.

मोहेंजोदडो आणि हडप्पाप्रमाणे नुकत्याच दडप्पा येथे केलेल्या उत्खननात भूर्जपत्रांवर लिहिलेल्या महाभारतकालीन वर्तमानपत्रांच्या फायलीच्या फायली सापडल्या आणि त्या काळावर आता नवीनच प्रकाश पडत आहे. आज उपलब्ध असलेले महाभारत हे त्या दैनिकावरून संपादित केलेले आहे हे ह्या अंकाची काही पाने चाळल्यावर लगेच ध्यानात येते. विशेष म्हणजे अनेक भाषांतून हे दैनिक निघत असावे, कारण आमच्या हाती लागलेल्या भूर्जपत्रांच्या गठ्ठयात दैनिक महाभारत या संस्कृत दैनिकाची (संपादक : व्यास, मुद्रक : गणपती शंकरन्) शुद्ध मराठीतील 'दंडकारण्य' आवृत्ती पाहावयास मिळाली, त्यामुळे मराठी भाषा आणि महाभारत ह्या दोहोंवरही नवा प्रकाश पडतो. अगस्ती उपनावाचे कोणी गृहस्थ (हे ऋषी असावेत. परंतु संपूर्ण संशोधनाची आवश्यकता आहे!) ह्या 'दंडकारण्य' एडिशनचे संपादक होते.

मूळ संस्कृत दैनिक महाभारत हे हस्तिनापुराहून निघत असे आणि मराठी 'दंडकारण्य' एडिशन प्रतिष्ठाण नावाच्या नगरातून काढण्यात येत असे. त्या काळी वाहनांची सोय नसताना अगर टेलिप्रिंटर किंवा तारायंत्रे नसताना हस्तिनापुरी प्रसिद्ध होणाऱ्या ह्या पत्राची इतर प्रांतांतील आवृत्ती लगेच कशी निघत असेल ह्याचे आश्चर्य वाटेल; परंतु टेलिप्रिंटर अगर तारायंत्राचे काम हे अंतर्ज्ञानी ऋषी करीत असत. किंबहुना त्यावेळी हल्ली नभोवाणीवर क्रिकेटच्या खेळाचा धावता वृत्तांत देण्यात येतो, त्याप्रमाणे युद्धाचेही धावते वृत्त देणारे तज्ज्ञ वार्ताहर होते. त्यांत संजयनामक युद्धस्थ वार्ता सांगणारा अतिप्रसिद्ध वार्ताहर होऊन गेला. महाभारत पत्राच्या 'दंडकारण्य'

एडिशनमधील आवश्यकता विज्ञापनस्तंभातील (आधुनिक आंग्ल परिभाषेत त्यास 'वॉंटेड'चा कॉलम म्हणतात) खालील मजकूर ऐका :

**आवश्यकता** : प्रतिष्ठाण येथून निघणाऱ्या साप्ताहिक 'दंडकारण्य' पत्रासाठी काही उपअंतर्ज्ञानी नियुक्त करणे आहेत. केवळ शांडिल्यगोत्रोत्पन्नांनी विनंतीपत्रके धाडावी. वत्सगोत्र्यांचाही विचार केला जाईल.

**पात्रता** :

१. कमीत कमी एक सहस्र वर्षे वायुभक्षण करून तप केल्याचे विश्वामित्र-अंतर्ज्ञान-विद्यापीठाचे प्रशस्तिपत्र. अगस्ति-विद्यापीठाला अजून मान्यता मिळाली नाही.

२. जटांची गुंडाळून उंची तीन हस्त; सोडवून तेरा हस्त.

३. एका पायावर उभे राहून तपाचरण केलेल्या ऋषीस विशेष प्राधान्य देण्यात येईल.

४. तपोभंग झालेल्या ऋषींच्या विनंतिपत्रकांचा विचार केला जाणार नाही.

**वेतन** : मासिक वेतन पाच गाई, एक बैलजोडी. इच्छुकीचा काळ एक संवत्सर. प्रतिसंवत्सरी अर्ध्या गाईची वेतनवृद्धी— म्हणजे दोन संवत्सरांत एक एक गाय वाढेल. पंचवीस गाईंची अत्यधिक मर्यादा आहे.

भेटा अगर लिहा : संपादक 'दंडकारण्य', पुरातन गजशाला, प्रतिष्ठाण (दक्षिण दंडकारण्य).

पंडितहो, तत्कालीन वर्तमानपत्रांचे केवळ जाहिरातींचे रकाने पाहिले असता महाभारतकालीन समाजपरिस्थितीचे चित्र आपल्या ज्ञानचक्षूंपुढे उभे राहील. काही भाग वाचून दाखविण्याचा मोह मला अनावर होत आहे. उदाहरणार्थ, हा मजकूर पाहा :

**स्वयंवर** : पंचावतीची राजकन्या सुकर्णा हिचे स्वयंवर पंचावती नगरीत आश्विन वद्य पौर्णिमेला होणार आहे. 'श्वान-पुच्छ' सरळ करून दाखविणाऱ्या राजपुत्राच्या गळ्यात राजकन्या वरमाला घालील. पांचांहून अधिक राण्या असलेल्या

राजपुत्रांना स्वयंवरात भाग घेता येणार नाही. परंतु राजपुत्रास येण्याजाण्याचा खर्च मिळेल. भोजनव्यवस्था राजवाड्यात विनामूल्य होईल. एकाहून अधिक राजपुत्रांनी श्वानपुच्छ सरळ केल्यास आयत्या वेळी दुसरा 'पण' लावण्यात येईल.

राजकन्या सुवर्णा ही तेरा विद्या व एकसष्ट कलांत प्रवीण असून उरलेली एक विद्या आणि तीन कलांचा अभ्यास ख्यातनाम गुरूंच्या नेतृत्वाखाली चालू आहे.

स्वयंवराचे नियम पंचावती विवाह विधिमंडळाने नियुक्त केल्याप्रमाणे असतील. पांडव विवाहनियम पंचावतीचे राज्यात लागू नाहीत, हे मुद्दाम निदर्शनास आणण्यात येत आहे. इच्छुक राजपुत्रांनी विनंतीपत्रकाबरोबर विवाहशुल्क म्हणून बत्तीस रत्नांची एकेक रत्नमाला रत्नमंजूषेवर 'स्वयंवर-विभाग, सचिवालय, पंचावती' (धाकटी पाती) असे लिहून पाठवावी. शेवटचा दिनांक भाद्रपद अमावास्या. त्यानंतर आलेल्या विनंतीपत्रकांचा विचार केला जाणार नाही.

—आज्ञेवरून
कार्यवाह, स्वयंवर-विभाग

किंवा—

**नावे नोंदवा : विविधलोकभ्रमणयात्रा सुखसंचारक मं०**

गेल्या वर्षीप्रमाणे यंदाही आमच्या यात्रा मंडळीतर्फे वैश्विक सुखसंचारासाठी यात्रा निघत आहे. इंद्रपुरी, चंद्रलोक, पाताळदर्शन, नंदनवन वगैरे ग्रहांतर करून हस्तिनापूर येथे भारतीय युद्ध पाहण्याची व्यवस्था आहे. कर्णार्जुनयुद्धाचा प्रसंग लवकर येत आहे. त्या सुमारास यात्रा हस्तिनापुरी येईल. इंद्रलोकी मेनका व उर्वशी यांचा विशेष नृत्याचा कार्यक्रम होईल. धाडसी व उत्साही यात्रिकांस यमपुरीही दाखविण्याची व्यवस्था होत आहे. ठिक-ठिकाणी रथ-अश्व-गजादी वाहनांची भरपूर सोय. गेल्या वर्षी पांडव राज्ञी द्रौपदी यांनी आपल्या इंद्रजाल स्थालीतून सर्व यात्रिकांस

भोजन दिले होते. यंदाही ती व्यवस्था होत आहे. त्याचप्रमाणे युद्धातून अवसर मिळाल्यास धर्मराजांचे शांतिमय जीवनावर प्रवचन, अर्जुन व भीम यांचे अनुक्रमे धनुर्विद्या व गदायुद्धाचे प्रयोग, नकुल व सहदेव यांचे अश्वविद्येचे खेळ व घटोत्कचाचे भानामतीचे प्रयोग घडवून आणीत आहो. शकुनिमामा व युधिष्ठिर-महाराज यांचा आंतरभारती द्यूतस्पर्धेतील अंत्य सामना पाहण्याची संधीही मिळेल. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची स्वतंत्र रथांत व्यवस्था. यात्रेत दोन अंतर्ज्ञानी ऋषि सकाळी, दुपारी व रात्री वैश्विक वार्ता सांगतील. फक्त एक सहस्र यात्रिकांची सोय आहे. गतवर्षी यात्रिकांस जयद्रथवध पाहण्याची संधी मिळाली. यंदा असाच एखादा प्रसंग पाहावयास मिळेल. त्वरा करा. लिहा, अथवा भेटा—**शार्ङ्गदेव,** चालक, विविधलोकभ्रमण यात्रा, सुखसंचारक मंडळी, भैरवाच्या देवळाजवळ, प्रतिष्ठाण, दक्षिण दंडकारण्य.

अशा छोट्या जाहिरातींखेरीज अर्धभूर्ज अगर पूर्णभूर्ज आकाराच्या देखील जाहिराती तत्कालीन वर्तमानपत्रांत आढळतात. उदाहरणार्थ, 'अगस्तिविजय' ह्या पुण्यपत्तनातून निघणाऱ्या भूर्जपत्रांतील हे विज्ञापन पाहा :

***अल्प वास्तव्य ! अल्प वास्तव्य !***

**इंद्रशासित अमरावतीची**
**नृत्याप्सरा**
**उर्वशी**
**हिच्या नृत्यगायनाचा**
**राष्ट्रीय समारोह**

सोबत चित्रसेन गंधर्व आणि मंडळी.
अलौकिक सौंदर्य ! स्वर्गीय संगीत !! ऐंद्रीय नृत्य !!!
स्थळ : द्वापंचदशखंडमंदिर, धान्याळी, पुण्यपत्तन.
प्रवेशशुल्क : सुवर्णासन : पंचवीस सुवर्णमुद्रा.
भूम्यासन : पाच लोहमुद्रा
ऋषिमुनी व ब्राह्मण यांस निम्मा दर.
समय : फाल्गुन पौर्णिमा.

*प्रवेशपत्रिका संपत आल्या ! त्वरा करा !*

पृथ्वीवरील आपले भ्रमण आटपून उर्वशीदेवी व अन्य अप्सरा लवकरच चंद्रलोकावर जात आहेत. ताफ्यातील चोवीस अप्सरांपैकी बावीस जणींना तपोभंग-कटिपट्टिकेचा बहुमान मिळाला आहे. (ही कटिपट्टिका पृथ्वीतलावरील ऋषींचा तपोभंग करणाऱ्या अप्सरेस मिळत असे.)

सर्व जाहिराती वाचून दाखविण्याचे हे स्थळ नव्हे. परंतु तत्कालीन 'प्रतिष्ठाणवार्ता' नामक दैनिक भूर्जपत्रातील मद्यासंबंधीचा मजकूर मनोरंजक वाटेल.

**हूण देशाहून जलमार्गे आलेले शालिमद्य**

सध्या हूण देशातून 'शालिमद्य' नावाच्या मद्यप्रकाराचे सहस्रावधी कुंभ जलमार्गे द्वारकानगरीत आल्याची वार्ता आमचे द्वारकेतील विशेष वार्ताहर कळवितात. गतवर्षी ताम्रमुखांच्या देशातून आलेल्या 'श्वेताश्व' अगर 'कृष्णश्वेत' मद्याची सर जरी ह्या मद्यास नसली तरी उष्णतापरिहारास हे मद्य उत्तम, असे निघंटूत लिहिले आहे असे एका यादवाने सांगितल्याचेही कळते. यासंबंधी यदुवंशातील एक प्रसिद्ध मुष्टियोद्धा अर्कराज यादव याच्याशी संभाषण करताना प्रस्तुत मद्यात हिमखंडाचे चूर्ण टाकल्याने त्याचा लत्ताप्रयोग (ही मद्यशास्त्रातील अनुभवी मंडळीच्या प्रत्ययाची गोष्ट आहे) अधिक चांगला होतो असे समजले. परंतु सहदेव यादव या गोकुळातील ख्यातनाम दुग्धव्यावसायिकाच्या दृष्टीने शुद्ध भारतीय सोमाची अगर शांभवीची सर ह्या ताम्रमुखांच्या देशातून येणाऱ्या कोणत्याही मद्याला नाही. यज्ञयागात अशा भ्रष्ट यावनी मद्याचा उपयोग क्वचित करण्यात आल्याबद्दलची हळहळही प्रभासतीर्थातील एक सुविख्यात सोमयाजी करतात, असेही हा वार्ताहर म्हणतो.

आधुनिक वर्तमानपत्राप्रमाणे ह्या प्राचीन भूर्जपत्रांचा एक स्तंभ क्रीडाविभागासाठी राखून ठेवण्यात येत असे. हल्ली शील्ड्स वगैरे असतात

त्याप्रमाणे त्या काळी द्रोण-कवच, भीष्म-करंडक, बलराम ढाल वगैरे विख्यात स्पर्धा होत असत. इतकेच काय, परंतु आजकालच्या मथळ्यांप्रमाणे आकर्षक मथळे देण्याचीही कला ह्या प्राचीन पत्रकारांनी हस्तगत केली होती.

**मथुरा पंचक्रोशीत दुग्धयोजना**
**गोकुळात प्रचंड दुग्धपुरवठा-केंद्र**
**श्रीकृष्ण यादव यांनी जातीने लक्ष घातले !**

अशांसारखे मथळे मजकुराचा चटकन अंदाज देतात. आग, चोऱ्या, दरोडे यांचेही वृत्त अशाच प्रक्षोभकारक मथळ्यांखाली देण्यात येत असे. हा मजकूर पाहा.

**पांडववधाचा भयंकर कट**
**भीषण आग—प्रचंड प्राणहानी टळली...**

असे मथळे देऊन लाक्षागृहाच्या आगीचे रोमहर्षक वर्णन केलेल्या भूर्जपत्राचा अंक आज उपलब्ध आहे हे आपले अहोभाग्य नव्हे का ?

पांडवपक्षाच्या 'सत्यविजय' भूर्जपत्राच्या अंकात लाक्षागृहास लावलेल्या आगीचे वृत्त येणेप्रमाणे छापले आहे.

> **वारणावत :** काल रात्री तिसऱ्या प्रहराचे सुमारास 'आग' 'आग' अशा भीषण आरोळ्या पांडवांच्या वाड्याकडून उठल्या. वारणावतातील सारे नागरिक मदतीसाठी वाड्याच्या दिशेने धावत सुटले. वारणावत नगरपालिकेचे अग्निभक्षक-जलयंत्र मात्र शेवटपर्यंत आले नाही. पहाटेच्या सुमारास आग विझली. एक स्त्रीचे आणि पाच पुरुषांची प्रेते हाती लागली. बहुधा ही स्त्री म्हणजे कुंती व ते पाच पांडव असावेत, अशी राजपुरुषांनी आशंका व्यक्त केली.
>
> ह्या आगीमागे काही राजकारण असावे असा संशय व्यक्त करण्यात येत आहे. कारण वरून बलिष्ठ दिसणारा हा प्रासाद एखाद्या कर्पूरराशीसारखा अति तीव्र वेगाने जळत होता. विशेषतः एवढ्या प्रचंड आगीनंतर राजपुरुषांचा थंडपणा पाहून ही आग मुद्दाम तर लावण्यात आली नसेल ना, असा संशय व्यक्त करण्यात येत आहे.

कौरवपक्षाच्या साप्ताहिक 'दंडधारी' ह्या भूर्जपत्रकाने 'सत्यविजय'च्या खोडसाळपणाचा निषेध करून सरकारपक्षाची तळी उचलली आहे. दंडधारीचा अग्रलेख पाहण्यासारखा आहे.

'सत्यविजय की असत्यविजय!' असे शीर्षक देऊन 'दंडधारी'कार म्हणतात :

> वारणावताच्या आगीने सर्वांसच महान दुःख झाले. परंतु सत्तारूढ कौरव पक्षावर या ना त्या कारणाने टीकेचे शस्त्र उगारणारे 'सत्यविजय'कार ह्यांना या आगीमागेही राजकारण दिसते आहे, हा दोष सत्तारूढ पक्षाचा नसून त्यांच्या दोषैकदृष्टीचा आहे हे त्यांनी ध्यानात घ्यावे. प्रस्तुत प्रासाद आगीच्या भक्ष्यस्थानी पडल्याचे वृत्त ऐकून दुर्योधनमहाराज, दुःशासनमहाराज, शकुनिमामा गांधारकर वगैरे मंडळी शोकसागरात बुडून गेली असता, त्यांच्यावर त्यांच्या अतिप्रिय अशा पांडवांच्या निधनाचे दुःख कोसळले असता, असल्या घटनेतून आपली राजकीय शंखपुंक करणे 'सत्यविजय'कारांना शोभले नाही.
>
> आज पांडवांचा पक्ष सत्तारूढ नसल्यामुळे त्यांचे पक्षपाती कौरवपक्षावर प्रत्येक प्रसंगी शिंतोडे उडविण्याचा जो अश्लाघ्य प्रयत्न करतात तो आम्हांस खचित निषेधार्ह वाटतो. असल्या भूर्जपत्रकारांविरुद्ध सत्तारूढ पक्षाने वैध उपाययोजना केली पाहिजे असे आम्हांस वाटते.

ह्या अग्रलेखाचा तावडतोब परिणाम होऊन 'सत्यविजय' पत्राकडून शकुनिमामा गांधारकर यांनी पाच हजार सुवर्णमुद्रांचा जामीन मागितला. 'सत्यविजय'कारांनी आपला शेवटचा अंक काढताना म्हटले :

> नमस्ते वाचकगण,
>
> 'सत्यविजया'चा आजचा शेवटचा अंक. कौरवपक्षाच्या अनीतिमय वागणुकीला तोंड फोडण्याचा आमच्या भूर्जपत्राने आजवर प्रयत्न केला. वारणावताच्या आगीवरील मजकूर हे केवळ तात्कालिक कारण आहे. आजवर आम्ही सत्याचा पक्ष धरला. पांडवांचा पक्ष हा सत्याचा पक्ष आहे असा आमचा

विश्वास आहे. परंतु हस्तिनापुरी आज कणिकनीतीचा अवलंब चालू आहे. त्या दंभयुक्त नीतीचा आम्ही वारंवार समाचार घेतला आहे. त्याविषयी अधिक काय लिहावे ? परंतु परवाची आग ही कौरवपक्षाने पांडवांना जाळण्यासाठी लावली ह्यासंबंधीचा पुरावा आमच्या हाती आला आहे. दुष्टमती पुरोचन सध्या मंत्रिपदावर विराजमान झाले आहेत. त्यांना मिळणारे नवेनवे मानसन्मान कशाचे द्योतक आहेत हे आम्ही जाणतो. ह्या प्रासाद बांधण्यासाठी दशसहस्र सुवर्णमुद्रांचा कापूर, आणि लाख व राळ ही कशासाठी लागली ह्याचे पुरोचनमहाराज स्पष्टीकरण करतील का ? आमचे एवढेच मागणे आहे की प्रस्तुत प्रासादाला लागलेल्या आगीची निःपक्षपातीपणाने विचारणा व्हावी.

मित्रहो, राजकारण हा तर दैनिकांचा जीवनरस—जणू काय प्राणवायूच. राजकारणावाचून वर्तमानपत्र म्हणजे उपनेत्रहीन विद्वान म्हणावयास हरकत नाही. त्यातून युद्धासारखी घटना म्हणजे वृत्तपत्रांना च्यवनप्राशासारखी जोम चढविणारी. कौरवपांडवांच्या युद्धाच्या वार्ता तत्कालीन दैनिक आणि साप्ताहिक भूर्जपत्रांत अत्यंत आकर्षक रीतीने प्रसिद्ध केल्या गेल्या आहेत. कृष्णशिष्टाईचा सुरुवातीचाच प्रसंग ऐका :

**सुई अग्र माती नकार**
**दुर्योधन कौरव स्पष्टोक्ती**
**श्रीकृष्ण यादव शिष्टमंडळ पराजित**

**हस्तिनापूर** (आमच्या विशेष वार्ताहराकडून) :

आज दिवसाच्या द्वितीय प्रहरी येथील राजराजेश्वर धृतराष्ट्रमहाराजांच्या राजभवनात पुन्हा एकदा पांडवांच्या पक्षाकडून आलेल्या श्रीकृष्ण यादवांनी वाटाघाटी सुरू केल्या. प्रथम राजभवनात जावयाचा वार्ताहरांना प्रतिबंध होता. काही भूर्जपत्रांचे वार्ताहर धृतराष्ट्रमहाराजांची नजर चुकवून आत घुसले होते, त्यांना राजदूतांनी बाहेर काढले. शेवटी पत्रकार मंडळाने कौरव-सल्लागार समितीचे अध्यक्ष मामा शकुनी गांधारकर यांची भेट घेऊन

अपक्ष भूमिकेवरून वृत्त प्रसिद्ध करण्याचे आश्वासन दिल्यावर भूर्जपत्रकारांस राजमंदिरात प्रवेश मिळाला. राजगृहात सर्वत्र कडक पाहरा होता. श्रीकृष्ण यादव आत शिरताना बाहेर पौरजनांनी त्यांचा जयजयकार केला तेव्हा कौरव-राजदूतांनी काहीजणांना हस्तिनापूर प्रतिबंधक विधीच्या अष्टोत्तराव्या निर्बंधान्वये बंदिशाळेत टाकले.

सभेची सुरुवात अत्यंत गंभीर वातावरणात झाली. प्रारंभी धृतराष्ट्रमहाराजांनी भारतीय ऐक्य आणि शांती यावर अत्यंत हृदयद्रावक प्रवचन दिले.

## माझे शंभर पंडूचे पाच पुत्र

"माझे शंभर आणि पंडूचे पाच पुत्र हे मला निराळे नाहीत. आमच्याच अंगाखांद्यावर ही मुले वाढली. माझ्या डोळ्यांदेखत यांचे शिक्षण झाले. आज दैवयोगाने कौरव-पांडवांच्यामध्ये वितुष्ट निर्माण झाले आहे. ('अहो दुर्भाग्य! हाय हाय!' असे दुःखोद्गार सभेतून निघाले.) हे भारतीय ऐक्याला विघातक आहे. पांडवांनी केवळ राज्यलोभाचा स्वार्थी विचार सोडावा. राज्य कौरवांनी केले काय, पांडवांनी केले काय, अर्थ एकच! पांडव पाचच आहेत, शिवाय त्यांची आर्थिक परिस्थितीही चांगली नाही. अशा परिस्थितीत हस्तिनापुराचे राज्य त्यांना चालवायला देणे देशहिताच्या दृष्टीने योग्य होणार नाही. आपण सारीच परमेश्वराची लेकरे आहोत. शेवटी सारे काही इथेच सोडून आपल्याला त्याच्या चरणी विलीन व्हायचे आहे. निष्कारण स्वार्थाच्या आहारी जाण्यात काय अर्थ आहे? पांडव हुषार आहेत. धर्मराजासारखा पंडित त्यांच्यात आहे. अर्जुनाला नृत्यकला उत्तम येते. त्यांनी वास्तविक साहित्यसंगीताचा प्रसार करून देशाच्या सांस्कृतिक विकासाला हातभार लावावा. भीमसेनाला विधायक कार्यात पाठवायला मी तयार आहे. त्याच्यातली हिंसात्मक प्रवृत्ती त्याने सोडली पाहिजे. नकुल-सहदेवांना

पशुसंवर्धनकेंद्रावर वरिष्ठ अधिकाराच्या जागा देण्याची माझी इच्छा आहे. तात्पर्य, युद्धाचा विचार सोडून आपण देशहिताच्या कार्याला लागले पाहिजे."

### आचार्य अश्वत्थामा वनवाससुख श्रेष्ठ पीठपाणी दूध

त्यानंतर आचार्य अश्वत्थामा यांचे विश्वशांतीचे महत्त्व पटविणारे भाषण झाले. आचार्यांनी पांडवांच्या मागणीचा विचार करताना स्वतःच्या बालपणाच्या दारिद्र्याचा उल्लेख केला. ते म्हणाले,

"दारिद्र्याखेरीज परमेश्वराची ओळख पटत नाही. पांडवांना दारिद्र्य भोगावे लागत आहे हे दुर्दैव नसून मी सुदैवच समजतो. निसर्गाच्या निर्मळ सहवासात राहण्याचे सौख्य राजमंदिरात नाही. सत्तेचा लोभ अनिष्ट आहे. मनःशांती हीच शांती. सुख मानण्यावर आहे. बालपणी मला पिठाचे पाणी दूध म्हणून प्यावे लागे. त्याची गोडी राजमंदिरात आम्हांला सांप्रत मिळणाऱ्या आटीव दुधाहून शतपट अधिक होती. भोगातून शांती लाभत नाही, त्यागातून लाभते. पांडवांना राज्य मिळण्यापासून जे सुख होईल त्याहून त्या राज्यावर पाणी सोडण्यापासून अधिक होईल."

### तुम्ही त्यागा कौरव राजमंदिर—भीम उद्गार

ह्यावर शिष्टमंडळातील एक सदस्य श्री भीमसेन पांडव हे "तुम्ही राजमंदिर त्यागून अरण्यात का जात नाही!" असे आचार्यांना उद्देशून ओरडले. पांडवपक्षातील मंडळीतून हास्याचे कल्लोळ उठले. धृतराष्ट्रमहाराजांचे चौसष्ठावे पुत्र दुर्लोभकुमार यांनी श्री भीमसेन पांडव यांजवर शस्त्र उगारले तर त्यांचा हात दुसरे एक सदस्य सहदेव पांडव यांनी धरला.

### सभेत गोंधळ, क्षमा मागा घोषणा

ह्याच वेळी कौरवाधिपती दुर्योधन यांनी धृतराष्ट्रमहाराजांपुढे स्थिरस्थावर बिंदू (या शब्दांचा अर्थ पॉइंट ऑफ ऑर्डर हा असावा)

उपस्थित करून आचार्यांच्या अपमानाबद्दल भीमसेन पांडव यांनी क्षमा मागावी अशी मागणी केली. धृतराष्ट्रमहाराजांनी ती मागणी फेटाळली. तेव्हा कौरव सभासदांनी सभात्यागाची धमकी दिली. शेवटी शिष्टमंडळाचे अध्यक्ष श्रीकृष्ण यादव यांनी आचार्य अश्वत्थामा यांची क्षमा मागितली. तेवढ्यात राजदूतांनी पाकशाळेत फलाहाराची सिद्धता झाल्याचा संदेश आणला तेव्हा समस्त आचार्य घाईघाईने फलाहारासाठी निघून गेले.

### शिष्टमंडळ नेते श्रीकृष्ण यादव निवेदन

यानंतर शिष्टमंडळाचे अध्यक्ष श्रीकृष्ण यादव यांनी पांडवांची बाजू मांडण्याचा प्रयत्न केला. त्यांचे भाषण चालू असताना कौरवपक्षाने अनेकवेळा धिक्काराच्या गर्जना केल्या. श्रीकृष्ण यादव म्हणाले, "पांडव काही दुसऱ्या कोणाचे राज्य मागत नाहीत. त्यांचे राज्य त्यांना द्या. त्यांना न्याय हवा आहे. तुमच्याशी युद्ध करावयाची त्यांची इच्छा नाही. धर्मराज आणि त्यांचे बंधू हे आपल्याशी वाटेल त्या तडजोडीला तयार आहेत."

### सुई अग्र माती नकार—दुर्योधन उद्गार

श्रीकृष्ण यादवांच्या ह्या वाक्यावर कौरवेश्वर दुर्योधनमहाराज यांनी, "तुम्हांला सुईच्या अग्रावर मावेल इतकी मातीही मिळणार नाही." असे तेजस्वी उद्गार काढले. आणि कौरवसभेने टाळ्या वाजवून ह्या विधानाचे सहर्ष स्वागत केले.

### कृष्णशिष्टाई फसली उद्गार

सभेत व प्रेक्षकांच्या स्थानावरून 'कृष्णशिष्टाई फसली' अशी कुजबुज ऐकू येत होती. यासंबंधी कौरवपक्षाच्या प्रवक्त्यांशी बोलताना ते म्हणाले, की पांडवांनी श्री यादव यांना शिष्टमंडळाचे अध्यक्ष निवडण्यात घोडचूक केली. श्री यादव यांचे बालपण एका खेड्यातील गौळवाड्यात गेले असून कुस्त्या, मुष्टियुद्ध यांसारख्या गोष्टींतच त्यांनी त्यावेळी अधिक लक्ष घातले

होते. मथुरानगरीत इतर गवळ्यांच्या मदतीने घातपाताच्या चळवळीकडे त्यांनी तारुण्य वेचले. मथुरेचे दिवंगत अधिराजे कंस यांच्या खुनाशीही त्यांचा संबंध होता असे त्या प्रवक्त्याने उद्गार काढले. बऱ्यापैकी मुरली वाजविणे याहून अधिक फारसे येत नसलेल्या व सांदीपनीच्या आश्रमात मोळ्या वाहण्याहून जास्त शिक्षण न घेतलेल्या ह्या गृहस्थांची नियुक्ती एवढ्या महत्त्वाच्या जागी कशी काय करण्यात आली, याविषयी सर्वत्रच आश्चर्य व्यक्त करण्यात येत आहे. या बाबतीत कौरवपक्षाकडील एक सैन्याधिकारी व श्री यादव यांचे जवळचे नातलग श्री शिशुपाल यांच्याशी बोलताना श्री श्रीकृष्ण यादव हे पांडवांचे मानलेले मेहुणे असल्यामुळे आतला वशिला लागला असल्याचे त्यांनी सांगितले.

## कौरव धोरण प्रशंसा

हस्तिनापुरात सर्वत्र कौरवांच्या धोरणाची प्रशंसा करण्यात येत आहे. श्रीकृष्ण यादव यांनी कौरवेश्वर दुर्योधनमहाराजांशी खाजगी वाटाघाटी केल्याचे समजते. विशेषतः युद्ध झाल्यास आपली साहाय्य करण्याची तयारी असल्याचेही बोलून दाखविल्याचे कळते.

## यादव सैन्य कौरव साह्य

आज आलेल्या वार्तेवरून कौरवेश्वर दुर्योधन श्रीकृष्ण यादव यांस भेटण्यासाठी गेल्याचे कळते. त्याच वेळी पांडवपक्षातील एक अग्रणी अर्जुन पांडव हेही तेथे होते. श्रीकृष्ण यादव यांनी कौरवांस यादव सैन्याचे साह्य देण्याचे आश्वासन देऊन अर्जुन पांडव यांच्या रथाचे सारथ्य करण्याचे मान्य केले आहे, असे आमचे अंतर्ज्ञानी वार्ताहर ऋषी कळवितात.

## युद्धसाधने मूल्यवाढ

भावी युद्धामुळे हत्ती, घोडे, रथ, खड्गे इत्यादींचे भाव भयंकर

वाढत आहेत. हस्तिनापुराजवळ रथांचे प्रचंड उत्पादनकेंद्र उघडण्यात आले असून त्याचा उद्घाटनसमारंभ आज प्रातःकाळी कौरवपक्षातील प्रमुख पुढारी आचार्य कृपाचार्य यांच्या हस्ते झाला. त्यांनी रथाला जीवनाची उपमा देऊन नंतर जीवनाला रथाची उपमा दिली. शेवटी विश्वशांती स्थापन करणे कसे महत्त्वाचे आहे हे सांगून रथोत्पादनकेंद्राला आपला आशीर्वाद दिला. प्रतिदिनी पंचवीस रथ तयार करण्याची योजना आहे.•

मित्रहो, भारतीय युद्धाची दैनंदिन हकीकत ह्या प्राचीन भूर्जपत्रांवरून प्रत्यक्षच वाचण्यासारखी आहे. आम्ही लवकरच संकलित स्वरूपात हे वाङ्मय प्रसिद्ध करीत आहो.

ह्या भूर्जपत्रांनी जनमनाची चांगलीच पकड घेतली होती हे तत्कालीन वाचकांच्या पत्रव्यवहारावरून सिद्ध होते. काही पत्रे ऐका—

संपादकमहाशय,

माझा पुत्र गंपूदेव हा कृष्णातीरी केतकवनातील जंबूक ऋषींच्या आश्रमात शिकण्यासाठी पाठविला आहे. प्रस्तुत आश्रमात शिक्षणापेक्षाही छात्रांकडून घरगुती कामेच फार करून घेत असल्याची वदंता कानी आली आहे. पांच वर्षे झाली तरी अजून त्यास पुरुषसूक्तही धड पाठ म्हणता येत नाही. शिक्षणाची जर अशी आबाळ होऊ लागली तर भावी पिढीचे कसे होणार? यासंबंधी आश्रमाचे चालक स्पष्टीकरण करतील काय?

आपला

चंडदेव भाकमणी

वरील पत्रावरून तत्कालीन पालकांना आपल्या मुलांच्या शिक्षणाची किती जबर आस्था होती हे ध्यानात येते. आधुनिक पालकांनी बोध घेण्यासारखा आहे. ह्याच संदर्भात दुसरेही एक पत्र आहे, त्यात एका पालकाने गुरुजन वारंवार मृगाजिने, दर्भासने, पोथ्या विद्यार्थ्यांना विकत घ्यावयास लावतात आणि हे आश्रम म्हणजे 'ज्ञानाची आपणिके' आहेत अशी तक्रार केली आहे.

भारतीय युद्धात श्रीकृष्णांनी अर्जुनास गीताबोध केल्याचा उल्लेख आहे.

'दंडकारण्य' पत्राचा हस्तिनापूर येथील प्रतिनिधी आणि कौरवांचा अधिकृत वार्ताहर संजय याने क्रमशः गीतेचे अठराही अध्याय 'दंडकारण्य' पत्रातून प्रसिद्ध केलेले त्या भूर्जपत्रांवर वाचावयास मिळतात. 'ग्रंथसमालोचन' या सदरात प्रतिष्ठाणचे तत्कालीन विद्वान टीकाकार वामदेव धवलगिरी यांनी गीतेवर विस्तृत टीका लिहून त्या ग्रंथावर कडाक्याचा हल्ला चढविला आहे.

ते म्हणतात :

"प्रस्तुत ग्रंथात आम्हांस नवीन असे काहीच आढळले नाही. मुख्यतः सारी श्लोकरचना अनुष्टुभ छंदातच असल्यामुळे तोचतोपणा आला आहे. बऱ्याच ठिकाणी श्लोक पातळ झाले आहेत, घनता मुळीच नाही. आशय, अभिव्यक्ती अगर आकृतिबंध यात सलग असा आगळेपणा नाही. विश्वरूपदर्शनाचा प्रसंग नाटकी झाला आहे. ठिकठिकाणी आत्मनिष्ठतेचा दुर्गुण डोकावतो आहे. "मलाच शरण जा" अगर "मीच सर्वत्र आहे" अशांसारखे उद्गार कलादृष्ट्या विघातक वाटतात. अर्जुनाच्या स्वभावाचे चित्रीकरण योग्य वठले नाही. काव्य तर अगदीच जुनाट धर्तीचे आहे. दुर्बोधता कुठेच नाही. त्यामुळे आश्रमवासी छात्रांना पाठांतराला श्लोक म्हणून ठीक आहेत. अक्षरवाङ्मयात या ग्रंथाला कदापी स्थान मिळणार नाही. सुरुवातीला नाट्यमयतेचा पातळ, मऊ आणि तलम असा झिरझिरीत पडदा आहे. परंतु पुढे सर्वत्र सपकपणा आला आहे. वैचारिक प्रक्रिया परस्परांना छेद देऊन जातात. कुठे अहिंसेचा जयजयकार तर कुठे युद्धाचा पाठपुरावा अशी परस्परविरोधी वचने आहेत. अर्जुनाची भूमिका जरी अगदीच निर्धन असली, त्या भूमिकेचे कोपरे जरी सुटले नसले, आंतरिक अभिव्यक्तीला त्यात जरी आधार नसला, तरी काही ठिकाणी भूमिकेचा गुंता हळुवार रीतीने उकलण्याचा श्रीकृष्ण यादव यांनी स्तुत्य प्रयत्न केला आहे. मात्र एकूण श्री यादव यांची प्रतिभा थिटीच वाटते. सुरवातीचा धृतराष्ट्राचा प्रश्न मात्र ग्रंथाबद्दल खूप अपेक्षा निर्माण करतो आणि पुढेपुढे ग्रंथ विरविरीत होतो. श्लोकरचना

भुसभुशीत आहे व विचारही पिसपिशीत वाटतात. परंतु प्रस्तुत ग्रंथाने संस्कृत वाङ्मयात बऱ्यापैकी भर पडावी."

मित्रहो, तत्कालीन टीकाकार किती निर्भय होते याचे हे द्योतक आहे. वास्तविक या भूर्जपत्रांवरून आपल्या संस्कृतीवर निराळाच प्रकाश पडेल. यासंबंधी आमचे अधिक संशोधन चालू आहे.

आपण माझ्या ह्या अल्प प्रयत्नाचे दिग्दर्शन आणि पत्रवाङ्मयाचे आलोडन करण्याची संधी मला दिली याबद्दल आपले आभार मानतो. महाभारताची अल्प सेवा हीच भारताची सेवा. हीच साऱ्या मानवतेची सेवा. शेवटी मागणे हेच की—सेवा करावया लावा देवा हा योग्य चाकरू!

*(यानंतर शांडिल्य विद्वत्ता समाजाच्या चिटणिसांनी दुसऱ्या दिवशी डॉ. तुंदिलवार यांचे 'खेचर आणि गोचर' हे पारलौकिक आणि ऐहिक सुखाची साधना या विषयावरील भाषण जाहीर केल्यावर दुग्धपान झाले व सभा संपली.)*

# १२

## माझी कु० संपादकीय कारकीर्द




*(दाक्षिण हिंदुस्थानातील सर्वात लोकप्रिय व जास्त खपणारे मासिक)*

फारा वर्षापूर्वीची गोष्ट आहे. बागडेवाडीला कै० श्रीमंत सौ० कनकाम्मा भरमाप्पा कुंचिकुरकुंडहळ्ळीकर इनामदार हायस्कूलमध्ये सहावी 'क'मध्ये मी शिकत होतो. हल्ली सहावीला दहावी म्हणतात. आणखी काही वर्षांनी विसावीदेखील म्हणतील. म्हणू देत बापडे ! त्या वेळी मी एक 'उदयाचल' नावाचे हस्तलिखित मासिक काढले होते. काळाच्या प्रवाहात जिथे भास,

भवभूती किंवा बागडेवाडीचे आत्मारामभागीरथीज[1] ह्यांच्यासारखी थोर माणसे वाहून गेली, त्यांचे वाङ्मयही गेले, तिथे माझ्या 'उदयाचल'ची काय कथा! पण 'प्रत्येक कुत्र्याचा एक-एक दिवस असतो' असे एक आंग्ल कवी[2] म्हणतो, त्याप्रमाणे इतके दिवस उपेक्षेच्या भीषण अंधारात पडून राहिलेले ते हस्तलिखित आज वाचकांपुढे ठेवीत आहे. 'उदयाचल' पहिल्या अंकानंतर काही अपरिहार्य कारणामुळे बंद पडले. अर्थात अबला ज्याप्रमाणे नेहमी गर्तेतच पडायची त्याप्रमाणे कारणही नेहमी 'अपरिहार्य'च असायचे. हे अपरिहार्य नावाचे कारण मासिकापासून ते नाटकापर्यंत काहीही बंद पाडू शकते. माझ्या जुन्या पेटीतून हे मासिक काढताना मला भडभडून आले होते. माझ्या कुमारवयातील हे माझे पहिले[3] अपत्य! कृपा करून त्याचे कौतुक करा. कारण तेच माझे पहिले व शेंडेफळ आहे.

**ध्येयवाक्य : जो तोषवी स्वजनकास सुपुत्र तोच**[4]
**संपादक** : कुमार मोरेश्वर भिकाजी कोरडे.
**कार्यकारि संपादक** : के० मोरेश्वर.
**उपसंपादक** : मि० एम० बी० कोरडे, एक्स्वायर.
**सहसंपादक** : बी० मोरिया[5].
**सजावट** : स्टूडियो एम० बी० के०

---

१. "हास गे गंगू", "रुस्तुमची विजार" ह्या ग्रंथांचे कर्ते; बागडेवाडीचे रहिवासी. ते बागडी नदीत पोहताना वाहून गेले.
२. हा आंग्ल कवी खूप काही काही म्हणत असे आमच्या लहानपणी. हल्ली त्याचे नावही आत्मारामभागीरथीजांसारखे वाहून गेलेले दिसते.
३. ह्या वाक्यात काही तरी घोटाळा झाला आहे असे मला वाटते. वाचकांनी फार विचार करू नये.
४. हे ध्येय प्रस्तुत लेखकास बापजन्मी पुरे करता आले नाही. जनकाने सदैव प्रस्तुत लेखकाचा उल्लेख 'दिवटा' असा केला व जननीने 'खायला काळ' ही जराशी मोठी पदवी दिली.
५. आमच्या बालपणी ई० बिलिमोरिया नावाचा फाइन ॲक्टर होता. तो तिसऱ्या मजल्यावरुन जमिनीवर हातात हिरॉइन व तलवार धरून उडी मारी, पण शिवाय जमिनीवरूनदेखील तिसऱ्या मजल्यावर हा सगळा ऐवज घेऊन उडी मारीत असे.

मुद्रक : श्री मोरूभाऊ कोरडे.
प्रकाशक : के० बी० बागडेवाडीकर.

*पत्रव्यवहाराचा पत्ता :*

संपादक 'उदयाचल', C/o कु० मो० मि० कोरडे, सहावी 'क', कै० श्री० सौ० क० म० कुं० इ० हायस्कूल, पांडोबा रेवडीवाल्याच्या जगप्रसिद्ध रेवडी मार्टसमोर, जांवड आळी, मु० व पो० बागडेवाडी.

**सूचना :** पत्रव्यवहार कृपा करून घरच्या पत्त्यावर पाठवू नये. कारण, प्रस्तुत उपक्रमास काही ठिकाणांहून विरोध आहे.




प्रिय वाचक,

'उदयाचल' हा येणार येणार म्हणून त्रिखंडांत[६] गाजलेल्या हस्तलिखिताचा अंक आजच्या दिवाळीच्या सुमुहूर्तावर आपल्या भेटीस येत आहे.

दिवाळी हा अतिशय आनंदाचा सण आहे. एका सुप्रसिद्ध आंग्लकवीने 'दिवाळी दिवाळी आ....आ....आ....आ....आ....आ आली'[७] म्हटलेच

---

६. "सहावी 'क' म्हणजे त्रीखंड काय रे मोऱ्या!"—निळू चौगुल्याचे हे बोल तापलेल्या सळीसारखे माझ्या कर्णभूषणात अजून रुळत आहेत.

७. "इतक्या वेळा आ म्हणायला हा आंग्ल कवी तोतरा होता काय रे मोरया?" —विनू साठ्याची कुत्सित टीका. हा टीकाकार मॅट्रिकला दोनदा नापास झाला. ईश्वराचे दरबारी न्याय आहे. अर्थात मी एकदाच नापास झालो. परंतु ते कारण 'अपरिहार्य' होते.

आहे. माझे प्रिय वाचक लाडू, चिवडा, करंज्या वगैरेचा फन्ना उडवण्यात दंग असतील. त्यांना ह्या हस्तलिखित मलिद्याचा उपयोग होईल.[८]

हा अंक तयार करताना संपादकमंडळाला फारच परिश्रम पडले. रात्रीच्या रात्री जागवून काढाव्या लागल्या. जुन्या पिढीचा छळ सोसावा लागला. पण आम्ही—हें बाण धरिलें करिं हें सर्वांचें असे असल्यामुळे आम्ही भ्यालो नाही. आजच्या तरुण पिढीला उन्नतीच्या व उत्कर्षाच्या मार्गावर नेणे हे आमचे ध्येय आहे. आजची तरुण पिढी व विशेषतः सहावी 'क' कर्तव्य-पराङ्मुख झाली आहे.

आम्ही हे मासिक काढणार म्हटल्यावर कळवण्यास अत्यंत खेद होतो की, आमच्या प्रिय वर्गबंधूंनी आमची निंदाप्रहारांनी चेष्टा केली. विशेषतः त्यांत वर्गभगिनी असाव्या हे आम्हांला दुःख आहे. पण आमच्या डोळ्यांपुढे कै० आगरकरांचे उदाहरण होते. पाचव्या यत्तेचा दीर्घ व्यासंग करताना आम्ही गोपाळरावजींचा धडा वाचला होता. शिवाय आमची स्फूर्तिदेवता आमच्या मागे भवानीमातेसारखी उभी होती. आणि मुख्य म्हणजे आमचे पूज्य ड्रॉइंगमास्तर कुळकर्णी एल्केसर आमच्या पाठीशी उभे होते. त्यांनी आम्हांला प्रोत्साहन दिले. खरे म्हणजे ह्या अंकाचे मुखपृष्ठ स्वतः एल० के० सरांच्या दिव्य कुंचल्यातून तयार होणार होते. परंतु आयत्या वेळी त्यांच्या आंगठ्यास नखुरडे नावाची दुर्धर व्याधी झाली. ईश्वर त्यांच्या आंगठ्यास सद्गती देवो.

कै० आगरकर, भवानीमाता आणि एल० के० सर यांचा आधार असल्यावर आम्हांस कळिकाळाची भीती नाही. आमच्या प्रिय उदयाचलाशी कॉंपिटिशन म्हणून आमचे एक वर्गबंधू, ज्यांच्या तीन अक्षरी आडनावातील पहिले अक्षर 'ढ' आहे व शेवटले 'ळे' आहे, ते 'अरुणाचल' नावाचे हस्तलिखित काढणार असल्याचे कळले. त्यांना आम्ही संपूर्ण यश चिंतितो. 'एकाने गाय मारली म्हणून दुसऱ्याने बैल मारू नये' असे एक फ्रेंच लेखक म्हणतो. अरुणाचलच काय आणखी कितीही 'चल' आले तरी उदयाचल अचल आहे.[९]

---

८. "चिवडा बांधायला."—तोच तो विनू साठे.

९. हे फाइन वाक्य एल्केसरांनी घातले होते.

आपल्या देशातील साहित्याची परंपरा उज्ज्वल आहे. गौतम बुद्ध, शिवाजीमहाराज व ब्रह्मीभूत बागडेवाडीचे गुंडामहाराज[१०] ह्यांच्यासारखे थोर लोक व सत्पुरुष आपल्या भारतात झाले. प्रस्तुत संपादक ह्या इसमांच्या मानाने म्हणजे वडाच्या झाडापुढे आळवाच्या जुडीएवढा आहे याची जाणीव नम्र आहे. परंतु आमच्या परमपूज्य मराठीच्या डोळके सरांनी म्हटल्याप्रमाणे 'तानाजी सिंहगड चढला म्हणून इतर कोणी शिडीवरदेखील चढू नये का!' डोळके सर हे नेहमी हास्यास्पद रीतीने मराठी शिकवून वर्गांत खूप हशा पिकवतात. त्यांच्या मार्गदर्शनामुळे आम्ही आज ही आमच्या मायबोलीची अल्प सेवा करीत आहो.

गंगानदी उगमापाशी ज्याप्रमाणे लहान असते त्याप्रमाणे हा अंक लहान आहे. परंतु हळूहळू तो मोठा होईल. अंकाची कीर्ती पसरत आहे. गावोगावच्या एजंटांच्या मागण्या आहेत. 'प्रथम वर्गाची सेवा व मग एजंटांची' असे आम्ही त्यांना तानाजीप्रमाणे तेजस्वी उत्तर दिले आहे. तरी अंक वाचताना फाडू नये. कोपरे दुमडू नयेत. लेखावर शेरे मारू नयेत. शेऱ्यांसाठी शेवटले पान आहे. तिथे वाटेल ते खुश्शाल लिहावे. संपादकमंडळ डगमगणार नाही.

शेवटी ज्या जगनिय्यंत्याच्या कृपेने हे वाङ्मयरूपी फळ आले त्याला व ब्र० भू० गुंडामहाराजांना वंदन करून प्रिय वाचकहो, उदयाचल मी आपणांस अर्पण करतो. गिऱ्हाइकांचा संतोष हेच आमचे समाधान.

कुमार मोरेश्वर भिकाजी कोरडे,
संपादक, सहावी 'क'

## गुरुजनांचे आशिर्वाद

**चि० ल० मार्कंडेशास्त्री** : संस्कृतचे सर, साहित्यालंकारभूषण. फोर्थ बीचे क्लासटीचर. सुलभ सुभाषितमंजूषा (किं० २ आणे) ह्या ग्रंथाचे लेखक. यांचा संस्कृत आशिर्वाद.

*शुभंभवतु ! कोरडेकुलोत्पन्नभिकाजी सूनुनामोरेश्वरेण तथा षष्ठवर्गे 'क' तुकड्यायाम पठितेन एतन्हस्तलिखितम् संपादितम् । अहो आश्चर्यम् । बालादपि*

१०. हे मंत्राने गाळगुंडे बरी करीत असत व पाण्यावर चालत.

*सुभाषितम् श्राध्यम् । साधु साधु । अस्मिन् मासिकपत्रिकायाम् कतिपयानि कुसुमाणि । किंतु संस्कृत कुसुमाणि किमर्थं नास्ति । अलम् अति विस्तरेण । यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । चिरंजीव मस्तुमा सिकपत्रिका ।*

*मार्कंडेकुलोत्पन्नचिंतामणिशर्मणालिखितम्*

*अस्मदाशीर्वचनम् ।*

*ॐ शांतिः शांतिः शांतिः"*

**मि० एम० टी० दप्तरदार** : इंटर आर्ट्स, एस० टी० सी०, बागडेवाडीतील इंग्लिशचे ॲथॉरिटी व फिफ्थ बीचे क्लासटीचर व सिक्स्थ 'क'चे इंग्लिशचे सर.

मास्टर मोरेश्वर बी० कोरडे याने सुरू केलेला हा उपक्रम स्तुत्य आहे, अनुकरणीय आहे आणि उपयुक्त आहे. एवढ्या बालवयातील त्यांच्या प्रतिमेची उंची (height) पाहून मला मेकॉले ह्या सुप्रसिद्ध आंग्ल लेखकाची आठवण येते. अशा प्रकारच्या मासिकाची इंग्लिशमध्ये ज्याला नेसेसिटी म्हणतात किंवा आपण मला वाटते आवश्यकता आहे म्हणतो ती आहे. मराठी वाङ्मयाशी माझा फारसा परिचय नाही त्यामुळे ह्यातील आर्टिकल्सविषयी माझे मत (opinion) देणे योग्य नाही. पण मोठ्या लोकांनाही ह्यात वाचण्यासारखे खूप आहे. कारण वर्डस्वर्थने म्हटलेच आहे, चाइल्ड इज द फादर ऑफ मॅन म्हणजे बापाचा मुलगा हा एका अर्थी माणसाच्या मुलाचा बापच असतो. मास्टर मोरेश्वर बी० कोरडे याचे एडिटिंग चांगले (good) आहे. त्याचा भविष्यकाल चकचकित (bright) आहे. लाँग लिव्ह उदयाचल—किंवा उदयाचल लांब जगो. मराठीत लिहिण्याची मला सवय नाही. पण मास्टर कोरडे एम० बी० यांच्या आग्रहामुळे मी हे लिहिले आहे.

एम० टी० दप्तरदार

आय० ए०, एस० टी० सी०

**गु० शिट्टुबुवा गुरगुटे** : संगीत-विशारद, गायनमास्तर[12], म्यूझिक

---

११. हे मी संपादकीय अधिकारात घातले होते.

१२. बुवांच्या किडकिडीतपणाला उद्देशून त्यांना गायनमास्तर थाऐवजी गा० मा० म्हणणे वर्गबंधूंना शोभत नाही. बंधूंचे डोळे केव्हा उघडणार?

डायरेक्टर, संगीत कार्तिकस्वामी (स्त्रीपात्रविरहित नाटक—शिवरात्रीच्या उत्सवात चिटू भांगले यांनी बसविलेले).

चि० मोरेश्वर भिकाजी कोरडे या आमच्या शिष्याने काढलेल्या मासिकाला आमचा आशीर्वाद आहे. वास्तविक आम्ही काय आशिर्वाद देणार? जे काही आहे ते आमच्या बुवांचे आहे. पंडित बजरंगबुवांसारखे गुरू लाभले म्हणून हे दिवस दिसताहेत. चि० मोरेश्वर याला आम्ही संगीताचे शिक्षण दिले. फुटण्यापूर्वी त्याचा आवाज बरा होता. मेहनत केली असती तर नाव काढले असते. आता मासिक काढले आहे. चांगले चालवले पाहिजे. त्यालाही मेहनत हवी. जोखीम आहे. उद्या कदाचित मासिक बंदही पडेल, पण हरकत नाही. शिमगा गेला तरी कवित्व राहावे त्याप्रमाणे मासिकाचे कार्य राहील. चि० मोरेश्वर यास आयुरारोग्य लाभो अशी प्रभुचरणी प्रार्थना आहे.

शिदुबुवा गुरगुटे
गा० मा०

प्रस्तुत मासिकाला आमचे परमपूज्य हेडसर पुं० गो० गुळवेलकर यांचाही आशीर्वाद आहे. परंतु स्थळकाळाचा विचार करून संकोचास्तव नाइलाज आहे. गु० गुळवेलकर सर संपादकमंडळाला क्षमा करतील अशी आशा आहे.[१३] याखेरीज इतर अभिप्राय शेवटल्या पानावर वाचावयास मिळतीलच.

## चिनी भाषेतील काही म्हणी

संग्राहक : हरी बाळाजी टिपरे ऊर्फ बाळाजीसुत (सहावी 'क')

(१) चिंग पुंग ढुंब पांग फिंग ली

अर्थ : झुरळाने मिशा फेंदारल्या म्हणून वाघ होणार नाही.

---

१३. गुळवेलकर सरांचा आशीर्वाद असा होता :

'उदयाचल पाहिले. पुढच्या वर्षी कोरडे एम० बी० ह्या विद्यार्थ्याला मॅट्रिकच्या पिंजऱ्यातून बाहेर सुखरूप पडायचे असेल तर असल्या गोष्टीत त्याने वेळ घालवू नये. मॅट्रिकनंतर हे धंदे करायला खूप वेळ आहे.'

गुळवेलकर सर हेडसरअसल्यामुळे संपादकीयात त्यांची हजेरी घेतली नाही. परंतु सहावी 'क' मधील आमचे प्रिय वर्गबंधू त्यांना 'चिकट गूळ' ह्या नावाने ओळखतात. प्रिय वर्गबंधूच्या मताशी संपादक सहमत आहे. कोणी कोणाला उगीचच नावे ठेवत नाही.

(२) बिंगली लींग लूं बा ल्या

अर्थ : पाहुणे मोजून बेडूक कापावे.

(३) हो हँग ही ची डी चू प

अर्थ : सत्ताधीशांपुढे होला हो म्हणून गपचूप बसावे.

(४) महा लुंग टांग चि मिन्ह पी लीं पे किंग

अर्थ : मुलांचे पाय पाळण्यात दिसतात, पण मुलींचे पाय कधीच पाळण्यात दिसत नाहीत. (कारण चीनमधे ते लहानपणीच बांधतात.)

(५) माव शि टुंग म्यांव हॉंग कॉंग क्याव मिशी

अर्थ : माय मरो व मावशीही मरो, फक्त आत्या जगो.
(चिनी भाषेत आत्याला मिशी म्हणतात.)

(६) चाउ चाउ चाप सुय फू यॉंग

अर्थ : ज्याची खावी पोळी त्याचीच वापरावी थाळी.
(पुढील अंकी "काही जपानी म्हणी")




वसंतऋतूत कोकिळांचा आवाज फुटल्याखेरीज कसा राहील ! उदयाचल सुरू होणार म्हटल्याबरोबर आमच्या वर्गातील कविबंधूंचा व कविभगिनींचा मधुर गुंजारव सुरू झाला.

## " मुरलीचा गुंजारव "

कवियत्री : कु० चंपा खुरखुंडे (सहावी 'क')

चाल : जाके मधुरा

ही धन्य अहा मुरली ।।
गोकुळ भरलें अमृतनादें
गाईवासरें गाती । अहाहा । बागडती
ऐकुन हरिची गोड धोड धोड ।। ध्रु० ।।
बाळ यशोदा नंदलाल हा
चारित धेनू वाजवितो पावा
मोरपीस कटिवरी अहाहा
आणि घोंगडिच कृष्ण कन्हया ।। ध्रु० ।।
राधाबाला भोळी आली
यमुना तीरीं दिसे बासरी
त्रिभुवनि घुमले मंजुळ स्वकरी
खचितचि गमतें नंदनवन हें ।। ध्रु० ।।

## ।। धन्य देश अमुचा ।।

कवी : कु० जगन्नाथ झांबरे, सातवी 'ब'

*(चाल : जन पळभर म्हणतील हाय हाय)*

धन्य देश अमुचा ।
इथे हिमालय तिथे सातपुडा
विंध्याद्रि वरि खालीं निलगिरि
गंगायमुना वरी शोभती
गोदावरी अन् कृष्णा दिसती
बघुनी मन धालें
साफल्य दृष्टिचें झालें ।। धन्य देश अमुचा

प्रतापराणा आणि शिवाजी
तो रणगाजी अन् तो बाजी
मुरारबाजी तो तानाजी
तुझ्या यशाचे पवाड गाती
तोफांचे बुडबुडे
हाय परी स्वातंत्र्य मावळे
शिवप्रभूचे कुठे मावळे ?[१४]
परदेशांतुन आज कावळे
नको करूं फुंफाट
खुपस आपली चोच ॥
गर्जू हरहर महादेव हो
एकलिंगजी की जयजय हो
एकमुखाने गनिमावर हो
अन् वज्रांचे छातीवरती
घ्या झेलून प्रहार ॥ धन्य देश आमुचा ॥

**अंक वापरण्याची सूचना :**

१. एक आणा देऊन कार्यालयातून तीन दिवसांसाठी अंक वाचावयास न्यावा.

२. अंक नेणारास दोन आणे डिपॉझिट भरावे लागेल. अंक परत न केल्यास डिपॉझिट जप्त होईल व हेडसरांकडे तक्रार केली जाईल.

३. अंकातील मजकूर व चित्रे कापून घेण्यास सक्त मनाई आहे.

४. कार्यालय मधल्या सुट्टीत उघडे राहील. रविवार व सुट्टीच्या दिवशी कार्यालय बंद राहील.

के० मोरेश्वर
कार्यकारी संपादक
'सिक्स्थ के'.

---

१४. मावळे याचे दोन अर्थ. एक मावळतो असा व दुसरा मावळे असा. कवि ज० ह्मां०

## केवढा हा दुष्टपणा

कवी : डी० उत्तमकुमार (सहावी 'क')

*भूमिका : वर्गातल्या एका विद्यार्थिनीचा काहीही*
*अपराध नसताना एका 'क्ष' सरांनी*
*तिला छडी मारली. त्यावेळच्या क*
*वीच्या अंतःकरणातल्या भावना*
*ह्या कवितेत ओतण्याचा नम्रप्र*
*यत्न वाचकांनी गो*
*ड मानून घ्या वा*
*ही विनं*
*ती.*

क्षणोक्षणिं पडे उठे परि बळें रडे बापडी
म्हणे न चुकलें असे सर नका उगारूं छडी ॥
किती भरभरा लिहीत बसलें इथें मी कशी
उगीच मज बोलतां कुटुवचें करा चौकशी

चाल बदलून—मुली असती शाळेंतल्या चटोर
एकमेकींना बोलती कठोर
काय बाई तें खरें धरायाचें
गुरुब्रह्मांनी असें करायाचें

चाल बदलून—दउत जवळिं नाहीं मी लिहूं पाठ कैशी
जिवलग कुणि देई ना मला लेखणीशीं
अचपळ मन माझें मैत्रिणी वैरिणी त्या
उगिच खिदळती कीं जेंविं सावत्र माता

चाल बदलून—इतुकें बोलुनि थकली सुकली मुकली गरीब बाला ती
हाला तिचिया वर्णूं कैसा उत्तमकुमार अल्पमती

**खाशी जिरली !**

**तो** : प्रिये, तू चंद्रासारखी सुंदर आहेस.

**ती** : जा. मी तुमच्याशी बोलणारच नाही.

**तो** : कां ? तू चंद्रापेक्षा सुंदर आहेस !

**ती** : मग चंद्राशीच लग्न करा. तुमच्यासारख्यांना चंद्रा मोलकरीणच बरी.

कुमारी बकुळा बर्वे (सहावी 'क')




पहाटेची सुप्रभात होती. पक्षी आपल्या मंजुळ स्वरात कोकिलकूजन करीत होते. सर्वत्र आनंदीआनंद गडे इकडे तिकडे चोहिकडे असे वातावरण होते. कारण आज आमच्या सहावी 'क'ची लाडकेश्वरला ट्रीप होती. आदल्या दिवशी टेंभुर्णेकरसरांनी आम्हांला बरोबर पहाटे पाच वाजता शाळेत जमायला सांगितले होते. त्याप्रमाणे सर्व विद्यार्थी आणि विद्यार्थिनी प्रफुल्लित वदनाने शाळेत जमा झाली होती.

निसर्गाची शोभा ही अवर्णनीयच असते. त्यातून पहाटेची ती मंगल-प्रभात. पक्षी जणू काय 'घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला' म्हणू लागले होते. आणि झाडे सकाळच्या मंद वाऱ्याच्या वायुलहरींनी डोलत होती. आकाशात हळूहळू अरुणाची शोभा दिसू लागली. सहावीच्या वाङ्मयवृद्धिमालेच्या पुस्तकातील आकराव्या पानावरील 'उघडि नयन रम्यै-उषा हसत हसत आली' ह्या कवितेची आठवण झाली.

टेंभुर्णेकरसरांची वाट पाहात आम्ही शाळेच्या फाटकाशी उभे होतो. आता सूर्योदय झाला होता. सूर्योदयाची ती दिव्य शोभा काय वर्णावी! सूर्यकिरणांचे जाळे सर्वत्र पसरले. त्यामुळे सर्व विद्यार्थी हळूहळू फाटकाकडून परत शाळेच्या ओसरीवर येऊन बसले. विद्यार्थिनीही एका झाडाखाली बसल्या. विद्यार्थ्यांनी आपापसांत खेळायला सुरवात केली. विद्यार्थीच ते बोलूनचालून. ते स्वस्थ कसे बसणार? खरोखर 'बालपणींचा काळ सुखाचा' हे म्हटले आहे ते काही खोटे नाही.

आता रस्त्यावर रहदारी सुरू झाली होती. शेठ जंबुलाल खोकरदास मिलच्या दिशेने मजूर जात होते. गरीब बिचारे मजूर. त्यांच्या जीवनात कुठली ट्रीप! आपल्या रक्ताचा घाम करून जीवन कंठणारे ते. त्यांचे थवेच्या थवे गिरणीच्या धूर ओकणाऱ्या धुराड्याकडे जाताना पाहून माझ्या मनाची कालवाकालव झाली. आपल्या देशातून ही विषमता गेली पाहिजे. माझ्या तोंडून सहजस्फूर्त अशा ओळी आल्या. "बंड करा रे बंड...." मी त्या गाऊ लागलो. इतर विद्यार्थीदेखील "बंड करा रे बंड" म्हणून गाऊ लागले आणि उत्साहाचे एक निराळेच वातावरण सुरू झाले. उन्हे तापू लागली होती. तेवढ्यात 'सर आले, सर आले' असे कोणीतरी म्हणाले.

सर्व मुले व मुली उठून धावली. पाहातो तो काय, हेडमास्तरांच्या बंगल्यावर दूध घालणारा गवळी आला होता.

नऊ वाजून गेले तरी टेंभुर्णेकरसरांचा पत्ता नव्हता. मनुष्यप्राण्यांपुढे असंख्य अडचणी असतात. त्यामुळे सरांना दोष ठेवणे हे अगदी अयोग्य होते. परंतु काही विद्यार्थ्यांनी थोडेसे दुर्वर्तन केले. मधूनच कोणी तरी यावयाचा व "आले हुप्" "आऽऽले हुप" असे ओरडायला मुलांनी सुरवात केली. आपल्या देशात शिस्त नाही. उन्हाचा ताप फारच वाढत होता. परंतु ऊन तापते म्हणून तर पाण्याची वाफ होऊन आकाशात जाते व आपल्यावर पावसाची पर्जन्यवृष्टी होते. पावसाची शोभा खरोखरीच मोहक असते.

दहा वाजता टेंभुर्णेकरसर आले. तेवढ्यात मुलांची पांगापांग झाली होती. काही मुले तर पलिकडल्या हॉटेलात गेली होती. हॉटेलच्या बाजारी खाण्याने प्रकृतीला अपाय होऊन आरोग्यालाही काही रोग होण्याचा संभव असतो ही साधी गोष्ट तरुण पिढीला कधी कळणार?

शेवटी आम्ही दुपारी एक वाजता लाडकेश्वरला पोहोचलो. लाडकेश्वर हे फारच रम्य ठिकाण आहे. आम्हांला भूकही फार लागली होती. मोकळ्या व शुद्ध हवेत कडकडून भूक लागते. नेहमी मोकळ्या हवेत गेले पाहिजे. प्रत्येकाने फराळाचा डबा सोडला. प्रत्येकाच्या डब्यातील पदार्थ घेता घेता टेंभुर्णीकरसरांची तर गंमतच उडाली. पण सरांचा स्वभाव फारच खेळीमेळीचा आहे. त्यांनी लाडकेश्वरचे महत्त्व सांगितले. ते फारच महत्त्वाचे होते. देऊळ फारच रम्य आहे. व भोवती आंबे, सागवान, शेवगा, जांभळी, नारळी, पिंपळ यांची बनेच्या बने आहेत. दुरून निळे डोंगर तर सुंदर आणि निसर्गरम्य दिसतात.

संध्याकाळी आम्ही दिवेलागणीच्या सुमाराला परत आलो. त्या वेळी कडकडून भूक लागली होती. हवेचा परिणाम फारच चांगला होतो.

माझ्या बालमित्रांनो, मग तुम्ही जाणार ना लाडकेश्वरला ?

कुमार अरविंद भोळसुळे (सहावी 'क')

* * *

## ओळखा पाहू 'ती' कोण ?

कुमार भालचंद्र गणपुले (इ० सहावी क)

*(विनोदी लेख)*

अहो, ती कुठे गेली ? तिच्याशिवाय मला चैनच पडत नाही. सदैव ती माझ्या हृदयाजवळच्या खिशात असे. कधीकधी माझ्या कानांवरदेखील बसते. आणि तिचा स्वभाव तर फारच विचित्र ! तिला बोटावर धरून कागदावर चालवावी लागते. चाकूने टोक केल्याशिवाय चैनच पडत नाही. अहाहा ! माझी ती खरोखरच लाडकी आहे.

भलताच संशय नका हं घेऊ ! ती म्हणजे कोण कळले का ? ती माझी लन्सिपे.

**वि० सू०**—हा शब्द उलटा करून वाचावा म्हणजे विनोद कळेल आणि प्रिय वाचकहो, तुमची हसून हसून मुरकुंडीच वळेल.

* * *




लेखक : एक विद्यार्थी (सहावी 'क')

*(प्रिय वाचकांना रहस्यकथा फार आवडतात हे संपादक-मंडळाला ठाऊक आहे. नुकताच येथील एका शाळेत विद्यार्थ्यांच्या ब्यागा उघडून त्यांतील रहस्यकथा जप्त करण्याचा भीषण प्रकार घडल्याचे आम्ही ऐकले आहे. हे कृत्य मानवतेला काळिमा फासणारे आहे! असली गळचेपी आम्ही सहन करणार नाही. याबाबत शिक्षणखात्याकडे संपादकमंडळ एक शिष्टमंडळ लवकरच नेणार असून जप्त करण्यात आलेली पुस्तके परत मिळण्याबाबत सरकारात खटपट चालू आहे. संपादकमंडळाची पोलिसात ओळख आहे, हे आम्ही या प्रसंगी शिक्षकवर्गास सांगू इच्छितो. संपादकमंडळाचे एक जवळचे नातलग पोलिसात फार उच्च हुद्दयावर आहेत, हे इतके दिवस आम्ही सांगितले नव्हते. परंतु कटू कर्तव्य केव्हातरी करावे लागतेच.*

*प्रिय वाचकांना 'रक्ताचें थारोळें' ही खून, मारामाऱ्या व चित्तथरारक प्रसंग यांनी गजबजलेली रहस्यकथा सादर करताना आम्हांस सहर्ष होत आहे.)*

आपला आवडता पाईप पेटवून डिटेक्टिव्ह भुजंगरावांनी आपल्या आवडत्या आरामखुर्चीवर बसून संध्याकाळचे वर्तमानपत्र उघडले. त्यांच्या चेहऱ्यावर एक मिष्किल स्मिताची रेषा अस्पष्ट अस्पष्ट दिसू लागली. "सूर्यमालिनीच्या खुनीस फाशी."

"सूर्यमालिनीचा खून?" भुजंगराव मनातल्या मनात पुटपुटले. गेले सहा महिने त्यांना विश्रांती कशी ती नव्हती. जगत्सिंग डाकूचा तलास लावण्यात त्यांनी रात्री जागवल्या होत्या व शेवटी मुलेश्वरला ढड्ढासिंगाच्या

खोलीतल्या जुगाराच्या अड्डयांच्या छाप्यात जगत्‌सिंग डाकू अलगद त्यांच्या हाती सापडला होता.

'टक टक टक टक' दारावर कोणीतरी टिचक्या वाजवीत होते. "कोण आहे?" भुजंगरावांनी आपल्या खणखणीत आवाजात विचारले. बराच वेळ उत्तर आले नाही. भुजंगरावांनी वर्तमानपत्र बाजूला ठेवले व खणातून आपले आवडते पिस्तूल काढून दाराच्या दिशेने एक एक पाऊल टाकीत ते जाऊ लागले. त्यांच्या दाराला एक गुप्त काच होती. तीतून त्यांना बाहेरच्या जगात काय चालले आहे, हे स्वच्छ दिसत असे. त्यांनी त्या जादूच्या काचेची कळ दाबली. दारात पोस्टमन उभा होता.

"एवढ्या संध्याकाळी पोस्टमन?" स्वतःशीच पुटपुटून त्यांनी दार उघडले.

"एक्स्प्रेस लेटर आहे, साहेब." असे म्हणून पोस्टमनने त्यांच्या हातात एक लिफाफा दिला.

भुजंगरावांनी भरभर तो लिफाफा उघडला. आत एक पत्र होते.

"प्रिय डिटेक्टिवसाहेब,

मला सूर्यमालिनीच्या खुनाबद्दल पकडून दिल्याच्या आनंदात आपण असाल. पण हे पत्र वाचल्यावर आपणास धक्काच बसेल. मी व सूर्यमालिनी उद्या संध्याकाळी गोरजमुहूर्तावर विवाहबद्ध होत आहो. लग्नाला येण्याविषयी आपणास आमंत्रण देण्याची इच्छा होती, परंतु लग्न कुठे होणार, हे आपणांस कळविणे अशक्य आहे. का ते आपण जाणताच. तरी कृपा करून सोबत एक पाच रुपयांची नोट पाठविली आहे."

इथे कचऱ्याच्या टोपलीत टाकलेला लिफाफा भुजंगरावांनी काढला. त्यात एक बारीक सुरळी केलेली पाच रुपयांची नोट होती. ती घेऊन भुजंगराव पत्र वाचू लागले.

"त्या नोटेतून रत्तलभर लाडू आणून खा. सूर्यमालिनीला व मला आपला आशिर्वाद द्या.

आपला,

सच्चा जगतसिंग डाकू

"ता० क० माझा व सूर्यमालिनीचा फोटो आपणाजवळ आहेच. ते दोन्ही फोटो एकत्र करून त्यांच्यावर तांदूळ टाका. हॅ हॅ हॅ!

स० ज० डाकू"

पत्र वाचल्यावर भुजंगराव डिटेक्टिवांचे डोके बधिरच झाले. आपल्या हातापायांना मुंग्या येताहेत असे त्यांना वाटले. ते घाईघाईने आपल्या आवडत्या कपाटाकडे गेले व त्यांनी त्यातील एक आवडती बाटली उचलून तीतील एक आवडते पेय पेल्यात ओतले. अधूनमधून आणीबाणीच्या प्रसंगी सर्वच थोर डिटेक्टिव्ह असले आवडते पेय घेतात. भुजंगराव अर्थातच त्याला अपवाद नव्हते. त्यातून हल्ली त्यांना थोडा हार्टट्रबलही सुरू झाला होता व त्यांचे आवडते डॉक्टर सरंजामे यांनी त्यांना पूर्ण विश्रांती घ्यायला सांगितले होते. पेय घेतल्यावर त्यांच्या हातापायांतल्या मुंग्या गेल्या. त्यांनी ते पत्र पुन्हा उघडले व आपली आवडती जाड भिंगाची काच घेऊन ते पत्र तपासायला सुरुवात केली. पत्र लिहितांना शाईत रक्त मिसळले आहे, असा त्यांना भास झाला. त्यांनी आपल्या रसायनशाळेतील सूक्ष्मदर्शक यंत्राखाली ते पत्र धरले. त्यावरून तर ते पत्र रक्तानेच लिहिले आहे याची त्यांना खात्री पटली. त्यांच्या कपाटात सूर्यकुमारीच्या रक्ताचा नमुना होताच. त्याच्याशी ताडून पाहताना ते रक्त सूर्यकुमारीचे आहे, याची त्यांना खात्री पटली. तेवढ्यात त्यांच्या पायाशी शेपटी हलवीत त्यांचा आवडता कुत्रा रोव्हर आला. "पाहिलेस रोव्हर? माणसे कशी फसवतात? सूर्यकुमारीचा खून केल्यावर ह्या हरामखोर डाकूने आधी तिच्या रक्तात हे पत्र लिहिले आणि मला फसवण्यासाठी आज सहा महिन्यांनी हे पत्र पाठविले. पण असले शंभर जगत्‌सिंग पचवले आहेत मी म्हणावे!"

रोव्हरला भुजंगरावांच्या बोलण्याची सवय होती. एवढेच नव्हे, तर त्याला ते कळतही असे. भुजंगरावांचे बोलणे कळले की तो उजवीकडून डावीकडे शेपटी हलवी व कळले नाही तर डावीकडून उजवीकडे.

त्या खेपेला उजवीकडून डावीकडे शेपटी हलवीत रोव्हर पळाला. भुजंगरावांनी ते पत्र एका चिमटयाने उचलून गुप्त खणात ठेवून दिले.

रात्रीचे आठ वाजत आले होते. गुप्त पोलिसाचा पोशाक करून भुजंगराव

आपल्या रात्रीच्या फेरीला निघाले. संध्याकाळच्या त्या पत्राने त्यांच्या डोक्यात विचारांचे काहूर माजले होते. बिचाऱ्या डिटेक्टिव्हांच्या जीवनात नेहमीच असे काहूर माजते. "अभिनंदन!" कुणाच्या तरी शब्दांनी ते भानावर आले. इन्स्पेक्टर तावड्यांनी भुजंगरावांचा हात हातात घालून म्हटले, "वा भुजंगराव!"

"काय तावडेसाहेब?" संयपणाने भुजंगराव म्हणाले. एका रोव्हरखेरीज ते इतर सर्वांशी संयपणे बोलत असत. "खूप कमाल केलीत साहेब. चला, चहा-कॉफी घेऊ या. की लस्सी पिता!" भुजंगरावांना लस्सी फार आवडते, हे इन्स्पेक्टर तावडेसाहेबांना ठाऊक होते. "चला!" असे म्हणून समोर नूरे पंजाब हॉटेलात दोघेही शिरले.

"ऑं!" भुजंगराव एकदम उद्गारले.

"काय साहेब!"

"छे, काही नाही. माझे घड्याळ बंद पडले होते वाटते!" असे म्हणून चालू असलेल्या घड्याळालाच किल्ली देण्याचा त्यांनी बहाणा केला. हा त्यांचा आवडता बहाणा होता. त्यांनी काउंटरवर बसलेल्या शिखाकडे त्याचे लक्ष न जाईल अशा बेताने नीट पाहून घेतले. आणि हात धुवायला जायचा बहाणा करून ते त्याच्या शेजारी असलेल्या वॉशबेसिनजवळ गेले. त्या बिले घेणाऱ्या शिखाच्या कपाळावर उजव्या बाजूला बरोबर तस्साच वण होता. जगत्सिंगाच्या मिशीला लागली होती तशी ह्याच्याही मिशीला चाई लागली होती. भुजंगरावांची शंभर टक्के खात्री पटली. जगत्सिंग हॉटेलातल्या बिले घेणाऱ्या इसमाचे सोंग घेऊन तिथे बसला होता. फक्त चेहऱ्याचा रंग निराळा होता. त्यामुळे भुजंगराव थोडे संशयात पडले.

"साहेब, लस्सी घेता ना—" इन्स्पेक्टर तावडे ओरडून म्हणाले.

"नको!" असे म्हणून भुजंगराव नूरे पंजाबमधून तडक आपल्या घराच्या दिशेला निघाले. येताना आपला गुप्त कॅमेरा आणायला ते विसरले होते, त्याचे त्यांना वाईट वाटले.

"मोठा चमत्कारिक माणूस." असे म्हणून इन्स्पेक्टर तावड्यांनी लस्सीचे दोन्ही ग्लास रिकामे केले व बिल देण्यासाठी ते काउंटरपाशी गेले.

"साहेब, बिल कसले देता!" तो शीख म्हणाला.

"ते नाही चालणार. दिवस कसे आहेत पाहता ना!"

"ये की गल हे साब! पान मागवू? ओऽ पर्काशाऽ पाण ला जलदी—" म्हणून त्याने पानवाल्याला ऑर्डर दिली. पान खाऊन इन्स्पेक्टर तावडे आपल्या राउंडवर निघाले.

झपाझप पावले टाकीत भुजंगराव चौपाटीवरील आपल्या टुमदार बंगलीत परत आले. नेहमीप्रमाणे रोव्हरचे भुंकणे त्यांना ऐकू आले नाही. त्यांना शंका आली. खिशातले पिस्तूल व आपली गुप्त बॅटरी काढून ते बंगलीच्या दिशेने जाऊ लागले. ह्या गुप्त बॅटरीचा प्रकाश वापरणाराखेरीज इतरांना दिसत नसे. ते दारात आले आणि पाहतात तो काय? त्यांच्या दारात सूर्यमालिनी आणि जगत्‌सिंह रक्ताच्या थारोळ्यात मरून पडले होते आणि ते रक्त दुसऱ्या कोणाचेही नव्हते—त्यांच्या पायांशी मरून पडलेल्या त्यांच्या लाडक्या रोव्हरचे होते. रोव्हरच्या पोटातून चार गोळ्या गेल्या होत्या.

भुजंगराव डिटेक्टिवांचे हातपाय थरथरू लागले. त्यांच्या छातीत धडधड सुरू झाली व "रोव्हर!! रोव्हर!!" असे ओरडून त्या रक्ताच्या थारोळ्यात डिटेक्टिव्ह भुजंगरावांचा अत्यंत हृदयद्रावक असा अंत झाला. ईश्वर त्यांच्या आत्म्यास शांती देवो!

(एका मराठी रहस्यकथेवरून स्वैर रूपांतर)

खुलासा : आता इथे एक कबूल करणे प्राप्त आहे—मूळ कथेतले पहिले प्रकरण 'रोव्हरच्या पोटातून चार गोळ्या गेल्या' येथपर्यंत होते. ज्या ग्रंथावरून हा अनुवाद होत होता तो ग्रंथ आमच्या पालकांनी आमच्यापासून हिरावून नेला. त्यामुळे निराळी कलाटणी द्यावी लागली. लेखकाचा हा पहिलाच प्रयत्न असल्यामुळे वाचकांनी डिटेक्टिव्ह भुजंगरावांचा अंत गोड मानून घ्यावा अशी विनंती आहे. दैववशात मूळ ग्रंथ पुन्हा हाती लागला तर वाचकांच्या आवडत्या भुजंगरावांना व रोव्हरला जिवंत करण्याची हमी आम्ही देत आहो. शिवाय पहिल्याच प्रकरणात तीन माणसांचे व एक जनावराचा भीषण मृत्यू दाखवणारी ही पहिलीच रहस्यकथा आहे. त्या दृष्टीने हे नावीन्य आहे, असे आमचे एक वर्गबंधू कुमार बंडू पवार यांचे मत आहे. त्यांचा ह्या विषयाचा व्यासंग मोठा आहे. पुढील अंकात त्यांच्या हातून उतरलेली एका सुप्रसिद्ध रहस्य-कथाकाराची कथा वाचायला मिळेल.

## अरे बापरे! काय ही अजब दुनिया!

(१) एक मुंगी जर पृथ्वीपर्यटनाला निघाली तर तिला निघाल्या ठिकाणी परत यायला ३६३०४५७२२२१८९० तास व १६ मिनिटे लागतील, असा शोध रशियात लागला आहे.

(२) एकावर एक अशी जर पैशांची रास केली तर हिमालयाएवढी उंची व्हायला ३५३०४१८७६००० रुपयांचे पैसे लागतील!

(३) काही बहिऱ्यांना फक्त स्वतःच्या बायकोचे बोलणे ऐकू येत नाही. अजबच म्हणायचा हा बहिरेपणा!

(४) अमेरिकेतील एका खेड्यातील एका गृहस्थाला एक्याण्णव नातवंडे आहेत व त्याचे वय मात्र चोवीस वर्षांचे आहे. ऐकावे ते नवलच!

(५) उत्तर ध्रुवावर एका वांग्याची किंमत एकशे सहा रुपये आहे. तिथे फक्त एस्किमोच्या राजाला वर्षातून एकदा वांग्याचे भरीत खायला मिळते. बहुरत्ना वसुंधरा म्हणतात तेच खरे!

(६) काकूमाशीटो नावाच्या एका जपानी बेटात मुलाला नवरी व मुलीला नवरा म्हणतात व लग्नात दोन्ही पक्षांतील भटजींच्या मध्ये अंतरपाट धरून लग्नाला आलेले पाहुणे मंगलाष्टके म्हणून नवरी, नवऱ्याच्या आत्याबाई व तिच्या नवऱ्याच्या डोक्यावर शिजवलेला भात ओततात. ही लग्नातली चाल अजबच म्हणायची!

(७) आफ्रिकेतील एका वन्य जमातीतील लोकांच्या तळहातावर केस असतात व टाळूवर लोण्याचा गोळा असतो. किती चमत्कारिक!

(८) फुजीफुजी नावाच्या बेटावर खुनी माणसाला फाशीची शिक्षा न देता फुजीफुजी भाषेतील दर महिन्याला प्रसिद्ध होणाऱ्या कविता जन्मभर हाताने लिहून काढून पाठ करण्याची शिक्षा देतात. ह्या शिक्षेला फुजी फुजी भाषेत '*हा ला हल*' किंवा '*काव्यठेप*' म्हणतात. बरेचसे गुन्हेगार एकदोन वर्षांत आपोआप मरतात. काय ही कठोरता!

संग्राहक : बाळाजीसुत, सहावी 'क'

## हसू नका हं !

*(विनोदी चुटके व गोष्टी)*

**प्रो० अल्पबुद्धे** : काय प्रो० परार्धबुद्धे, माझा मी तुम्हांला दिलेला ग्रंथ कसा काय वाटला ?

**प्रो० परार्धबुद्धे** : सगळीं पानं फाडून सगळ्या शेजाऱ्यांना वाटला.

कु० चंद्रकांत दंडवते, सहावी 'क'




संग्राहक : कु० हरि बाळाजी टिपरे ऊर्फ बाळाजीसुत

**"मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें"**

—समर्थ रामदास

**"आम्ही जातों अमुच्या गावा"**

—तुकाराम

**"मराठी असे आमुची मायबोली"**

—एक आंग्ल कवी

**"एक दिवस सिंह म्हणून जगण्यापेक्षा दोन दिवस सिंह म्हणून जगावे"**

— टिपू सुलतान

**"आधी लगीन कोंडाण्याचें मग बाकीच्यांचें"**

—नरवीर तानाजी सिनेमावरून

**"प्रेम ही शक्ति आहे–प्रेम ही भक्ति आहे–प्रेम ही युक्ति आहे"**

—प्रद्युम्नकुमार (फिल्म "चुकलेले वासरू"मध्ये)

"आज आपल्या देशापुढे पुष्कळ प्रश्न आहेत"

—पंडित जवाहरलाल नेहरू (दै० नवाकाळमधून)

"मी आज वाङ्मय या विषयावर बोलणार आहे"

—(प्रो० शं० गो० शहापुरे) दै० प्रकाशामधून

"रोज दीडशें नमस्कार हाणले पाहिजेत"

—दांगटगुरुजी, व्यायामशिक्षक

"प्रत्येक माता ही जगातली स्त्री आहे"

—एक फ्रेंच लेखक

"आजचें काम उद्यावर टाकूं नका. परवावर टाका. कारण उद्यां कधींच उगवत नसतें"

—चार्लस टॉमलीनसन

"मी माझी झांशी देणार नाहीं."

—झांशीची राणी

* * *

## सज्जन संभू

### अर्थात् उपकाराची फेड अपकारांनी

*(ह्या कथेतील सर्व पात्रे काल्पनीक आहेत.)*

संभू ह्या एक सज्जन मुलगा होता. इतका सज्जन होता की विचारू नका. शाळेत तो सर्वांच्या आधी येत असे. वर्गाची खिडकीदारे उघडायला शाळेच्या शिपायाला मदत करीत असे. वर्गांतलीं बरिचशीं मुलें घरीं करायला दिलेलें होमवर्क शाळेंतच करित. संभू त्यांना आपण सोडवून आणलेली उदाहरणांची वही, भूगोलाचे प्रश्न, इंग्लिश भाषांतर वगैरे न कूरकुरतां देत असे. एकदां त्याच्या इंग्लिशच्या सरांच्या लक्षांत ही गोष्ट आली. इंग्लिशचे सर रागिट होते. त्यांना वर्गांतलीं मुलें सिंदबाद म्हणत असत. आपणहि त्यांना सिंदबादसरच म्हणूं या. सिंदबादसरांनी विचारलें, "मी दिलेलें होमवर्क कांही विद्यार्थ्यांनी एका विद्यार्थ्याच्या वहींतून कॉपी करून काढलेलें दिसतें. ज्यांनी ज्यांनी ही कॉपी केली त्यांनी उभें राहावें."

एकहि विद्यार्थी उभा राहिला नाही. सिंदबादसरांचा क्रोध अनावर झाला. ज्या विद्यार्थ्यांच्या वहींतून हें कॉपी करून काढलें आहे त्यानें उभें राहावें.

संभू छाती पुढे काढून उभा राहिला व म्हणाला,

"सर, माझी वही मी सर्वांना दिली होती. मी खोटें बोलणार नाहीं. कारण सत्यमेव जयते."

सिंदबादसरांनी संभूच्या कानफटीत ठेऊन दिली. परंतु संभू डगमगला नाही. त्याची टोपी खाली पडली. ती त्याने उचलली व टोपीला लागलेली धूळ झटकून व्यवस्थित ठेवली.

"एवढा मोठा सत्यनिष्ठ धर्मराज असलास तर गाढवा, कोणीं कोणीं तुझ्या वहींतून चोरलें तें सांग." सिंदबादसर म्हणाले.

"आपण एखाद्यावर उपकार केला तर त्याची बढाई मारूं नये. व ज्याला त्याला ज्यांच्यावर उपकार केला त्यांचीं नांवें सांगूं नये असें आम्हांला आमचे क्लासटीचर एम० वाय० खराटे, बी० ए०, बी० टी० यांनीं सांगितलें आहे."

"खराटेबिराटे मी ओळखत नाहीं." सिंदबादमास्तर भडकुन म्हणाले.

"आश्चर्य आहे." सज्जन संभू म्हणाला, "एका शाळेंतील दोन शिक्षक एकमेकांना ओळखत नाहीत ही अपूर्व घटना आहे." सज्जन संभूचें इंग्लिश व मराठी फारच 'हाय' होतें. पण सिंदबादमास्तरांनी तें ऐकलें नाही.

"संभ्या, एवढा शहाणपणा करतोस! उलटा टांगीन."

"वर्गासाठी मी मरण पत्करायला तयार आहें." संभू म्हणाला. संभूच्या वाक्याने त्या विद्यार्थ्यांच्या चिमुकल्या जीवनांत फारच खळबळ माजली. मुली तर रडायला लागल्या. मग संभूने वर्गाला उद्देशून एक भाषण केले. 'मित्रहो, इथे जरी माझा देह धारातीर्थी पडला तरी भिऊं नका. देशासाठी भगतसिंग फासावर हसत गेला. मी देखील हसत मरण पत्करीन' असें म्हणून संभू हसूं लागला. संभू हसायला लागल्याबरोबर सिंदबादसरांची भीतीने गाळण उडाली. त्यांच्या मनांत दयेचा अंकुर फुटला. त्यांनी संभूच्या पाठिवरून हात फिरवला व विचारलें,

"बाळ संभू—पण गुरूची आज्ञा तूं मानणार नाहिस का?"

"अवश्य मानीन. संस्कृतच्या टीचरांनी आम्हांला उद्दालकाची गोष्ट सांगितली आहे. तो शेतावर पाणी आडवण्यासाठी आडवा पडला होता

तसा—आपण आज्ञा केल्यास मी शाळेच्या फाटकापुढे आडवा पडून राहीन. माझ्या अंगावरून चिवडेवाल्याची गाडी गेली तरी हरकत नाही."

"शाबास. तुझ्यासारखे विद्यार्थि हे राष्ट्राला लगामभूत आहेत. मी गुरु म्हणून आज्ञा करतो. तूं सर्व विद्यार्थ्यांची नांवे सांग. हवे तर वर्गांत आडवा पड आणि उद्दालकाप्रमाणे सांग."

संभू आपल्या जागेवरून वर्गाच्या दारापुढे जाऊन आडवा पडला व त्याने त्याच्या वहीतून कॉपी केलेल्या सर्व मुलांची नांवे सांगितली. सिंदबादसरांनी ती एका चिठ्ठीवर लिहून घेतली.

"ही नांवे मी हेडमास्तरांजवळ देणार आहे. त्यांनाच तुमची कातडी सोलू दे," असें म्हणून सिंदबादसरांनी संभूला उठायला सांगितले. इतक्यात तासाची घंटा झाली व विजयी मुद्रेने सिंदबादसर निघून गेले. सर गेल्यावर ज्या मुलांची नांवे संभूने सांगितली त्यांनी संभूला खूप बदडलें. संभू मात्र मार खातांना, 'सत्य सदा बोलावें सांगे गुरु आणि आपुला बाप' हा श्लोक म्हणत होता.

ज्यांच्यावर संभूने उपकार केले त्यांनीच त्याची फेड अपकारांनी केली.

**तात्पर्य :** आपले होमवर्क घरी करून आणू नये.

जनार्दन बाबरे [ सहावी 'क' ]

## चिमणीचें बोल

आमची मोहनी (वय वर्षे तीन) फारच हुशार आहे. कधी काय बोलेल सांगता यायचे नाही. एकदा आमच्या घरी खूप पाहुणे आले होते. मोहिनीचे वडील मोठ्या हुद्द्यावर असल्यामुळे कलेक्टर वगैरे आमच्या घरी नेहमी चहाला येतात. एकदा आम्ही आइस्क्रीम केले होते. मोठी पार्टी असली म्हणजे मी नेहमीच आइस्क्रीम करते. कलेक्टर आणि त्यांच्या पत्नी, डी० एस० पी० आणि त्यांच्या पत्नी आणि गावातली इतर दोनचार प्रतिष्ठित माणसे मिळून आम्ही पाचसहा जण आमच्या बंगल्यापुढल्या सुंदर बगिचातल्या हिरवळीवर बसलो होतो. आमच्या बगिचाइतका सुंदर बगिचा आमच्या जिल्ह्यांत नाही असे लोक म्हणतात.

"तुमचा गार्डनर हुशार आहे." कलेक्टर म्हणाले.

"मी स्वतःच राबतो." 'हे' म्हणजे मोहिनीचे पपा म्हणाले.

"खरं आहे. स्वतः मेल्याखेरीज स्वर्ग दिसत नाही." डी० एस० पी० म्हणाले.

एवढ्यात आमची चिमुरडी मोहिनी त्यांना म्हणाली,

"स्वर्ग पाहिला का हो तुमी ?"

"अग, पण मी मेलो कुठे ?" डी० एस० पी० हसत हसत म्हणाले.

"मग तुम्ही केव्हा मरणार ?" मोहिनी म्हणाली. सर्वांची हसून हसून मुरकुंडी वळली. कलेक्टरसाहेब तर मोहिनीवर फारच खूश झाले आणि त्यांनी तिचा पापा घेतला.

सौ० कल्पना मोरघोडे, सोलापूर.
('पंचामृत' मासिकाच्या सौजन्याने)

## पोच व अभिप्राय

**गीतारहस्य :** लेखक — बाळ गंगाधर टिळक. कुरुक्षेत्र नावाच्या गावी कौरव आणि पांडव यांची जंगी मारामारी झाली. तीतून कृष्णाने पांडवांना आपल्या चातुर्याने कसे सोडवले हे यात रसभरितपणाने वर्णन केले आहे. वाचनीय असून संग्राह्य आहे. मात्र किंमत जरा अधिक वाटते व स्वतः लेखकाखेरीज इतर चित्रे नाहीत ही उणीव आहे.

**सुलभ अंकगणित :** लेखक — पां० गो० एकलहरे, एम० ए०, बी० टी० स्पष्टपणे लिहायचे म्हणजे ग्रंथ रुक्ष आहे. असली पुस्तके लिहिण्यात लेखकाने कालापव्यय करू नये. शिवाय शेवटी उत्तरे दिली नाहीत हे लेखकाचे अज्ञान दाखवीत नाही काय ?

**खाणावळीत खून :** लेखक — बाळ हलकर्णीकर. अलिकडे आमच्या वाचनात आलेल्या ग्रंथांपैकी हा अपूर्व ग्रंथ आहे. खाणावळीचे वर्णन चांगले साधले आहे. लेखकाने प्रयत्न केल्यास याहूनही सरस असे खून तो रचू शकेल असा विश्वास आहे. डिटेक्टिव्ह मोहनसिंगचे चातुर्य अवर्णनीय आहे. ग्रंथाच्या मानाने किंमतही स्वस्त आहे. प्रिय वाचकांनी हा ग्रंथ अवश्य वाचावा.

**नवी नवी बडबडगीते** : ले० कु० वीणा पंचपात्रे यांनी काढलेले हे लहान मुलांचे पुस्तक अल्पगुणी व बहुमोली असेच आहे. ह्या पुस्तकावर मुलांच्या उड्या पडतील. ह्यांतील काही बडबडगीते छान आहेत.

उदाहरणार्थ :

**डंपूनाना टंपूनाना अगडपगडबंद**
**गाडा आला गाडी आली रगडदगडचंद**

हे गाणे मुलांना फारच आवडेल. कु० विणा पंचपात्रे ह्या बागडेवाडीचे सुप्रसिद्ध कापड व्यापारी विठुअण्णा पंचपात्रे यांच्या मुलग्या आहेत. त्या विदुष्याही आहेत, अशी संपादकमंडळाला गोड बातमी मिळाली आहे. त्यांचे आणखी एक बडबडगीत फारच गोड आहे.

**बबुताई बबुताई छबुताई कशी ?**
**बबुताई छबुताई टुं टुं जशी**
**छबुताई छबुताई बबुताई कशी ?**
**छबुताई बबुताई पुं पुं जशी**

ही गाणी फक्त लहानांनाच काय पण मोठ्यांनाही आवडतात. कारण सह्याद्री 'क'मध्ये एका 'क्ष'सरांना डंपूनाना टंपूनाना अगडपगडबंद म्हणण्यात येत आहे. चांगल्या पुस्तकांचा जगभर प्रभाव पडतो हे सोमणसर (वाङ्मयविषाद) म्हणतात ते खरे आहे.

**'उघड ती खिडकी'** : लेखक—गंगाराम बेलसरे

*(तीन अंकी पात्रविरहीत नाटक)*

श्री० बेलसरे यांचे नाव नाटककार म्हणून सर्वत्र गाजत आहे. हे त्यांचे चाळिसावे भाषांतरित नाटक आहे. प्रस्तावनेत श्री० बेलसरे म्हणतात : "मराठि रंगभूमीवर माझ्या नाटकांनी क्रांती केली आहे. अनेक यशस्वी नाटककारांची नाटके वाचताना ती मीच लिहिली आहेत असा गैरसमज पसरू पाहात आहे. परंतु एकच प्याला, स्वयंवर, शारदा ह्यांपैकी एकाही नाटकाच्या संवादावरून माझा हात फीरला नाही. अर्थात ही नाटके यशस्वी का झाली हे एक मला कोडेच आहे. प्रस्तुत नाटकात मी नवा प्रयोग

केला आहे. ह्या नाटकात पात्रेच नाहीत. रंगभूमीवर फक्त प्रकाशयोजना व फर्निचर आहे. सारे संवाद आतून बोलले जावेत. कारण स्टेजवर दिवाणखाना आहे व पात्रे सदैव आतल्या खोलीत अगर स्वयंपाकघरात आहेत. त्यांच्या आवाजाच्या परावर्तित परीणामावर हे असामान्य नाटक आधारले आहे."

आमच्या प्रिय वाचकांनी नाटककाराला परावर्तित करून आवाजाचा परिणाम साधण्यात मदत करावी, अशी आमची सूचना आहे. हे नाटक उच्च आहे, असे कै० श्री० सौ० क० भ० कुं० इ० हायस्कूलमधील डेंगाळेसर बि० ए०, बी० टी० म्हणतात.

यांशिवाय आमच्या संपादकीय कचेरीत अभिप्रायासाठी इतर बरेच ग्रंथ आले आहेत. त्यांवर पुढील अंकांत हळूहळू अभिप्राय देण्यात येईल.

* * *

## वाचकांचे अभिप्राय

'उदयाचल' वाचले. उपक्रम स्तुत्य आहे. लेखांचा दर्जा चांगला आहे. असाच प्रयत्न चालू ठेवावा. 'हस्तलिखिते आणि त्यांचे कार्य' ह्या विषयावर गेल्या जून महिन्याच्या 'तरंग' मासिकात मी एक विस्तृत लेख लिहिला आहे. तो अवश्य अभ्यासावा. कथाही बऱ्या आहेत. यासंबंधी अधिक मार्गदर्शन माझ्या 'कथा : काल–आज–उद्या व परवा' या ग्रंथात सापडेल. कवितांकडे अजून लक्ष हवे. मी माझ्या 'काव्य : कालचे, उद्याचे आणि परवाचे' या पुस्तकात विवेचन केले आहे. त्यात मी म्हटले आहे, "काव्य हे पारदर्शक अस्तित्वावस्थेतून अपारदर्शक स्थितितत्त्वाकडे जात आहे हे योग्य नाही." ह्या विषयावर मी स्वतंत्र ग्रंथ (काव्य : क्षण, लक्षण आणि विलक्षण) लिहीत आहे. त्याचा अभ्यास उपयुक्त ठरावा. प्रस्तुत मासिक हे बागडेवाडी येथे वसंतव्याख्यानमालेत "ज्ञानेश्वरीतील, 'आणि', 'व', 'परंतु'ची संख्या" ह्या विषयावर व्याख्यान देण्यासाठी आलो असताना मिळाले. मासिक चिरायू होवो.

प्रो० स० दा० किरकिरे
प्राध्यापक, शेठ दादू पिंजारी कॉलेज (माळशिरस)

मोऱ्याच्या मासिकात अर्थ नाही असे आमचे स्पष्ट मत आहे.

बाळ गोगटे
आत्माराम रणदिवे
चारुदत्त देवघेकर
बल्लू मुचाटे
(सहावी 'क')

* * *

लेख चोरलेले आहेत. संपादकांनी आपली संपादकाची खुर्ची सोडून द्यावी. कारण माझी कविता मासिकात आलेल्या भिकार कवितांपेक्षा शंभर पट चांगली होती—आम्ही वशिल्यांच्या तट्टांच्या मासिकात येऊ इच्छित नाही.

काशिनाथ गोळे (सहावी 'क')

* * *

विनोदी चुटके छापील मासिकातून चोरले आहेत.

'क्ष', सहावी 'क'

* * *

ह्याच्यापेक्षा आम्ही पाचवीत असताना काढलेले 'छात्रवैभव' हजारपट चांगले होते. 'काय ही अजब दुनिया'तील बऱ्याच गोष्टी त्यातून चोरल्या आहेत. हे शोभत नाही.

'एक हितचिंतक', सहावी 'क'

* * *

संपादकांची ऐटी लवकरच अरुणाचल प्रसिद्ध झाल्यावर उतरेल. त्यात दोन खऱ्या रहस्यकथा आहेत.

'एक वाचक'

* * *

उदयाचल मासिक फार छान आहे. वर अभिप्राय लिहिलेले खोटे आहेत. ताकद असेल तर नावे फोडा.

बंडू पवार, सहावी 'क' (क्यापटन हुतूतू टीम)

* * *

"आमचा एक आणा फुकट गेला. हे मासिक कोणीही वाचू नये."

'एक चुकलेला वाटसरू'

* * *

**खुलासा :** चुकलेल्या वाटसरूने आपला एक आणा शक्ती असल्यास ग्राउंडवर शाळा सुटल्यावर येऊन घेऊन जावे.

—संपादक मंडळ व बंडू पवार आणि त्यांची ग्यांग

ही माझी कुमारपणीची संपादकीय कारकीर्द. वाङ्मयाच्या इतिहासात 'उदयाचल'चे नाव येवो अगर न येवो. हल्ली छापील मासिके वाचतानादेखील माझी आणि माझ्या त्या प्रांतातल्या वाचकांची परंपरा अजून चालू आहे हे पाहून मला धन्यता वाटते. आमच्या कै० श्री० सौ० क० भ० कुं० इ० हायस्कूलमधले इंग्लिशचे दत्तरदारसर म्हणाले होते तेच खरे : चाइल्ड इज धि फादर ऑफ म्यान!

❦ ❦

१३

## जाल्मिकीचे लोक-रामायण

काळ बदलतो आहे. त्याबरोबर सर्वांनी बदलले पाहिजे. एक काळ असा होता की सूर्य वेळेवर उगवत असे, हिमालयदेखील बराचसा उंच होता, हवादेखील थंड प्रदेशात थंड व उष्ण प्रदेशात उष्ण होती. काळ बदलला. एका खोलीत मनस्वी उकाडा तर दुसरीत थंडी हा चमत्कार आपण मोठमोठ्या शहरातून पाहू लागलो. हे पूर्वी नव्हते. पूर्वीच्या काव्यांतून वसंत आणि कोकिळा नियमितपणे येत-जात. हल्ली दोघांचाही पत्ता नाही. प्रत्यक्ष सूर्योदयापेक्षाही अधिक शोभिवंत सूर्योदय रंगीत चित्रपटांत दाखवून आपण निसर्गाचे नाक ठेचले. पूर्वी कविता कळत असे; हल्ली जे कळते ते काव्यच काय पण वाङ्मयच नव्हे, असा सिद्धांत आपण स्वीकारला. पूर्वी स्वप्नात राज्ये दान दिल्याचे पाहून खरोखरीच दुसऱ्या दिवशी स्वप्नातला बोल खरा करण्याचा मूर्खपणा करणारे राजे होते. हल्ली दिवसाढवळ्या दोन्ही डोळे उघडे ठेवून दिलेला बोल खरा करणारा इसम स्वप्नातदेखील आढळणार नाही. काळ बदलतो आहे, आपण बदलले पाहिजे. सारे काही बदलवले पाहिजे—त्यातल्या त्यात जुने वाङ्मय; कारण ते प्रतिगामी आहे. त्यात सत्याचा आग्रह न धरता खरे बोलणारे हरिश्चंद्र आहेत. 'नॅशनल इंटरेस्ट'

न पाहता काका-मामांशी लढाई करणारे कृष्णार्जुन आहेत. काळ बदलतो आहे. जुन्या काळात अफजुलखानाला हिंसात्मक पद्धतीने मारणारे शिवाजी आहेत; अहमद बंगशाला बुंदेलखंडाचे खंडदान न करता बाजीरावाच्या मदतीने पिटाळून लावणारे छत्रसाल आहेत. इंग्रजांची पाहुणे म्हणून सोय न करता भारताचा अतिथिधर्म बुडवणारे क्रांतिकारक आहेत.

तात्पर्य, काळ बदलतो आहे आणि त्याबरोबर आपण बदलले पाहिजे. याची रुखरूख सर्वांच्या मनाला सारखी लागली पाहिजे.

## जाल्मिकीने सारेच बदलविले !

आपल्या सुदैवाने अशी रुखरूख लागलेली माणसे आपणांमध्ये ह्यात आहेत; आणि जाल्मिकीचे 'लोक-रामायण' हा त्याचा पुरावा आमच्या हाती आला आहे. आजवर आपण वाल्मिकीचे प्रतिगामी रामायण वाचीत आलो. तुलसीदासाचे रामायण तर इथूनतिथून भक्ती नावाच्या एका प्रतिगामी रसाने भरलेले. मोरोपंतांनी (हा गृहस्थ स्वतःला कवी म्हणवीत असे) एकशेआठ रामायणे लिहिल्याची कथा आहे. तामील भाषेत कंबु-रामायण नावाचा असाच एक प्रतिगामी प्रकार आहे. ही सर्व रामायणे देशातील फुटीर प्रवृत्तीला प्रोत्साहन देणारी आहेत हे सिद्ध झाले आहे. जुन्या रामायणात आता काही राम उरला नाही. त्यात मूलभूत फरक करण्याचा काळ आता आला आहे. हे नवे रामायण लिहिणारा लोककवी आपल्यात अवतरला हे रामाचे भाग्य !

'लोक-रामायण' ह्या अलौकिक ग्रंथाचा जनक (सीतेच्या बापाशी ह्या जनकाचा संबंध नाही.) 'जाल्मिकी' ह्याचा परिचय करून देणे आवश्यक आहे. 'जाल्मिकी'चे मूळ नाव सांगणे अवघड आहे. पाळण्यात त्याचे नाव जनार्दन असे ठेवल्याबरोबर बालकाने 'नाव बदला' असा आक्रोश केल्याची कथा आहे. बारा दिवसांच्या बालकाची ही कथा असल्यामुळे तिला 'दंत'-कथा म्हणणे शक्य नाही. सुदैवाने बदलापूरला त्याचा जन्म झाल्यामुळे गावाच्या नावाखेरीज प्रत्येक गोष्ट बदला असा बाळपणापासून त्याचा आग्रह असे. आपले नाव तर त्याने नित्य बदलले. वडलांचेही बदलले. जे दिसेल ते बदलायचे हा बाळ जनार्दनाचा आग्रह असे. लहानपणी मुले विटी-दांडू खेळत तर जनार्दन (त्या दिवशी त्याचे नाव जनता-जनार्दन

होते) 'दांडूविटी' खेळत असे. हुतुतूला 'तुतुहू' म्हणत असे. आणि खोखोतला दुसरा 'खो' आधी म्हणून त्या खेळाचे नावही 'खोऽखो' असे बदलण्याचे कार्य त्याने केले. शाळेत असताना वर्ग बदलायचा, शिक्षक बदलायचा, एवढेच काय परंतु वर्गात कपडे बदलायचादेखील त्याने सपाटा चालू केला. असला असामान्य विद्यार्थी पाहून कित्येक शिक्षकांनी त्याच्या वर्गातून बाहेर पडताना बदलीचे अर्ज केले. तारुण्यात तर जनार्दनाने अनेक गोष्टी बदलल्या. त्यांचा तपशील देणे शक्य नाही; परंतु त्यांतील एका गोष्टीमुळे त्याने आपले नाव अजरामर केले आहे, त्याचा उल्लेख करणे आवश्यक आहे. ती म्हणजे त्याने वाल्मिकी नावाच्या कवीच्या रामायणाला पार बदलून दिलेले नवीन स्वरूप. हे कार्य करताना त्याने स्वतःचे जनार्दन हे नाव बदलून 'जाल्मिकी' हे नाव धारण केले आणि आपल्या नव्या रामायणाचे नाव 'लोक-रामायण' असे ठेवले. कुणाच्याही भावना दुखवायच्या नाहीत हे ह्या रामायणाचे वैशिष्ट्य आहे. मूळ रामायणातील कांडे केव्हाच पिचली आहेत हे जाल्मिकीच्या ध्यानात आले आणि लोकांना समजेल अशा भाषेत त्याने आपल्या लोक-रामायणाची रचना केली. जाल्मिकीने रामायणातील पहिल्या प्रकरणाचे नाव बालकांड असे न ठेवता 'रुदन' ह्या बालकाच्या सहजप्रवृत्तीला साजेल असे भो-कांड हे नाव ठेवले. 'भो-कांडा'-तील आणि इतर कांडांतील काही कथा पाहा.

## 'भो-कांडा'पासून सुरुवात

शरयू नदीच्या तीरी अयोध्या नावाची लोकधानी होती. तेथे दशरथ नावाचा एक लोकपाल होता. त्याचे मुख्य काम लोक-वाहनांची सोय करण्याचे होते. त्या काळी लोक रथातून प्रवास करीत. प्रस्तुत लोकपालाच्या ताब्यात दहा रथांची व्यवस्था असल्यामुळे 'दशरथ' असा त्याला किताब होता. त्या काळात द्विभार्याप्रतिबंधक कायदा होता. परंतु त्रिभार्याप्रतिबंधक नव्हता. त्यामुळे लोकांच्या इच्छेला मान देऊन त्याने तीन पत्नींचा स्वीकार केला होता. एकीचे नाव कौसल्या, दुसरीचे कैकेयी आणि तिसरीचे सुमित्रा. ह्या एकमेकींशी कधीच भांडत नसत.

अयोध्येत कोणीच कोणाशी भांडत नसे. तिघीही एकच स्वैपाक करीत. कौसल्येने हातसडीचे तांदूळ निवडले की, कैकेयी शरयू नदीवरून, अयोध्या-हस्तोद्योग-कार्यालयात तयार झालेल्या मडक्यातून, पाणी आणीत असे आणि सुमित्रा चूल पेटवीत असे. मग तिघी मिळून भात शिजवीत आणि मग आपल्या झोपडीच्या बाहेर अतिथीची वाट पाहात उभ्या राहात. ही सर्व मंडळी झोपडीतच राहात. त्या वेळी मोठमोठ्या महालात कोणीच राहात नसे. सारी मंडळी आश्रमात राहात म्हणूनच त्यांच्या घरांना गृहस्थाश्रम म्हणत. काही मंडळी आश्रमदेखील बांधीत नसत. कारण त्यांचा मुख्य व्यवसाय 'अतिथी' हाच होता. रोज अतिथीला वाढल्याखेरीज पुण्य मिळत नसे. त्यामुळे इतरांना पुण्य मिळवून देण्यासाठी गावात अतिथी असणे आवश्यक होते.

अयोध्येतील पुरुषमंडळी शेतांवर काम करीत. 'सब भूमी गोपालकी' ह्या तत्त्वाप्रमाणे कोणीही कुणाच्याही शेतीवर काम करीत असे व कुणीही कुणाचेही धान्य कापून आणीत असे. गावात गुन्हेच घडत नसल्यामुळे पोलीसदेखील शेतावरच काम करीत आणि कंटाळा आल्यास अतिथीचे काम करीत.

दशरथाचा संसार सुखाने चालला होता. त्याला राम, लक्ष्मण भरत व शत्रुघ्न असे चार पुत्र होते. काही मंडळीचे मत, हे आधी नव्हते, नंतर त्याने यज्ञ केला आणि मग मुले झाली, असे आहे. परंतु ते असत्य आहे. दशरथाच्या तीनही राण्यांत मिळून चार मुले पहिल्यापासूनच होती. ही मुलेदेखील आपापसात कधीच भांडत नसत. सकाळी उठल्याबरोबर प्रार्थना करून वसिष्ठगुरुजींच्या जीवनशिक्षण-केंद्रात जात. वसिष्ठगुरुजी बेसिक पद्धतीचे शिक्षण देत असत. प्रत्येक गोष्ट समवायपद्धतीने शिकवण्याकडे त्यांचा कटाक्ष असे.

## 'इक्ष्वाकु' घराण्याचा परिचय

लोकपाल दशरथाने वसिष्ठगुरुजींची आपल्या मुलांना

शिकवणी ठेवली होती. त्याबद्दल मुले गुरुजींना दर्भाच्या दहा जुड्या प्रतिमासी देत असत.

इक्ष्वाकू घराण्याची माहिती वसिष्ठगुरुजींनी खालीलप्रमाणे सांगितली.

दशरथाच्या झोपडीत येताना वसिष्ठगुरुजी हातात एक भला मोठा ऊस घेऊन आले. मुलांनी गुरुजींना दंडवत घातला.

"लोकगुरूंना अभिवादन." मुले म्हणाली.

"लोकांचे कल्याण असो," वसिष्ठ म्हणाले. "लोकांच्या मुलांनो, मी आज येताना काय आणले आहे?" वसिष्ठांनी विचारले.

"कमंडलू!" छोटा लोकपुत्र शत्रुघ्न म्हणाला.

"योग्य! लोकपुत्रहो, दुसरे काय?"

"रजकाकडून धुतलेली छाटी!" भरत म्हणाला.

"योग्य!! लोकपुत्र लक्ष्मणा, तू का उत्तर देत नाहीस?"

"लोकगुरुजी, माझा ज्येष्ठ बंधू राम जे सांगेल तेच माझे उत्तर असणार. तेव्हा त्यालाच विचारा." लक्ष्मणाचे बंधुप्रेम उफाळून आले.

"रामचंद्रा, तू सांग मी काय आणले आहे?"

"ऊस." राम म्हणाला.

"ऊस!" लक्ष्मण म्हणाला.

"योग्य. परंतु ऊस हा लोकवाणीतला शब्द झाला. देववाणीत उसाला काय म्हणतात, लोकपुत्र भरता—"

"ऊसम!" भरत म्हणाला. शत्रुघ्न हसला, त्यामागून राम हसला, म्हणून लक्ष्मण हसला.

"हसू नका! हसण्याने भावना दुखावतात. रामचंद्रा, उसाला देववाणीत काय म्हणतात?"

"इक्षू." राम म्हणाला.

"इक्षू." लक्ष्मण म्हणाला.

पुढे वसिष्ठगुरुजींनी तो ऊस वाकवला व विचारले,

"लोकपुत्रहो, मी आता उसाचे काय केले?"

"वाकवून दाखवला!" चारी लोकपुत्र म्हणाले.

"इक्षू वाकल्यावर काय होते?"

"मोडतो!"

"नव्हे, न मोडता काय होते?"

"काही होत नाही." शत्रुघ्न म्हणाला.

"परंतु इक्षू आणि वाक यांचे काय होईल?"

"इक्ष्वाक" राम म्हणाला व मागून लगेच लक्ष्मणही तेच म्हणाला.

"धन्य धन्य! आता त्याला ऊ लावल्यावर काय होईल?"

"ऊस खराब होईल." भरताने उत्साहाने सांगितले.

"नव्हे! ऊ हे अक्षर लावल्यास काय होईल?"

"इक्ष्वाकू!" राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न म्हणाले.

"इक्ष्वाकू!!" आपल्या दाढीवरील घाम टिपीत वसिष्ठगुरुजी उद्गारले. "धन्य!! आज आपल्याला इक्ष्वाकू घराण्याविषयी माहिती करून घ्यावयाची आहे." एवंगुणविशिष्ट प्रस्तावना करून समवायपद्धतीला अनुसरून वसिष्ठगुरुजींनी त्या चारही लोकपुत्रांस उसाच्या मळ्यात कामाला नेले. शेती, वल्कले शिवणे इत्यादी कलांमध्ये हे लोकपुत्र पारंगत झाले.

कालमानाप्रमाणे लोकपाल दशरथ थकत चालला होता. दहा रथांच्या लोकवाहकांची दगदग त्याला सोसवत नव्हती.

## विश्वामित्र दशरथास भेटतात

आणि एके दिवशी सायंप्रार्थना आटोपून लोकपाल दशरथ आपल्या कुटुंबियांमध्ये गाईचे दुग्धपान करीत बसला असता तेथे आचार्य विश्वामित्र आले. वसिष्ठगुरुजी लोकपुत्रांची शिकवणी करीत तेथेच बसले होते. वसिष्ठ आणि विश्वामित्र हे जिवश्च-कंठश्च मित्र असल्यामुळे त्यांनी एकमेकांना कडकडून आलिंगन दिले. विश्वामित्रांनी अयोध्येनजिकच्या अरण्यात आदिवासी

शिक्षणसंस्था चालविली होती. त्यांच्या ज्ञानयज्ञात राक्षस व्यत्यय आणीत असत. आदिवासी मुलांच्या पाटया फोडीत. पेन्सिली पळवून नेत. चरखे जळणासाठी वापरीत. चोरून दारूदेखील गाळीत असत. लोकपाल दशरथाने शांततामय मार्गाने त्या राक्षसांचा बंदोबस्त करावा अशी त्यांची इच्छा होती. वसिष्ठ-गुरुजींचा सल्ला पडला की रामचंद्राने हे विधायक कार्य हाती घ्यावे. त्याप्रमाणे रामचंद्र व त्याच्यामागून लक्ष्मण हे विश्वामित्र मुनींबरोबर आदिवासी शिक्षणसंस्थेत गेले. तेथे पाट्यांचे तुकडे झालेले, पेन्सिली मोडून टाकलेल्या, सरंजामकार्यालय उध्वस्त झालेले पाहून रामास फार वाईट वाटले. रामास वाईट वाटले म्हणून लक्ष्मणासही वाईट वाटले. त्यांनी विश्वामित्रास धीर दिला व स्वतः आदिवासी मुलांचा वर्ग घ्यावयास सुरुवात केली. नेहमीप्रमाणे राक्षस वर्ग उधळण्यासाठी आले. रामचंद्राने त्यांच्या शिष्टमंडळाची गाठ घेतली. ग्रामोद्योग आणि जीवनशिक्षण यांचे महत्त्व त्यांना पटवून दिले आणि शांततामय सहजीवनावर त्यांची 'बौद्धिके' घेतली. राक्षसांचे डोळे उघडले. त्यांनी आपापली मुले आणून प्राचार्य विश्वामित्रगुरुजींच्या संस्थेत दाखल केली. अशा रीतीने ब्रह्मविद्येत पारंगत झालेली मुले अजूनही 'ब्रह्मराक्षस' म्हणून ओळखण्यात येतात. त्यांतील काहींना हिंसात्मक पद्धतीने मानगुटीवर बसायची हुक्की आली की 'राम राम' असे म्हटल्यावर त्यांच्यातील हिंस्त्र वृत्ती नष्ट होऊन जाते. हा अनुभव अनेकांनी घेतला असेल.

## जानकी-राम विवाह

राम-लक्ष्मणांच्या विधायक कार्यावर प्राचार्य विश्वामित्र प्रसन्न झाले. त्याच वेळी मिथिलानामक जनराज्यात जनक नावाचा जनपाल होता. त्याची जानकी नावाची उपवर कन्या होती. जनराज्यात, निवडणुकीच्या लोकशाही पद्धतीने विवाह होत असे. उपवर कन्येला एकच मत असून एकाचीच निवड करता येत

असे. निवडणुकीला उभे राहण्याचा कोणाही पुरुषाला अधिकार असे. मत मात्र अविवाहित तरुणींनाच असे. निवडणुकीत पडलेल्या उमेदवाराचे डिपॉझिट जप्त होत नसे ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. विश्वामित्रगुरुजी राम-लक्ष्मणांबरोबर पदयात्रा करीत मिथिला जनधानीत येऊन पोहोचले. जानकीच्या स्वयंवराला (ह्या निवडणुकीला स्वयंवर म्हणत) देशोदेशीचे लोकपाल आले होते.

जानकीला सीता असेही नाव होते. जनपाल जनक शेतात जमीन नांगरीत असताना एका पेटिकेत ही कन्या सापडली, अशी एक कथा आहे. ह्यावरून त्या वेळी शेतात काय सापडत असे याची कल्पना येईल. वास्तविक त्या काळात सर्वच मंडळी शेती करीत. त्यांतून जनक, दशरथ वगैरे मंडळी तर 'क्षत्रिय'. खरे म्हणजे 'क्षत्रिय' हा 'क्षेत्रीय' याचा अपभ्रंश आहे. सदैव क्षेत्रात राहणारे क्षेत्रीय. क्षेत्रस्थ ब्राह्मण आपण ऐकतो. क्षेत्रस्थ म्हणजे देखील क्षेत्रात राहणारे. वैश्यांची शेती वेशीजवळ असे. म्हणजे एक डोळा शेतीवर ठेवून दुसरा डोळा दुकानावर ठेवता येत असे. 'शूद्र'हे 'शूत् शूत्' असा 'रव' करून पाखरे हाकलीत म्हणून त्यांस 'शूत-रवः कुर्वन्ति इति शूद्राः' असे म्हटल्याचे जुन्या शास्त्रग्रंथांत नमूद केले आहे. हे जुने ग्रंथ आता नष्ट झाले हे आपले दुर्दैव. तात्पर्य, जनकाने आपल्या शेतात सापडलेल्या कन्येचे स्वयंवर मांडले. देशोदेशीचे क्षेत्रपाल, लोकपाल आणि जनपाल त्या स्वयंवराला आले होते. विश्वामित्रांनी रामचंद्र आणि लक्ष्मण ह्या लोकपुत्रांसही बरोबर नेले.

## सीता-स्वयंवर

जनकाच्या झोपडीसमोरील अंगण शेणाने सारवून स्वच्छ केले होते. मिथिलेतील सरंजाम-कार्यालयाला चिपळूण येथील जंगलात विधायक कार्य करणारे आचार्य परशुराम यांनी एक कापूस पिंजण्याची प्रचंड धनुकली भेट दिली होती. तिला दोरी जोडून जास्तीत जास्त कापूस पिंजून दाखवणाऱ्याची निवड

होईल असे जाहीर केले होते. दुर्दैवाने त्या स्वयंवराला आलेल्या लोकपालांत ग्रामोद्योगकेंद्रात मधुपालन, चर्मालय, तेलाची घाणी वगैरे चालवणाऱ्या लोकपालांचीच गर्दी जमली होती. बहुतेक शेती-बेसिक पाठशाळेतले विद्यार्थी होते. वसिष्ठ गुरुजींनी रामाला सूत-बेसिक पद्धतीने जीवनशिक्षण दिले होते, त्यामुळे रामाने त्या कापूस पिंजण्याच्या धनुष्याला दोरी जोडून दहा शेर कापूस पिंजून दाखवला आणि धनुष्य मोडले. तेवढ्यात लक्ष्मणाने त्या कापसाचे पेळूही वळले होते. हे सारे हस्तकौशल्य पाहून जनक प्रसन्न झाला आणि सीता-रामांचा विवाह झाला. अर्थात लक्ष्मणाचे पेळू करण्याचे कसब पाहून ऊर्मिळा नावाच्या आपल्या दुसऱ्या कन्येशी त्याचाही विवाह जनकाने लावला. त्या स्वयंवराला रावण नावाचा एक लोकपाल आला होता. त्याला जीवनशिक्षण मिळाले नव्हते, त्यामुळे तो हातील काहीच करू शकला नाही. त्यामुळे त्याला हात हलवीत परतावे लागले. परंतु जनपाल जनकाने सर्व मंडळींना आग्रहाने ठेवून घेतले आणि विवाहानिमित्त सर्वांनी सामुदायिक उपोषण करून आपली चित्ते शुद्ध करून घेतली व त्यामुळे कुणालाही हर्षखेद काहीच न होता सर्व मंडळी स्थितप्रज्ञावस्थेत परतली.

### लोकपाल दशरथाची सेवानिवृत्ती

राम-लक्ष्मणांप्रमाणे भरत-शत्रुघ्नांचेही विवाह झाले. लोकपाल दशरथाला कामाची जबाबदारी आता कठीण वाटू लागली आणि त्याने सेवानिवृत्त होऊन ते काम ज्येष्ठ लोकपुत्र रामचंद्र ह्याला द्यावयाचे ठरविले. या वार्तेने कौसल्या, कैकेयी, सुमित्रा ह्या तिन्ही राण्यांना अत्यानंद झाला; परंतु खुद्द रामचंद्राच्या मनात विश्वामित्राचा जंगलातील आश्रम पाहिल्यानंतर आदिवासींच्या कार्यासाठी जीवनदान करावे असे फार दिवस घोळत होते. त्याने कैकेयीपाशी आग्रह धरला की, "हे सापत्न लोकमाते, केवळ विधायक कार्याच्या हितासाठी तू लोकपिता दशरथापाशी हट्टाचे

नाटक कर." कैकेयी अयोध्येच्या 'साहित्य-संगीत-नाटक केंद्रा'त सांस्कृतिक विभागातून शिकून तयार झालेली स्त्री होती. तिने भरतमुनीच्या नाट्यशास्त्राचा अभ्यास केला होता. सांस्कृतिक कार्यांत भारतीय स्त्रिया पहिल्यापासून तयार होत्या. तिने व मंथरा नावाच्या तिच्या जोडीच्या कार्यकर्त्या स्त्रीने हट्टाचा सुंदर संवाद बसवला. विशेषतः क्रोधाचा अभिनय करण्यात तर तिचा हातखंडा होता. तिने 'भरताला लोकपालाची जागा द्या' ऊर्फ 'माझा भरत' ही एकांकिका इतक्या परिणामकारक रीतीने केली की दशरथाने खरोखरीच रामचंद्राऐवजी भरताला लोकपालाची जागा दिली. यावरून त्या काळातील स्त्रियांचे अभिनयकौशल्य दिसून येते. रामचंद्र विधायक कार्यासाठी जंगलात जावयास निघाल्यावर त्याच्या एका पावलावर पाऊल टाकून जानकी निघाली व दुसऱ्या पावलावर पाऊल टाकून लक्ष्मणही निघाला. वास्तविक तिघांनीही जीवनदान करावयाचे योजले होते. परंतु शेवटी बारा वर्षेच हे कार्य करावे अशी तडजोड झाली. तिघांचाही अयोध्येत जाहीर सत्कार झाला व राम, सीता आणि लक्ष्मण दंडकारण्यात पदयात्रेसाठी निघाली.

## शूर्पणखेच्या नाकाचे वाढलेले हाड

जंगलात रामाने आश्रम बांधला आणि आदिवासींमध्ये आपले विधायक कार्य सुरू केले. शेतीचे नवे प्रयोग सुरू केले. जंगलात अनेक वन्य जमाती राहात, त्यांचा उद्धार केला. त्याच वेळी शूर्पणखा नावाची एक स्त्री आश्रम पाहावयास आली व सीतेकडे पाहून सारखे नाक मुरडू लागली. सुरुवातीला बऱ्याच मंडळींचा समज हिच्या मनात सीतेची अवहेलना करून रामाला मोहित करायचे असे असावे असा झाला. परंतु तिला काहीतरी नाकाची व्याधी असावी असे रामाला वाटून त्याने लक्ष्मणाला तसे सांगितले. परीक्षेनंतर तिच्या नाकाचे हाड वाढले आहे असे लक्ष्मणाने निदान करून तिच्या नाकावर शस्त्रक्रिया केली.

दुर्दैवाने जंगलात सगळी शस्त्रक्रियेची साधने नसल्यामुळें वाढलेले हाड कापल्यावर नाक जोडण्यासाठी आवश्यक आयुधे नव्हती व हाडाबरोबर नाक गमावून शूर्पणखा परतली. शस्त्रक्रियेत आयत्या वेळी काय होईल ते सांगणे अवघड आहे.

## वानर नावाचे आदिवासी

जंगलात वानर नावाचे आदिवासी होते. त्यांची मुले आश्रमात शिकून फारच तयार झाली. हे कार्य जोरात चालू असताना मारीच नावाच्या एका व्यापाऱ्याने 'हरणछाप' रेशमाचे, जरींनी भरलेले सिलोनी कटपीसेस विकायला आणले. आश्रमातील मंडळी कामात दंग होती. राम आणि लक्ष्मण कांचनमुक्तीचे प्रयोग आदिवासींना समजावून देत असतांना मारीचाची 'कांचनमृगछाप कापऽऽड' अशी आरोळी सीतेने ऐकली. हा मारीच सिंहलद्वीपचा फिरस्ता *व्यापारी होता. (हा महा-रिच—म्हणजे अत्यंत श्रीमंत व्यापारी* होता असे सुप्रसिद्ध सिंहली संशोधक चिचुंदरनायके यांचे मत आहे.) सीतामाईंनी बरेच दिवस वल्कलाच्या चोळ्या वापरल्या होत्या, आणि फेरीवाल्याची हाक आली की त्याला दारात बोलवायचा, या स्त्रीसुलभ स्वभावाप्रमाणे त्यांनी आपल्या यजमानांना त्याला बोलावण्यास सांगितले. 'कांचनमृगछाप कापड घ्या—घ्या—' असे ओरडत मारीच दूरवर निघून गेला होता. बराच वेळ आपला पती येत नाही असे पाहून सीतामाईने लक्ष्मणास त्याच्या शोधार्थ धाडले. तेवढ्यात लंकेतील दुसरा एक गृहस्थ रावण याने सीतेस लंकेत असली पुष्कळ दुकाने आहेत व आपण दोन तासांत तुला आणून सोडतो असे सांगून तिला विमानातून लंकेत नेले. इकडे जंगलात रामचंद्राने एक युक्ती केली. धनुष्यबाणाच्या टोकाला आपल्या आश्रमाचा पत्ता लिहून त्याने तो बाण हवेत सोडला. हेतू हा की बाण मारीचाहून जलद गतीने जाऊन त्याच्यापुढे वाटेवर कुठेतरी पडेल; परंतु चुकून तो बाण मारीचास लागला व तो मेला. रामाने त्याच्याजवळ जाऊन पाहिले तर

मारीचाकडे खऱ्या सोन्याच्या तारेत विणलेले कापड अजिबात नव्हते. तेव्हा राम व लक्ष्मण परतले, तो आश्रमात सीता नाही.

## सीता-शोध

शेवटी राम व लक्ष्मण सीतेच्या शोधार्थ निघाले. वाटेत त्यांना लंकेचा प्रमुख रावण याने सीतेला नेल्याची वार्ता कळली.

सीतेचा शोध करण्यासाठी आश्रमातली सारी आदिवासी मुले रामाबरोबर हिंडत होती. त्यांत हनुमान नावाचा एक चलाख मुलगा होता. तो सगळ्यात पुढे गेला आणि रामेश्वराजवळील खाडीतून पोहत जाऊन त्याने अशोकवनात सीता पाहिली. वास्तविक त्याला सीतेला बरोबर आणता आली असती. परंतु लंका हे स्वतंत्र राष्ट्र होते आणि परवान्याशिवाय सीतेला पुनः स्वतःच्या देशात येता येत नव्हते. त्यामुळे त्याला काय करावे सुचेना. दुर्दैवाने त्याच वेळी लंकेत हिंसात्मक चळवळ करावी असा त्याच्या डोक्यात विचार आला आणि त्याने तेथील नारळाच्या झाडावर चढून येणाऱ्याजाणाऱ्याच्या डोक्यावर नारळ फेकून मारणे, आगी लावणे वगैरे विध्वंसक कृत्ये केली. रावणाच्या सैनिकांनी त्याला पकडण्याचा प्रयत्न केला. त्यांनी सीतेभोवती पाहारा वाढवला. तिला लंकेच्या न्यायालयाने 'लंका सुरक्षा कायद्या'खाली अटकेत ठेवली. तिच्यावर स्त्रीपोलिसांचा पाहारा होता. तुरुंगातून तिला वागणूक चांगली मिळत होती. कारण लंकेचा मुख्य दंडाधिकारी कुंभकर्ण हा काही काम न करता झोपा काढीत असे. रावणाचा भाऊ बिभीषण याला शांततेचे धोरण मान्य होते.

लंकेची नासधूस करून हनुमान परत आल्यानंतर रामाने त्याच्या दुष्कृत्यांबद्दल उपोषण केले. कांही वानर मंडळींनी लंकेवर स्वारी करावी अशी रामास सूचना केली; परंत आंतरराष्ट्रीय संबंध बिघडतील म्हणून रामाने हिंसेच्या मार्गाने न जाता समुद्रात पूल बांधून दंडकारण्य आणि लंका यांचे संबंध जोडा-

वयाचे ठरविले. ह्या पुलाच्या विकासयोजनेचा दोन्ही देशांना फायदा होण्यासारखा आहे हे तत्त्व रावणाला पटावे म्हणून खटपट केली. पुलाचे काम श्रमदानाने करावयाचे ठरले आणि सारी मंडळी सीतेचा प्रश्न विसरून पूल, धरणे वगैरे बांधण्याच्या योजनेत गढून गेली. शेवटी पुलाचे काम पुरे झाले. वाली, सुग्रीव वगैरे स्थापत्यविशारदांनी स्वयंस्फूर्तीने काम संपविले. रीस (हल्लीच्या परिभाषेत ज्याला रूस म्हणतात), शृगाल वगैरे परदेशीय मंडळीही ह्या कार्यात मदतीला आली होती. वानरांत ताम्रमुखी वानर होते. पाताळदेशातूनही या कामी बरीच मदत झाली. पुलाचे काम पूर्ण झाल्यावर सामोपचाराने आंतरराष्ट्रीय संबंध जोडण्यासाठी राम, लक्ष्मण, वाली, सुग्रीव यांचे शिष्ट-मंडळ लंकेत जाऊन रावणाला भेटले. रावणाच्या राष्ट्रात दहा मंत्री होते आणि ते दहा प्रकारची परस्परविरोधी मते मांडीत. त्यामुळे रावण दहा तोंडांनी बोलतो अशी आख्यायिका आहे. प्रत्येक वेळी सोयिस्कर रीतीने मते बदलायला रावणाची ही मंत्रिमंडळाची पद्धती रामचंद्राला फार आवडली आणि रामराज्यात आपण ह्याच पद्धतीचा अवलंब करू असे त्याने रावणाला कबूल केले. सीता हा विषय सोडून रावण अनेक अवांतर गोष्टी रामाशी आणि शिष्टमंडळाच्या इतर सभासदांशी बोलला. सिंहली लोक-नृत्याचे कार्यक्रम फारच उठावदार झाले! त्यानंतर लंका-शांति-सेनादलाचा प्रमुख बिभीषण याने रामराज्याशी परराष्ट्रीय संबंध अत्यंत प्रेमाचे ठेवले पाहिजेत असे पत्रक काढले. हनुमंत पुन्हा पुन्हा सीतेच्या मुक्ततेचा विषय काढू पाहात होता. त्याच्या शेपटावर रामाने पाय ठेवून त्यास दाबले. शेवटी लंकेतील एका नारळीवर लटकणारे नारळ पाडण्यासाठी रामाने तीर मारला. त्याच वेळी गवाक्षात रावण आला होता. त्याला चुकून बाण लागून तो धाडकन जमिनीवर पडला. उत्तरीय तपासणीत "गवाक्षातून पडून" असा शेरा पडला व रामावर आरोप आला नाही आणि प्रकरण आंतर-राष्ट्रीय न्यायालयात गेले नाही. अशा रीतीने अत्यंत शांततामय

मार्गाने त्या प्रकरणाचा शेवट होऊन सीता व राम अयोध्येला परत आले. तोपर्यंत भरताने हंगामी सरकार स्थापन केले होते. राम परतल्यावर सार्वत्रिक निवडणुका झाल्या आणि राम लोकपाल झाला आणि देशात रामराज्य सुरू झाले. परंतु लोकांनी रामराज्य म्हणू नये असा लोकपाल रामचंद्राने वटहुकूम काढला आणि आपल्या राज्याला लोकराज्य म्हणावे अशी लोकांना विनंती केली आणि त्या शांतताप्रिय लोकांनी ती ऐकली. प्रथम लोकपालपदाचा त्याग, नंतर पत्नीत्याग आणि सरतेशेवटी शरयूत देहत्याग केल्यामुळे कुणीही कोणाला व कशालाही सोडून जाताना "बरं आहे, राम राम मंडळी" म्हणावे, असा पुढे फतवा निघाला. फार काय, देहाचा त्याग करताना "राम" म्हणावे असाही वटहुकूम काढला गेला. त्याची अंमलबजावणी आजतागायत चालू आहे.

## सीता 'भू'-दान-कार्य-निमग्न झाली

जाल्मिकीच्या लोकरामायणाचे हे थोडक्यात सार आहे. मूळ ग्रंथ पाहिल्याशिवाय खरी कल्पना येणे शक्य नाही. लेखकाची वर्णनशैली तर अद्वितीय आहे. विशेषतः राम आणि रावण यांची लंकेत निघालेली मिरवणूक, सेतुबंधनप्रसंग वगैरे प्रकरणे केवळ शैलीसाठी वाचावीत अशी आमची शिफारस आहे. रावणाचा रामाच्या हातून चुकून घडलेला मृत्यू वाचताना डोळ्यांतील टिपे खळत नाहीत. सीतात्यागाच्या प्रकरणाला जाल्मिकीने दिलेली कलाटणी फारच सुंदर आहे. विचित्र कंड्या पिकवणे हे रजकांचे काम होते हे सिद्ध केले आहे. आणि ह्या रजकांच्या गोटातून पिकणाऱ्या 'राजकीय' बातम्या ह्या आजतागायत कशा चालू आहेत हे पटवले आहे. अयोध्या हे शहर असल्यामुळे आपल्या उदरात असलेल्या बालकांवर संपूर्ण ग्रामीण संस्कार व्हावे म्हणून सीता खेड्यात राहावयास गेली ही जाल्मिकीची मीमांसा विचारात घेणे इष्ट आहे. पुन्हा ती अयोध्येत परत आली तीदेखील शहरी जीवनात कशी सुखी होऊ शकली नाही हे दाखवून शेवटी तिने भूमातेच्या पोटात प्रवेश केला हे खरे नसून 'भू'दानकार्यात ती 'निमग्न'

